# ध्यान-पूजा

शिवाजी न. भावे

ब्रह्मविद्या मंदिर, पवनार, जि वर्धा

© शिवाजी न. भावे

मुखपृष्ठ : दिलीप भडांगे

आषाढी एकादशी १८९६

प्रकाशक :
श्री. घनश्याम सूरजमल अग्रवाल
आग्रा रोड, धुळे

मुद्रक :
नाना डेंगळे
भावना प्रेस
८३०–३१ शनिवार पेठ, पुणे ३०

**किंमत रुपये १५.००**

शब्दापलीकडे वस्तु ती शब्दांत चि मांडली ।
मांडली परि ती जाणा सर्वथैव चि मांडली ॥

# माझे अहोभाग्य

पू श्री शिवाजीराव भावे ह्यांच्या 'ध्यानपूजा'चा प्रकाशक होण्याची मला संधी लाभली, हे माझे अहोभाग्य आहे

श्री शिवाजीराव 'महाराज' म्हणूनच आम्हा सर्वांना परिचित व आदरणीय आहेत

श्री. शिवाजी महाराज ह्यांनी ७ नोव्हेंबर १९७३ रोजी ७१ व्या वर्षात पदार्पण केले त्यानिमित्त आम्ही काही मंडळी त्यांना अभिवादन करायला गेलो होतो ह्या प्रसंगी त्यांनी आपल्या रोजनिशीत ग्रथित केलेल्या, स्वतःच्या चिंतनात्मक विचारांपैकी निवडक कणिका आम्हाला वाचायला दिल्या त्या वेळी हे विचार क्रमशः आपल्या साप्ताहिकातून प्रसिद्ध करण्याची परवानगी 'स्वतंत्र भारत'चे संपादक श्री कांतीलाल गुजराती ह्यांनी मागितली पण हे विचार-चिंतन ग्रंथबद्ध करणे जास्त योग्य होईल असे मला वाटले, व उपस्थित सन्मित्रांनी माझ्या ह्या योजनेस संमतीही दर्शविली

दरम्यान काही अडचणी येत गेल्या स्वतः महाराजांवर शस्त्रक्रिया झाली व त्यांचे आजारपणही झाले, शिवाय पुण्याहून प्रुफे पवनारपर्यंत तपासण्यास जाणे-येणे तसेच माझी काही व्यक्तिगत कामे इत्यादींमुळेही वेळ गेला पण आता हा ग्रंथ प्रकाशित होण्याचा योग आला आहे

महाराजांच्या आतापर्यंतच्या छोट्या-मोठ्या पुस्तकांत हा ग्रंथ बहुधा सर्वाधिक मौलिक असावा, असे आमच्यासारख्यांना वाटते व तशी प्रचीती वाचकांनाही येईल, असेही मी मानतो

असा ग्रंथ प्रकाशित करण्याची परवानगी मला मिळाली, त्याबद्दल महाराजांचा मी ऋणी आहे

तसेच ह्या ग्रंथाच्या उत्कृष्ट मुद्रणाबद्दलही मी साधना प्रेसचा मनःपूर्वक आभारी आहे

**घनश्याम सुरजमल अग्रवाल**

---

पुस्तकाच्या अखेरी शुद्धि-पत्र दिले आहे त्यात निर्देश केल्याप्रमाणे दुरुस्त्या करून घेऊन पुस्तक वाचणे अधिक लाभदायक होईल कृपया वाचकांनी शुद्धि-पत्राप्रमाणे दुरुस्त्या करून घ्याव्यात

## १

तूं एका दिशेनें एकदम आलास आणि बघतां बघतां दुसऱ्या दिशेनें निघून गेलास. तुझ्याकडे किंचित् पाहिलें न पाहिले तों तूं नजरेआड झालास. इतक्या लगबगीनें येणे आणि जाणे यांत तुझा हेतु काय होता ? कां तूं केवळ एक मधला टप्पा म्हणून आला होतास ? मजकडे येण्याचा तुझा हेतूच नव्हता कां ? अथवा सर्वत्र तुझें येणे–जाणे असेच आकस्मिक, क्षणिक आणि लगबगीचे असते ? मला कांहींच समजत नाहीं. तरी पण आता माझी अशी समजूत होत आहे कीं तुझें क्षणिक येणे हाच मजवरचा मोठा अनुग्रह होता. तो मी ओळखला नाहीं. तुझें क्षणिक आगमनहि पुढें केव्हा तरी होईल कां ?

ते होवो न होवो, तुझ्या पहिल्या क्षणिक आगमनानें माझ्या जीवनावर केवढा मोठा परिणाम घडविला ! या परिणामरूपांत तूं आतां माझ्या ठिकाणीं निरंतर वस्ती करीत आहेस असेच ना ?– मी हे विचारतो खरे, पण माझ्या अंतःकरणात ठसलेली तुझी मूर्ति आता सर्व प्रश्नांचे उत्तमोत्तम उत्तर असल्यामुळें यापुढें हे संशययुक्त मन मी मौनाच्या परतीरावर उतरवून तुझ्या चरणी निश्चिंत व्हावे एवढीच याचना करतो.

## २

तूं अणुहूनहि अणु असल्यामुळें तुला कोणताच वेष नाहीं. तरी तुझा त्रिभुवनात सर्वत्र एकसारखा प्रवेश असल्यामुळे सर्व स्थलकाल-विभक्ततेच्या सकटातून कायमचें सोडवून तू सर्वांना आपल्याशीं जोडले आहेस. जुनें जुने, आणि नवे नवे, जुने आणि नवे तिहींना तूं सतत जोडीत सगळ्याच्या योगक्षेमाची व्यवस्था करतोस. इतकेंच काय पण मांगल्यमय वैभवानें युक्त अशा अनेकविध विश्वरचनांच्या रमणीय आत्मीयतेनें तू सर्वांना गुंफून घेतोस. त्यामुळे जरी सूक्ष्माहून सूक्ष्म आणि मोठयाहून मोठयांत तुझी गणना झाली तरी तू सर्वांहून निराळाच राहतोस. हा तुझा योग, हा निराळेपणा खरोखर काही निराळाच आहे ! याला कोठेहि तुलना सापडत नाही ! आम्हांला तुझ्या या स्वरूपलीलेचें रहस्य जरी कळले नाही तरी हे ! लीलामया ! तुझ्या या लीलेची अल्पस्वल्प गोडी तरी आम्हांला लागू दे.

## ३

अशुद्धि कितीहि असो ती दूर करावयाचीच या निश्चयाचा साक्षात्कार जेथे आहे तेथे शुद्धतेच्चि सिद्धि हात जोडून उभीच राहील, पण सिद्धीचीहि मुळीच अपेक्षा नाही. केवळ अशुद्धता दूर करीत राहणे याच कार्याची ज्याच्या हाताला सवय झाली त्या हातानें सर्व काहीं हस्तगत केले. तो जेथे जेथे गेला ते ते त्याने खऱ्या अर्थाने पादाक्रात केले. हे मना ! ही वस्तु लक्षात घेशील कां ?

४

निरनिराळ्या रंगांच्या छटांनी तुझ्या हास्याचीं फुले नित्य फुलत राहतात ते हास्याचे एक नित्यसंमेलनच भासते तेथे उदासतेचे दास्य कोठले ! तेथे सर्वत्र मुक्तीची युक्ति विहरताना दिसते. तिला पाहून चित्ताला जणूं भूल पडल्यासारखें होते आणि चित्त त्या गूढ भुलीच्या झुलीने पूर्ण झाकले जाते त्या भुलीची ती गूढ झूल ! ती मायेची ममता ! तो अलभ्य लाभ ! माझ्या अंतरंगावर शान्तीची सत्ता चालवू लागतो त्या सत्तेच्या बाहेर येण्याची भीति वाटते. हे देवदेवा ! बाहेरहि तीच ममतेची झूल मजवर केव्हा घालशील ? आणि आत-बाहेर हे आवागमन केव्हा थांबवशील ?

५

कधी नियमितता नाही, कधी एकरूपता नाहीं वेळ अवेळ कांहीहि नाही तरी पण तुझें आगमन हृदयावर रम्यतेची रम्यता पसरवून देते. हृदयातल्या भावना हेलावूं लागतात तुझ्या रम्यतेत इतर सर्व दोष गुण-रूप होऊन जातात. दोष हे दोष असतात का ? का दोष हा खरोखर आभासच ? असा संभ्रम पडतो हा संभ्रम की सत्य ? हा निवाडा करण्याची इच्छाच होत नाही. गोड स्वप्नातून जागे व्हावे तरी ती गोडी जागृतीवर आपला खोल ठसा उमटविते. तसा हा संभ्रम, भ्रम की सत्य ? हे टिकूं शकत नाही. तेथपर्यंत जाऊन स्वतः अदृश्य होतो हे सुंदरा ! हे रम्यतरा ! हे सौम्यमूर्ते ! हे विविधा ! माझी एकच इच्छा आहे, तू अनेक रूपांनी अनेक वेळा जशी तुझी इच्छा असेल तसे मला दर्शन दे. या दर्शनाच्या आड कोणतीहि वस्तु, कोणताहि काल, कोणतेहि निमित्त येऊ देऊ नकोस ! या स्थल-काल-निमित्तांचा पडदा दूर कर.

६

बसून बसून थकवा येतो. मग बसावें कीं उठावें ? बसून थकवा जातोहि मग बसावें कीं उठावें ? उठलें म्हणजे उत्साह वाटतो. पण तो सतत नाहीं. मग बसावें कीं उठावें ? हे देवा, मला बसणें आणि उठणें दोहींच्या पलीकडे ने; तेव्हांच माझा संभ्रम दूर होईल. श्रम कीं विश्राम ? हा एक भ्रमच आहे. श्रमांतच विश्राम, विश्रामांतच श्रम मिळून माझा श्रम–विश्रामाचा भ्रम तूं केव्हां नष्ट करशील याचीच मी वाट पाहात आहे.

७

स्वतः जागत राहून दुसऱ्यांना झोंपविणारा, स्वतःवर दुसऱ्यांचा भार घेऊन दुसऱ्यांना अगदीं हलकें करणारा, गरज सरल्यानंतर आपली उपेक्षा होत आहे हेंहि लक्षांत न घेणारा, सर्वांना जास्तींत जास्त आश्रय देणारा, तो कोण ? हें मीं जेव्हां मनाला विचारतों, तेव्हां तो केवळ मातेच्या मांडीवर खेळणारा वत्सलतेचा बोधच आहे, हा शोध चित्तांत उमटतो.

८

चोंचींतून चारा घेऊन घरट्याकडे धांव घेणारी पक्षिणी जेव्हां चोंच उघडलेल्या पिलाच्याजवळ येते तेव्हां तिला धीर राहात नाहीं. केव्हां हा चारा मी पिलाला भरवूं, असें तिला होऊन जातें ! आणि पिलालाहि धीर धरवत नाहीं. केव्हां ती मूर्तिमंत ममता माझ्यांत साठवूं, असें त्याला होऊन जातें ! तें का केवळ पक्षि-हृदय मानायचें ? माझ्या मना ! ही चूक तूं करूं नकोस ! अरे, बाह्य दृश्यानें तूं नेहमीं फसतोस. तसा येथें फसशील. तूं तद्रूप हो आणि म्हण—

तूं माझी पक्षिणी, मी तुझें अंडज
चारा घाली मज पांडुरंगे ।

९

लहान पण तेजस्वी जीवनाची तहान भागविणारा तू जीवनाचा आसरा आहेत तुझी मी नि-य उपासना करावी हे सर्व प्रकारें हितकारक खरेच पण मजकडून तुझी अवहेलना होत असते आळसामुळे, दुर्लक्षामुळें, तुझ्याकडे मी लक्ष देत नाही पण तू मात्र मजकडे सदोदित पाहात राहतोस बोलत नाहीस पण तुझें मौन खरोखर बोलक्याहून बोलके वाटते. तुला स्वत चे असे काहीच नाही जसे ठेवावे तसा तू राहतोस परोपकारासाठीच तुझें अस्तित्व, पण परोपकाराचाहि आग्रह नाही निरग्रही परोपकारसिद्धता हें तुझें रूप माझ्या लक्षात येऊन माझ्या जीवनात ते कधी उतरेल ?

१०

चारी बाजूनीं, वर-खाली सगळीकडून रक्षण आहे रक्षणाचे बंधन मात्र नाही उलट मोकळेपणाचा उल्हास आहे. तरी मोकळेपणाची असुरक्षितता नाही. अशी ही पूर्णतेने भरलेली एकावर एक वरचढ योगशक्तीची योजना पाहून मन थक्क होऊन जाते या योजनेने माझ्या मनाला एक आकार, एक योजना, एक मुक्तता, एक रक्षण सहजपणेच प्राप्त व्हावे, पण ते नेहमीच होत नाही. हा माझाच दोष आहे. या दोषाचाहि निषेध न करता ते रक्षणाचे कृपाछत्र सदैव मजवर कृपाच कृपा करीत आहे. अशा स्थितीत माझी ही सदोष कृपणता तरी शिल्लक कशी राहील ?— पण त्या कृपेसाठीं मी दोषांचेहि पाघरूण कबूल करीन इतकी त्या कृपेची मला तहान लागलेली आहे.

## ११

विशोभिताला शोभिवत करण्याची कला ओतप्रोत पसरवून, निरनिराळ्या रंगसंगतीच्या रागरागिण्यांना आपल्या येथे आमंत्रण देऊन, संकोच आणि विकासाच्या, विचार आणि भावनांच्या उषःकालामध्ये स्वतःला दडवून मातेच्या ममतेने प्रेमार्द्र बनवून, गुरूच्या अनासक्तीची लेणी लेववून, सोनेरी किरणांच्या आणि मोकळ्या हवेच्या सौख्याने डोलत राहणाऱ्या हे परमात्मस्वरूपा! तुला मी सांभाळावे आणि तूहि मला सांभाळावेस असा जरी जन्मसिद्ध संकेत असला तरी माझ्याकडून त्या संकेताचे पालन होत नाही, याबद्दल तू मला कधीच दोष देत नाहीस. यामुळेच तू निर्दोष आहेस ही जाणीव माझ्या चित्तात कायमची ठसून गेली आणि तेव्हांपासून मी तुझ्या गुणगानातला एकमेव संवादी मधुराहून मधुर मुक्त-स्वर बनलो आहे.

## १२

रिकामीहि नाही भरलेलीहि नाही अशी वस्तुस्थिति असून कधी रिकामी, कधी भरलेली अशा अगदी परस्पर-विरुद्ध भावाने तुझा व्यवहार बिनधोक चाललेला आहे. हाच मोठा धोका आहे व्यवहारशून्य करून तुला जेव्हां निर्द्वंद्व, निरपेक्ष, निःपक्षपात दृष्टि प्राप्त होईल तेव्हा रिकामेपणा भरलेपणा मुळीच राहणार नाहीं तू प्रत्यक्ष सत्यच पाहूं लागशील आणि सत्यहि तुजकडे अनिमिष नेत्रांनीं पाहात राहील. यासाठी एकच गोष्ट कर, तूं स्वतःला विसरण्याची गुरुकिल्ली शोध आणि त्या किल्लीने सत्याचे भांडार उघडून खुशाल तेथला खजिना आपलासा कर!

## १३

तो आपल्या आपल्या मार्गाशी अगदी मिळून गेला आहे. जसजसा वळेल, जिकडे जिकडे जाईल तसा तसा तिकडे तिकडे त्याचा मार्ग. तो मार्गहि आहे आणि मार्गदर्शकहि आहे. मध्येच गतीने, मध्येच मद, मध्येच सरळ, मध्येच वक्र. कधी दुहेरी, कधीं एकेरी, कधी हंसत-खेळत, कधीं गंभीर, त्याच्या गतीची अशी कितीहि वैविध्ये असलीं तरी ती सगळीं गूढ प्रेमरसात कल्लोळून गेलेली. वैविध्ये मनाला मोहून टाकतात म्हणूनच मी त्याला म्हणतो, 'बाबा! मजवर कृपा कर. आता मुक्कामाची गोष्टच नको. चल, पुढे चल. मला तुझ्याबरोबर पुढे ने. मला त्याच तुझ्या अनत मार्गाशी समरसून टाक'

## १४

एक असून दोघाचा साधा बेमालूम मिळवून देणारी त्याची कुशलता दोघांतहि एकार्चीच योजना करण्याची त्याची अद्भुत योगशक्ति, पुन्हा तीहून आपण अगदीं निराळा राहून कर्तृत्वाच्या पलीकडे नेणारें त्याचे कर्तृत्व ही सगळी नजरबंदीची जादू थक्क करून सोडणारी आणि परम पावन अनत जीवनाच्या अध्ययनाची आद्यपीठिका बनवणारी आहे आणि परम भाग्य माझें कीं मला त्याने तिचा लाभ करून दिला आहे. त्या लाभाचा मला योग्य आणि पूर्ण उपयोग करण्याची शक्ति दे हीच आतां माझी त्याला प्रार्थना आहे.

## १५

मला डोळा दिलास पण दृष्टि नाही. दृष्टि पण तीतहि सृष्टि उमटत नाही. सृष्टि उमटली तरी तीमुळें कंटाळा येतो. कंटाळा गेला तरी सतत आनंदाचा शोध लागत नाही त्या माझ्या हरवलेल्या वस्तूला मी कोठे शोधत फिरूं ? माझ्या फिरण्याने ती दूर दूर जाते की जवळ जवळ येते काहीच पत्ता लागत नाही, आणि डोळा देणारा तूंहि बेपत्ता ! आता वस्तूचा शोध घेणाऱ्या मला तरी बेपत्ता करूं नकोस ! माझा ठावठिकाणा तूं स्थिर करशील का ?

## १६

लहान पण महान्, काळी पण शुभ्र, तटस्थ पण प्रेरक-- सर्वांच्या स्वातंत्र्याला मोकळीक देणारी, स्वतः बद्ध होऊन निर्बंद्ध करीतच सर्व जीवन व्यतीत करणारी तुझी सगति सोडली तरी सोडलीच जात नाहीं. ती मुद्दाम जोडावी लागत नाही सर्व काळीं सर्व अवस्थात, सर्व स्थळीं ती असतेच असते जिच्यामुळें माझे सर्व काही सरळ आहे. नाही तर मी कोठे असतो, माझें काय झाले असते याची कल्पनाहि करवत नाही. प्रक्षुब्ध महासागरावरचे हें जीर्ण तारू तुझ्या सगतीने तरले. अनेकाना तारक वाटले. याचेच राहून राहून आश्चर्य करीत मी तुझी दिव्य शोभा बनलो आहे. केवढें हें भाग्य !

१७

ती सर्वांच्या पोषणासाठीं नेहमीच सिद्ध राहून पूर्णतेची तेजस्वी मूर्ति बनली आहे सतत झिजूनहि तिची टिकून राहण्याची शक्ति अतिशय आश्चर्यकारक आहे असमतेची भूमिका तिला जराहि सहन होत नाही. त्यामुळे विषमतेविरुद्ध तिच्या आवाजाच्या विरुद्ध कोणालाहि कानाडोळा करता येत नाही. अगदी मधुरातल्या मधुरतेला ती जवळ करील तशी कडवटातल्या कडवटानाहि ती नाही म्हणणार नाहीं. सर्वांना योग्य ते स्थान तिच्यापाशी आहेच ती सर्वांच्या योगक्षेमाची सतत काळजी करीत असते आणि तिला गौण मानले तरी तिला काहींच वाटत नाही त्या महनीयतेला मी कसा विसरेन ? तिच्या सहाय्यानेच मातृ-देवतेने सर्वांना वागविले. तिच्या उपकाराची फेड कधी होणारच नाही. हें जाणून मी तिला परमेश्वराच्या प्रार्थनेची दिव्य साधना बनवितो, आणि परमादराने तिच्यापुढे हात जोडतो. आता तिच्या ठिकाणी प्रगट-लेल्या दिव्य कान्तीने आणि सुगधाने माझें जीवन भरून जावो

१८

विशालतेला माधुर्याचा बहर आल्यावर हजारो डोळ्यानी लाभ-भावनेने तिकडे टक लावून पांहावे हें जरी स्वाभाविक असले तरी तेथें व्यर्थता न यावी म्हणून जो सतत काळजी घेतो त्याला जो नकळत अतुलनीय लाभ होतो तो इतराना कोठून होणार ? मी इतकेच म्हणतो, हे देवी ! मी त्यांत भागीदार व्हावे अशी माझी इच्छा आणि योग्यताहि नाही. मी फक्त तुझ्या समादरात भागीदार होऊ शकलो तरी मला कायमची प्रसन्नता लाभेल.

१९

विदारकता असून कठोरतेचे नांवहि नाही. भेदकता असून मृदुताच निर्माण व्हावी अशा काहीं अवर्णनीय कलेने तुझें शस्त्र तू सदैव तयार ठेवतोस त्यामुळे समृद्धीकडेच सर्वांची नजर खिळली जाते. समृद्धिहि एकदम प्राप्त होत नाहीं ही दयाळू योजना तुझ्या ठिकाणीं प्रगटलेली असल्यामुळे सर्वांना सतत समाधानाचा पुरवठा होत राहतो आणि हव्यासाचा ध्यास नष्ट होऊन निश्चिंततेचा मंद मद वारा वाहत राहून त्या प्राणमय जीवनाशीं सर्व जीवन सम्मीलित होत जाते. या अनुभवाचा मी जो जो विचार करतो तो तो तुझ्या शस्त्रागारांत अशीं किती शस्त्रें असतील याची मला कल्पनाहि करवत नाही, आणि मग आमच्या जवळच्या क्षुल्लक शस्त्रावरचा सर्व विश्वास कोठल्या कोठे उडून जातो !

२०

हा पक्ष की तो पक्ष, दोहोंविषयीं उदासीन राहून तू निःपक्ष पक्षाची प्रशंसा बनला आहेस तरी कोणालाहि तू विरोधी वाटत नाहीस. जो तो तुझ्याकडे येतो इतकेच काय पण तुझा सतत उपयोग करतो. तरीहि आपल्या प्रत्येकाच्या पायाखाली मृत्यूची भयंकर दरी आ वासून पसरलेली आहे, हे कोणीच पाहात नाही. ती पार करण्याला तुझेंच एक साधन आहे ! ते साधन अनेक पक्ष पाडून एकमेकांना मृत्यूकडे लोटता येईल यासाठीं वापरणे हा केवढा द्रोह ! त्या भयंकर द्रोहाचे शासन केवळ करुणा एवढेंच तूं ठेवले आहेस. ती करुणा अंतःकरणांत बिंबून सर्व कांही सोडून आम्हाला तुझ्या चरणापाशी येण्याची प्रेरणा केव्हां होईल ?

## २१

दोघाची समान परतु परस्परविरुद्ध अलग भूमिका असून कितीहि कार्यभार असला तरी मार्गे न पडतां तुम्ही सतत बिनतक्रार तयार राहतां. कोणी भूषवून कोणी दूषवून कसेहि वागो, कशाचीच फिकीर नकरता तुम्ही जीवनात झिजण्याचेच व्रत घेतले आहे. खरोखर तुम्ही दोघे ध्येयमार्गाचीं खरी साधने आहात तप्तता, रूक्षता, दूरता, दुर्गमता कसलाहि अडथळा असो, तो उल्लंघिण्याची तुमची समर्थता असमर्थ जीवाला प्रगतीचे एकमेव आश्वासन आहे ! इष्ट स्थळी येताच कोणी तुम्हाला आंत या म्हणत नाहीं आणि तुम्ही बाहेरच तिष्ठत राहतां कारण तुम्ही आमच्याप्रमाणे एकच इष्ट स्थळ ठरविलेले नाही. त्यामुळेच तुमची अनिष्टतेतून कायमची सुटका झाली आहे आणि तुम्ही नेहमी एकमेकापासून आणि सर्वांपासून अगदीं मुक्त राहता या तुमच्या मुक्त दर्शनामुळेच आता आम्ही तुमची पूजास्थानात स्थापना केली आहे. तुमच्या दर्शनामुळे प्रत्येकाला पावनता प्राप्त होत असते.

## २२

समाधानाने मला असमाधान होतें, सतोषाने माझ्यात असंतोष निर्माण होतो, सुखाने मी दुःखी होतो म्हणून का तू असमाधान, असतोष आणि दुःख निर्माण केलस ? हे महान् जादूगारा ! मला तुझ्या पोतडीतल्या या दोन्ही गोष्टी नकोत तुझ्या जादूची खुबी काय तेवढीच मला दाखवं.

२३

आकाराची पूर्णता आणि प्रकाराची पूर्णता अतर्बाह्य पूर्णता माझ्या-समोर मूर्तिमत होऊन आली. तेव्हा मी चकित व्हावे यात आश्चर्य नाही, पण ती पूर्णता माझ्या सेवेसाठीच विनम्र होताना पाहून माझ्या आश्चर्याला सीमा राहिली नाही मी अगदीच वरमून गेलों. गुरूच शिष्याची सेवा करण्याला उभा राहिलेला पाहून कोणता शिष्य विरघळणार नाही ?— पण गुरू म्हणाले— " अरे ! तू सकोच करू नकोस तुझी सेवा ही रुग्णसेवा आहे· माझी अपूर्णता हा रोगच. तो मी स्वतःच केवळ स्वतःच्या शक्तीवर दूर कसा करू ? " त्यामुळे मी गुरूच्या समोर काही बोलूं शकलो नाही तरी यापुढे मी त्या पूर्णतेच्या मूर्तीची, त्या परात्पर गुरूची शुश्रूषा हेच माझें एकमेव कर्तव्य मानले.

२४

दिवसामागून दिवस, रात्रीमागून रात्री किंबहुना वर्षामागून वर्षे जसजशी जात आहेत तसतशी तुझ्या सर्वोत्तम परिपक्वतेच्या नव्या नव्या प्रकारांनी ती अद्वितीय बनत आहेत. या तुझ्या कालयोजनेच्या भव्य राजमंदिरातल्या असंख्य दालनातून आतापर्यंत फिरून फिरूनहि माझे समाधान झाले नाही. ते देवा ! तूच करून देशील या आशेनें मी आता मंदिराच्या बाहेरच तुझी वाट पाहात आहे !

२५

मधून मधून तुझी उघडझांप होते त्यामुळें समावेशनाचे आदान-प्रदान होत राहते. कधी घाईगर्दीने, कधी सथपणाने, कधीं महत्त्वानें, कधीं किरकोळपणाने अशी जरी त्याची स्थिति असली तरी, आणि आत घेतल्या जाणाऱ्या आणि बाहेर दिल्या जाणाऱ्या त्यात कितीहि वेगवेगळ्या कमी-अधिक रीती असल्या तरी, समावेशनाच्या एकाच सोनेरी सुरावरचे ते आरोह–अवरोह असल्यामुळे कधी तुझा कटाळा येत नाही. उलट कटाळलेल्या मनाला तूच सामावून घेशील या विश्वासामुळे मी अगदीं निर्धास्त राहतो तू विश्वासाच्या विश्वासाने भरलेला विश्वाचा ठेवाच आहेस! तुझ्या चोरीची भीति नाही. तूंच चोरीला चोरले आहेस!

२६

ते सात एकमेकाच्या अगदी जवळ साराख्या अतरावर उभे आहेत. ते कधी बसत नाहीत, कधी आडवे होत नाहीत. ते जवळ आहेत पण कधी एक होत नाहीत त्याना थकवा माहीत नाही! त्याना श्रमहि माहीत नाही! मी आठवा त्याच्या अगदी विरुद्ध आहे. मला त्याच्या-प्रमाणे व्हावे असे वाटत नाही. त्याना माझ्यासबंधी काय वाटते तें कळत नाही. ते एका स्थिरतेच्या चौकटीत असतात. आणि मला कोणतीच चौकट नाही. मी स्वैर आहे का? मी चचल आहें का? मी स्थिर नसलो तरी हरकत नाही पण योग्य गतीनेच राहावे असा त्याचा मजकडे पाहण्याचा रोख आहे. हे त्याचे मजवर केवढे उपकार आहेत!

२७

ही कल्पनेची मनात येणारी आणि जाणारी क्षणिक जाळी नाही. ही प्रत्यक्ष सत्य आहे. हिचे मला बंधन नाहीं. उलट हिचे रक्षण आहे. हिच्यामधून गाळीव पुण्य मजकडे येत राहते आणि अशुद्धता तत्क्षणी निघून जाते. अत्यंत देदीप्यमान सोनेरी आणि लावण्यमय चंदेरी वस्त्रे विणून ती मला आच्छादित करते. त्यामुळे मजकडे येण्यासाठी पक्ष्याप्रमाणे अनेकांचे थवेच्या थवे धाव घेतात पण ती कोणालाहि आत येऊ देत नाही. सगळे मोहित होऊन मजकडे वारवार डोकावून मात्र पाहतात. मीहि सगळ्याकडे कौतुकाने पाहतो. त्या परस्परप्रेक्षणामध्ये जे युगायुगाचे सुखसंवाद भरले जातात ते प्रत्यक्ष भाषणामध्ये कोठून प्रकट होणार ? ते सगळे मला मूकपणाने म्हणतात, “अरे ! बद्ध असून तूं मुक्त कसा आणि आम्ही मुक्त असून बद्ध कसे ?” मी त्याना काय सांगू ? मी त्यांच्या मूक अशा मुक्ततेच्या प्रश्नाला काय उत्तर देऊ ? या प्रश्नाचे उत्तर देणे तरी शक्य आहे का ? प्रश्नाचे उत्तर न देण्याने त्याना जे उत्तर मिळेल ते मला कधीं तरी देता येईल का ? आणि माझ्या स्थितीसंबंधी मीच उत्तर दिले पाहिजे का ? — त्यांच्या प्रश्नामुळे मजपुढेहि असे प्रश्न उपस्थित झाले. न बोलताच मी उत्तर दिले कीं हे प्रेमळ मित्रानो ! नेहमी येणे-जाणे करा तुमचे दर्शन हाच माझा आनंद ! तुमची येण्या-जाण्याची हालचाल हाच माझा दिव्य कर्मयोग ! तुमच्या दर्शनाने माझें सगळे मीपण भरून जाईल. तेथे रिक्तता मुळीच उरणार नाही. मग अपेक्षाहि नाही उपेक्षाहि नाहीं. एकमेकाचे दर्शन. तेच हे भक्तीचे महाद्वार ! तीच ही जाळी ! तेच हें माधुर्याने भरलेले मधाचे पोळे !

२८

फारा दिवसानी मी तुला भेटण्यासाठीं आलों. पण तूं नव्हतास. त्यामुळें मला अतिशय वाईट वाटले. परतु त्यामुळें तुझी स्मृति माझ्या अतःकरणात अधिकच ठसून गेली! तूं दिलेल्या स्नेहाची अमृत-मधुर फळे मला आठवली. तुझ्या उदारतेच्या त्या पूर्व-सृष्टीत मी किती मोकळेपणाने वागडलों आहे त्या स्मरणाने माझे डोळे भरून आले. अतिशय प्रेमळ प्रत्यक्षता होती ती आता केवळ स्मृति बनली! या करुण अनुभवामुळे परोक्ष अपरोक्ष या दोहोना सोडून मी केवळ तुझ्या-माझ्या आतरिक एकतेचेच उद्दिष्ट डोळ्यापुढे ठेवले आहे! आता ती आतरिक भेट केव्हा घडेल?

२९

सतत अधान्त्री राहण्याची तुला मुळीच खती नाही. उलट निराधार अशा परमोच्च स्थितीच्या समाधानाचे निनाद निर्माण करून तू त्याना नेहमी अनतात विलीन करतोस ते विलीनीकरण ऐकण्यात केवढी तल्लीनता होते! सर्व स्थूलतेचा जणू सूक्ष्मातिसूक्ष्म शातीत विलय होऊन त्याहूनहि सूक्ष्म स्वप्नमगीतात त्याची परिणती होते. तो अनुभव वारवार यावा म्हणून येणाऱ्याजाणाऱ्याकडून तू प्रेरणा प्राप्त करतोस. आणि अशा तऱ्हेने स्वतः गायक असून केवळ जड वाद्य बनतोस. या तुझ्या कृतीमुळे जडतेतहि चिद्रसाची भजने घनीभूत झालेली मला ऐकावयास मिळतात! केवढी ही तुझी कृपा!

## ३०

तू वारंवार मजकडे आलास पण मला तुझी ओळख पटली नाहीं. तुझा वेश अगदीं हीनदीनासारखा ! माझी कल्पना तर तू राजेश्वर ! मग मी तुला कसा ओळखणार ? पण वारवार तुझ्या दीनतेने माझे हृदय द्रवले आणि तुझी दीनता ती माझीच दीनता मला वाटूं लागली. ती दूर करण्यासाठी मन व्याकुळ झाले. पण तूं अदृश्य झालास. कातर हृदयानें मी तुला शोधून शोधून निराश झालो. शेवटीं दीनजनाचा आसरा अशा वृक्षाकडे जाऊन मी त्याला विचारले तो माझा दीननारायण येथे येत असतो ना? वृक्ष काय बोलणार ! माझी खात्री झाली कीं तो भेटला तर येथेच केव्हां तरी भेटेल. शंकराचार्यांचे वचन आठवले – "करतलभिक्षा तरुतलवासः". मग मी तेथेच तुझ्यासाठी नैवेद्य ठेवू लागलो, आणि आश्चर्य हे की, माझी अवस्था एकदम बदलली आणि तूं मला आशीर्वाद दिलास.

शान्तिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु ।

## ३१

मृदु ! मृदु ! मृदु ! त्याहूनहि मृदु ! मधुर ! मधुर ! मधुर ! त्याहूनहि मधुर ! असा तूं मार्दवाहून मार्दव आणि मधुरतेहून मधुर बनलास. त्यामुळें तुझ्या ठिकाणी असंख्य आकाराची सतत अनाग्रही आवर्तनें चालत राहूनहि तूं निराकाराच्या सौंदर्याच्या अम्लान पुष्पांची जयापजयाच्या पलीकडची विजयमाला बनलास ! त्या मालेच्या सुवासाने माझा जीव वेडावून गेला आहे. मला माहीत आहे की, तू याचीच वाट पाहात आहेस कीं ही विजयमाला कोणाच्या गळ्यांत घालू ?

## ३२

हे अद्भुत फेरीवाल्या ! तूं तऱ्हेतऱ्हेचा माल घेऊन एकसारखा फिरत राहतोस. कोणी कोणी तुझा माल घेतात. मीहि कधीं कधीं घेतों. मालाच्या मूल्याकनात तुझें, आमचे कधीच ऐक्य होत नाही. पण आम्हीं त्या बाबतींत कितीहि ओढाताण केली तरी तू तडजोडीनेच आपला मूल्यवान् माल आम्हाला देतोस. आम्ही मात्र गरज असून तडजोडीला तयार होत नाही. तूच कसा तडजोडीला तयार होतोस ? त्या मालाचा तुझ्यावर बोझा पडेल, तो मातीमोल न व्हावा म्हणून का तूं आमच्या-पेक्षा अधिक गरजू आहेस ? आणि म्हणून तडजोडीला तयार होतोस ?— अशा अनेक तऱ्हेचा विचार करून शेवटीं लक्षात आले की, तूं जो नेहमी फिरतोस, तो आमच्याकडून मालाचे मूल्य घेण्यासाठीं फिरतोस असे जरी वरवर दिसले तरी तू आमच्याशी सौदा करीत असताना आमचे समग्र जीवनमूल्यच तुझ्या पदरात पडते. त्यामुळे तडजोडीला सहजच तू तयार होतोस. आमचीहि अशी स्थिति कधी काळी होईल का ? मालाच्या मूल्यापेक्षा ग्राहक आणि विक्रेत्याचे जीवनमूल्यच मुख्य असे कधीं होईल का ? हे अद्भुत फेरीवाल्या ! घरबसल्या आम्ही असे फेरीवाले कधीं बनू का ?

## ३३

दुःखतप्त जीवांचा भार हलका करण्यासाठीं परमोच्च स्थितीतून तूं खाली उतरतोस, त्यामुळे तूं परमगुरु असून अतिशय लघु आणि हलका बनतोस. तुला हस्तगत करून कसाहि तुझा उपयोग करावा अशा निरहंकार सेवेच्या आदर्शाची तूं शोभा बनून अलंकारालाहि अलंकृत करतोस ! हे तुझें जीवनकार्य सर्वांसाठीं असेल तर मीच त्यापासून वंचित का ? असा जो मी विचार करतों माझ्या मित्राने नकळत एक भेटीची सामान्य वस्तु म्हणून माझी-तुझी भेट करून दिली. त्या मित्राला कल्पनाहि आली नाही की त्याने मजवर केवढा उपकार केला आहे ! त्या मित्राचा मी कधी तरी उतराई होईन का ?

## ३४

तुझ्या दर्शनासाठीं मी मंदिरांत गेलो. तेथल्या भव्यतेने चित्त आश्चर्यचकित झाले. चित्ताची खिन्नता जाऊन त्याला प्रसन्नता प्राप्त झाली. तरी तुझ्या मंदिराच्या भव्यतेत गुंगून तुझ्याच मदिरात तुझ्या दर्शनापासून मी वचित झालो हेहि लक्षात आल्याशिवाय राहिले नाही. हे मंदिराचे एवढे अवडंबर मला भुलविण्यासाठीच तर तू निर्माण केले नाहीस ? या सशयाने चित्त अगदी निराश झाले त्या निराशचित्तविकलतेने शेवटी मला झोप लागली. झोपेत दर्शन देऊन तू म्हणालास, " या मंदिरासारखें भव्य हृदयमंदिर तयार कर, मग मी नेहमींच तेथे राहीन. मग तुला माझ्या दर्शनासाठी कोणत्याहि मदिरात जाण्याची जरूर नाहीं. तू पाहिलेल्या मंदिराचा उद्देश तुला समजला ना ? " झोपेंतच मी उत्तर दिले, " समजला. " माझ्या मना ! आता लवकर जागृत हो ! आतां भव्य-दिव्य असे हृदयमंदिर बांधण्याची तयारी कर.

३५

रमणीय सुखाच्या गुलाबाचीं फुले खोटीं असतात आणि दारुण दुःखाचे काटे मात्र खरे असतात हा जेव्हा अनुभव आला तेव्हां मी गुलाबाच्या बागेला पाणी देण्याचे सोडून दूर मैदानांत राहूं लागलो तेव्हा रात्रीं सबध आकाशात नक्षत्राचा बगीचा फुललेला दिसला तेथे काट्याचे नावहि नाही. अम्लान फुलाच्या अनत राशी नेहमी फुलत रहाव्या ? नक्षत्रानाच मी हा प्रश्न विचारला नक्षत्रानो ! तुमचा निर्माता कोण ? तो कोठे राहतो ? तो कोठे भेटेल ? एकामागून एक माझे प्रश्न ऐकून नक्षत्रांनीं रमणीय हास्य केले. त्या हास्याची भाषा मला कोण शिकवील ? आणि त्या भाषेच्या द्वारे माझ्या अनुत्तरित प्रश्नाचे उत्तर कसे मिळेल ?

३६

ती पहा दूर अरण्यांत किती सुंदर झोपडी दिसते आहे ! ती मूर्तिमत साधना आपल्या कृपेची पाखर घालून कोण्या भाग्यवंताचा अतरात्मा रमणीय अशा परमोच्च दशेला नेता येईल का म्हणून वाट पाहात आहे ! तिचे चिर आमत्रण कोणीच का स्वीकारणार नाही ? वास्तविक तिच्यामधून सोनेरी साच्यातून निर्माण होणाऱ्या रत्नमूर्तींची अनत परंपराच निर्माण व्हावयाची असे असून ती एकाकी कशी ?— हा प्रश्न मी जेव्हां लोकाना विचारला तेव्हा ते म्हणाले,— “ त्या ठिकाणी साधनेचे चिर आमत्रण आहे. हेच आम्हाला पटत नाही. तेथे अतृप्त भुताच्या विकराल विनाशाची नृत्यशालाच कशावरून नाही ? ” हा प्रश्न ऐकून मी सरळ तेथेच राहूं लागलो आणि थोड्याच दिवसांत त्या झोपडीने लोकाचे लक्ष वेधले. लोकाचे लक्ष वेधले म्हणूनच नव्हे तर तेथें माझेंच लक्ष वेधल्यामुळे मला तेव्हापासून आत्मनिष्ठेचा खरा महिमा कळला ! आणि मी सशयपिशाचाने भारलेल्या लोकापुढें कोणताहि प्रश्न माडण्याचे सोडून दिले.

३७

साम्य नसले तरी विरोधाचा लवलेश नाहीं. उलट सतत सह-कार्यानें चालण्याची आणि सहकार्याची परंपरा निर्माण करण्याचा नित्य-प्रवाह वाहता रहावा अशा या चैतन्यमूर्तीला साधनरूपाने तूं माझ्याशीं जोडून दिलेस तेव्हाच तुझ्या कार्याचें निमित्त बनण्याची असामान्य भूमिका तूं मला प्रदान केलीस. या भूमिकेला मी पात्र नाहीं. ही गोष्ट उघड असली तरी पात्रापात्रतेच्या पलीकडील अतुलनीय कृपाच तुझ्या रोमारोमांत रमलेली असल्यामुळे मी माझ्या आणि कोणाच्याहि पात्रापात्र-तेचा विचार का करावा ? तुझी दिव्यतनें भरलेली अद्भुत कुशल कार्यें कोणतीहि असोत, मला निदान सर्वत्र तुझें पूजाकार्य करता आले तरी तेवढयानेच मी माझें जीवन कृतार्थ मानीन ! आणि सर्वत्र तुलाच नमन करीत राहीन.

३८

सर्व जीवनतत्त्वाचा उद्धार करून त्याना गति देऊन जेव्हा तू त्यांना आपल्या आसनावर स्थिर करतोस, तेव्हा आम्हांवर दुर्गम पर्वतातल्या गुहेतल्या गूढतेचे पाघरूण पडून आम्ही सुखनिद्रेने घेरले जातो. तुला आणि आम्हालाहि आम्ही विसरून जातो. तरी ती विस्मृति तुझ्या जाणिवेच्या मधुर रसात उत्तरोत्तर मुरत जात असल्यामुळें त्या निद्रेंतच आमच्यांत अतर्बाह्य परिवर्तन होते. जागे होताच लोक म्हणतात अहो ! तुम्ही असे अपूर्व कसे बनला ? तुमचे पूर्वीचे काहीच शिल्लक राहिले नाही. ही किमया कशी झाली ? कोणी केली ? नदीचा समुद्रात प्रवेश आम्ही समजू शकतो पण समुद्रालाहि नदी बनवून तुम्हीं त्याला आपल्यांत कसे सामावून घेतले ? आम्हीं म्हणतों हें अपूर्व कार्य त्याचेच. आमचे यांत कांहीं नाही. आम्ही अगदीं नामानिराळे आहोत.

३९

माझ्या अनंत प्रवासाची शिदोरी बाधून देतांना तिला नुसता कच्चा धागाच नव्हे तर प्रेम-सूत्राचा न दिसणारा अतूट धागा तूं बांधून दिलेला असशील मी जेथे जेथे जाईन तेथें तेथें माझ्या जीवनाचे पोषण कसे होईल याची सर्व काळजी त्या शिदोरीबरोबर जोडली गेली असेल. चालून चालून थकून अरण्यातल्या एखाद्या ओढयाच्या काठी हातपाय धुवून मी शिदोरी सोडीन तेव्हा तू नकळत ती सोडताना सहाय करशील आणि पुन्हा ती बाधताना माझ्या हाताना तुझे पवित्र हात लागलेले असतील. ती शिदोरी कोठेहि विसरली जाऊं नये म्हणून तू माझ्या मनात कायमची वस्ती करून राहशील शिदोरीमधल्या वस्तूना तुझ्याच कुशल हातानी अखंड कुशलता प्रदान केलेली असेल. दुःखिताला, गरजूला, अबोध पशुपक्ष्याना आपल्या शिदोरीचा वाटेकरी केल्याने ती अधिकच गोड होत जाईल तिच्यापुढें कृतज्ञतेची बुद्धि हात जोडून उभी राहील. ही उपदेशवाणी त्या शिदोरीच्या कणाकणांत तूं साठवून ठेवलेली असशील त्या शिदोरीला बाधलेले फडके वरून दिसायला कितीहि सामान्य असले तरी त्यात तुझी असामान्यता विणलेली असेल. माझ्या लहानग्याला माझ्या प्रत्यक्ष अदर्शनात माझ्या कृपेचे पूर्ण दर्शन व्हावे म्हणून त्या शिदोरीत तू मूर्तिमत झाली असशील. हे आई! जसें मी बालपणी तुझ्या दुधाचे केव्हाहि अखड पान केले आहे तशीच ही शिदोरी मला तुझ्या हृदयाचा ठेवा वाटेल. मी तिच्या मिषाने विलगून राहीन. तुझ्या वियोगातहि तुझा अखंड योग साधला जाईल. तूं जरी दिसली नाहीस तरी माझ्या अश्रूंच्या असख्य डोळ्यांनीं मी तुला डोळे भरून पाहीन!

## ४०

माझ्या घरावर भिकारी म्हणून आलास. आणि मला तुझ्या दारावरचा भिकारी केलेस. मग मी तुझ्याकडे जें जे मागू लागलो ते ते ऐकून तू हसू लागलास. काय मागावे, कसे मागावें, किती मागावे, केव्हां मागावे मला काय माहीत? ज्या अर्थी तूं मला भिकारी बनवलेस त्या अर्थी हे तुझेंच काम नाही का, की भिकाऱ्याची कलाहि तू मला शिकवावीस? मी खरा भिकारी अजून बनलो नाही, हें मी कबूल करतो. पण दुसरीकडे किती भीक मागून कितीहि संचय केली तरी मी कधींहि खरा भिकारी बनणार नाही. म्हणून ही भिक्षेची दीक्षा तूच दिली पाहिजेस. कारण तुझ्यासारखी अपेक्षा राखणारा याचक जगांत कोण असणार आहे? कोणी एक झोळी तर कोणी दोन झोळ्या भरतील इतकी याचना करणार पण तुझी झोळी ही आकाशाचीच झोळी. त्या झोळीत कितीहि टाकले तरी ती भरावयाची नाही. हलकीच्या हलकी आणि मोकळीच्या मोकळीच राहील. म्हणून माझी तुला एकच विनति आहे की, मला तुझ्या दारचा भिकारी बनवलेच आहेस तर आता पुरा आणि खरा भिकारी बनव. आणि मी तुजजवळ काय, केव्हा, कसे, किती मागावे ते मला शिकव. आता मी येथून हालणार नाही आणि भिक्षा मिळेल ती तुझ्या दाराशीच राहून भक्षण करीन पण मला मागता येत नाही म्हणून हंसत राहून उपाशी मात्र ठेवूं नकोस. माझी आई नेहमीं म्हणे ते गाणे तरी माझ्या बाबतींत खरें ठरू दे--

वेडा तामसा जोगी। देखिला गे माय.
भिकेचे तुकडे मागून। भोपळ्यात खाय.

## ४१

जेव्हां परस्पर विरुद्ध गतीने फिरत राहून जीवनाच्या अतःसाराला कणाकणात गाठून त्याचे प्रकटीकरण करण्याची तुझी दिव्य साधना आम्ही पाहतों तुझ्या जडवत् भासणाऱ्या आकारांतल्या गूढतेबद्दलचे आमचे गाढ अज्ञान पार विलयाला जाते आणि तू प्रकट आम्हांपुढें ठेवलेल्या महनीय अतःसाराचे सात्मीकरण कसे करावे तेहि लक्षात येऊ लागते. चित्तात तशीच साधना सुरू होऊन चित्ताच्या कणाकणांतले अतःसार चित्ताला खळबळून सोडते. आणि ती खळबळ शान्त होत होत ते जीवनसार तापलेली मूस शान्त होऊन ज्याप्रमाणे सुंदर आकाराच्या सोनेरी मूर्तीला जन्म देते त्याप्रमाणे महान् अशा अतर्विश्वाला जन्म देते. आणि तेथे जेव्हा जीवाचा अनिरुद्ध सचार सुरू होतो तेव्हा तुझ्या मूलभूत साधनेबद्दल कृतज्ञ होऊन जीव तुझ्या चरणीं सपूर्ण समर्पित होतो आणि म्हणतो साधनेचे कष्ट कोणी कितीहि सागोत आम्हाला तर साधनेच्या गोडीनेच भारले आहे.

## ४२

वर आणि खालीं, उंच आणि खोल, जवळ आणि दूर, कोमल आणि कठोर, मधुर आणि कटु, रुद आणि अरुंद, निर्भय आणि भीतिप्रद, त्या त्या भूमिकेचे तुझ्याच आधाराने आकलन करीत करीत माझी तुझ्या परमधामाची यात्रा चालू झाली आहे. तुझ्या या आधाराची सगति असल्यामुळें कोणी पुढें गेले की मागें राहिले, कोणी बरोबर आहेत कीं मागे फिरले अथवा कोणी मध्येच मुक्काम केला याचा विचारच चित्तांत प्रवेश करूं शकत नाही इतकेच काय पण परमधामहि चित्त ग्रहण करीत नाही. हे पाहून तुझ्या आधाराची अनन्यसंगति मला निराधार करीत आहे. ना इथला ना तिथला अशी माझी स्थिति झाली आहे असेंहि कित्येकानी म्हटले पण त्याचे म्हणणे कानच ऐकत नाही त्याला मी काय करूं ? तुझ्याशिवाय जगांत स्वत्वाचा कोणता आधार आहे हे माझ्या लक्षातच येत नाही. हे लक्षात येऊंच नये अशी माझी मनोवृत्ति बनली आहे त्यामुळे मी एककल्ली विक्षिप्त म्हणून गणलो गेलो तरी मला तुझ्या आधाराच्या संगतीने कुणाचीहि आणि कशाचीहि पर्वा वाटत नाहीं. हे बेपर्वा फकीरा ! हे चिरयात्रिका ! तुला मी पुनः पुन्हा हेंच सागतो की, तू जनाचेहि मानूं नकोस मनाचेहि मानू नकोस. तुझी यात्रा, तुझी सगति, तुझा आधार या त्रिवेणीत स्नान करून सर्व गोष्टींना तिलाजलि दे.

## ४३

आम्ही बोलत का नाही ? कारण अनंत परिवर्तन परंपरेतून गाळून गाळून जेव्हा त्याची सर्वांगपरिपूर्ण मूर्ति सेवेला कटिबद्ध होऊन उभी राहिली तेव्हां आमच्या अनत उणीवाच्या कार्यकारणमीमासेचा प्रपंच सर्वच्या सर्व कोठल्या कोठे लुप्त होऊन गेला. सर्व कार्यकारणाचे भान नष्ट होऊन त्या सेवामूर्तीच्या मागे आम्हीं ओढले जात आहोत याचीहि कल्पना आली नाही. त्या मूर्तीशी तन्मय होऊन भावाभावातीत भाग्य आम्ही भोगीत आहोत त्यामुळे आमच्याजवळ बोलण्याला शब्दच शिल्लक राहिले नाहीत.

## ४४

सतत एका बाजूला रहावयाचे आणि वेळ आली म्हणजे पुढें होऊन अतर्बाह्य पावित्र्याची पेरणी करून तिची प्रसन्न फलनिष्पत्ति सर्वांना केव्हा प्राप्त होईल ही वाट बघावयाची ही तुझ्या स्वभावाची ठेवण अपूर्व असून कोणालाहि पुन्हा ती अपूर्व वाटू नये अशा आकारांतले आपले जीवन राखल्यामुळे मला किंवा कोणालाहि तुझी वास्तविक योग्यता मुळीच कळली नाही त्यामुळे तुझी कोणतीच हानि झाली नाहीं आमच्या जीवनाला मात्र मृतकळा आली. तुला शरण जाऊन तुझ्याद्वारेंच आतां आमचा जीवनमृत्यु टळेल आणि आम्हाला नित्यनूतन नवजीवनाचे स्वरूप कळेल इतकेच काय पण त्यात मरूनहि अमर होण्याचे तुझें हितगुज ओवलेले असेल. त्या हितगुजाची गूढ-गाथा मी कोणत्या शब्दात वर्णन करूं ? तिचे अल्पहि वर्णन शक्य आहे का ?

४५

गेला– गेला– गेला दूर गेला– दिसेनासा झाला ! आतां तर केवळ एक लहानसा ठिपका दिसतो. ती खूणहि पुसून जाईल. देदीप्यमान् शुभाशेची कारजी आवरून घेऊन स्वतःचे नामरूपहि नुरविणारी त्याची ती आत्मशून्यतेची अद्भुत कर्तबगारी शेवटी निःस्तब्ध आणि गाढ अशा अपार शातीत परिणत होत होत मनाला कोठे नेते त्याची जाणीवहि उरत नाही. ओ हो ! जाणीव आणि नेणिवेच्या पलीकडचा पहा तो अपार महासागर ! ते मोहाचे माहेर ! मला त्यात विलीन होऊन जाण्याचा त्याचा मौनसंदेश आता ऐकलाच पाहिजे !

४६

तू दिसायला अगदी लहानाहून लहान. पण कालस्थलाचा भेद करून प्रेमामृताचा सकेत तुझ्या ठिकाणी अंकित झाल्यामुळे मी तुझा कायमचा अकित झालो आहे लोक मला हसतात पण मी तुझ्या ठिकाणीं लीन होण्याचा प्रयत्न करीत असतो एकदा ते परमसाध्य हस्तगत झाले म्हणजे कुठले लोक ! कुठला मी आणि कुठले काय ? मग तुझ्या लहानपणातून महानता विकसित होईल आणि महानातल्या महानतेलाहि लहान बनवील !

## ४७

वस्तु डोळ्याआड झाली कल्पनेपलीकडे गेली म्हणजे आम्हीं ती हरवली म्हणतो दुसऱ्या कोणाच्या डोळ्यात ती भरली कल्पनेत बसली म्हणजे ती त्याला गवसली म्हणतो पण वस्तु स्वतः हरवतहि नाहीं गवसतहि नाही. ती आमच्याशी हरवणे गवसणे दोहोंचा संबंध ठेवीत नाही. तिचा आम्हीं उपयोग केला तरी वाहवा ! न केला तरी वाहवा ! आम्ही जर हा वस्तुबोध ग्रहण केला तर आमच्यावर सतत येणारी हर्ष-शोकाची आपत्ति टळून वस्तूप्रमाणेच आमच्याहि अस्तित्वाचा महाबोध निर्माण होणार नाही काय ?

## ४८

तुझी प्रत्येक हालचाल जरी व्यक्त भासत असली तरी अव्यक्ताच्या मधुरतेने ती ओसडून दोषाचा लेशहि तेथे टिकत नाही कितीहि प्रत्या-वर्तने झाली तरी तो तोच कटाळवाणेपणा तेथे यत्किंचितहि स्पर्श करू शकत नाही. एकसारखी झोक्यावर झोके घेणारी ती अक्रियतेची महान् क्रिया दैवी सौंदर्याचे अद्‌भुत क्रीडास्थान बनते. देवानाहि हेवा वाटावा अशा त्या तुझ्या लीलाविलासाने आमचे भान हरपून आम्हीं तत्क्षणीं तुझ्यापायीं बेभान होऊन पडतो ! हे लीलामया ! आम्हांला आता तुझ्या पायापासून दूर करूं नको ! आम्हाला आतां जगातली जागृति देऊं नको !

४९

तुझ्या निरोधाची अवस्था पाहून तुझा काय उपयोग असे वाटतें न वाटते तोंच तुझ्या अद्‌भुत विकासाची प्रक्रिया सुरू होते आणि ती मध्यें प्राणमय शक्तिलाभाची आणि द्रोह-दोषाच्या अटकावाची महान् योजना पाहून आमचे अतश्चक्षु खुले होतात मग कवीच्या क्रांत दर्शनालाहि मागें टाकणारी दर्शने तेथे हात जोडून उभीं राहतात. त्याना आम्ही विनवून म्हणतो आमच्यापुढें हात जोडूं नका आम्ही दोषी आहोंत. आम्हाला त्याच्यापुढें हात जोडूं द्या. आम्हाला त्याच्यापाशीं लोटांगण घालूं द्या. आम्हाला त्याची क्षमा मागूं द्या. आमच्या अश्रूंनी आमचे दोष धुवू द्या।

५०

मंगलतेच्या प्रवेशासाठी तूं मुक्तता धारण केली आहेस. तेव्हां तुझ्या ठिकाणी स्वैरतेचे नावहि काढता येऊ नये हें अगदी स्वाभाविक आहे. तेज, प्राण आणि शुचितेची तू सदोदित अपेक्षा ठेवतोस आणि उत्तरोत्तर क्षुद्रतेला टाकून देण्याचे सुचवतोस. आत आणि बाहेर दोहोमध्ये भेद पडू नये म्हणून तू मध्यस्थाची भूमिका घेऊन मर्यादित आणि अमर्यादित दोहोंची मर्यादा बनला आहेस। या मर्यादेत आम्ही वावरत असूनहि अपरिचयामुळे तुझ्या स्वरूपाची आम्हाला खरी ओळख पटत नाही. आमच्या अस्तित्वाच्या वसतिस्थानाचे तूं एक साधन असल्यामुळे आम्हीं तुला विनवितो कीं आम्हांला नेहमीं तुझ्या नम्रतेच्या धोरणाचे तोरण दिसूं दे।

## ५१

आरोह– अवरोहाच्या सोपेपणासाठीं तू सोपानपरंपरा निर्माण केलीस. पण आम्हाला ती सोपी न वाटतां अतिशय कठीण झाली. पायांना यत्किंचित त्रास होऊं नये म्हणून तूं ती गुळगुळीत केलीस पण आम्ही तीवरून घसरूं लागलों. ती ढासळूं नये म्हणून तूं तिला मजबूत स्वरूप दिलेस, पण आम्हाला तिच्या कठोरतेचा त्रास वाटूं लागला. अनेकांना एकाच वेळीं उपयोगी व्हावी म्हणून तूं ती चांगली लांबरुंद केलीस पण आम्ही तिच्यावर बसून राहून आळशी बनलो. तेव्हा हे देवा ! तूं आम्हालाच आधीं सरळ कर ? त्याशिवाय कोठली सोपानपरंपरा आणि कोठला आरोह– अवरोह ?

## ५२

आत म्हटले तर आत, बाहेर म्हटले तर बाहेर, आतहि नाहीं, बाहेरहि नाहीं, काहीं आत काहीं बाहेर— असा तुझा तिहेरी कारभार पाहून आमची त्रेधा उडाली यात नवल नाही. पण हे देवदेवा ! तुला आणि आम्हालाहि मुक्त करण्यासाठी आम्हीं तुझी चौरगावर स्थापना करून तुला कारभारातून आणि आम्हाला गोंधळातून सोडवून घेतले आणि केवळ तुझ्याशीं पूज्य-पूजक जोडला यात आमचे काहीं चुकले का ? चुकले असले तरी आम्ही हेंच म्हणतो—

चुकणे भूषण आम्हा भूषण करणे क्षमा तुम्हा देवा !<br>
अनुरागें कीं रागें करचरणांभोज हा शिरीं ठेवा ॥

## ५३

तुझ्या प्रकटतेत सर्वप्रलयकारी शक्ति असून तूं मात्र सर्वांच्या पोषणाचीच सिद्धता करतोस, इतकेंच काय पण आक्रमण करणाऱ्या पापवासनाना पिटाळून लावतोस. तुझें दर्शनच आक्रमकाना भयभीत करते. तुझ्या आश्रयाने गाढ अज्ञानातहि ज्ञानाची चित्कला तेवत राहते. क्षुल्लकतेचा कोणताहि तुजजवळ अंश टिकत नाहीं. चुकलेल्याना तूं दुरूनच मार्गदर्शन करून स्वस्थानीं पोचवतोस आणि अशा तऱ्हेने जीवनाचा तू मध्यबिंदु बनतोस. नेहमीं परमोच्च दशेचे दर्शन करणारी तुझी दिव्य मूर्ति तुझ्याप्रमाणेच परोपकारार्थ बलिदान देण्याची प्रेरणा देते. तुझ्या सत्सगात आमच्या जीवनाचे सार्थक होवो ! आमचे अस्तित्व तुझ्या अस्तित्वात मिळून जावो ! आणि तुझ्या वर्धमान दिव्यतेचा सर्वत्र विजय होवो !

## ५४

तूं दूर असल्यामुळे मालिन्य दूर होईना पण तुझ्या कृपेने तुझी जवळीक प्राप्त झाल्याबरोबर मालिन्य दूर झाले इतकेच काय पण पुन्हा जवळ येण्याचे साहस त्याने सोडले. मग तुझ्या निर्मलतेच्या वैभवाची दिव्य प्रभा हातात आली. त्या दिव्य प्रभेने तुझी आरती करताना जे समाधानाचे दर्शन लाभले ते मालिन्यदूरीकरणातहि मिळाले नव्हते. हे कृपालो ! हे निर्मला ! मला तुझी जवळीक सतत लाभो ! मला तुझा पुजारी बनव ! मजकडून तुझी आरती होईल असे आश्वासन मला दे !

५५

त्याच्या सतत गतिशीलतेनें जगाला जीवनक्रम लाभलेला आहे. त्याची गतिशीलता क्रमिकतेनें नियमिततेत गुफलेली असून आम्हाला नकळत ती आमच्या सुस्थितीसाठीं हळुवारपणाने कार्य करीत असते. आपल्या दिव्य व्यवस्थेच्या पूर्णतेचा केंद्रबिंदु ती कधींच सोडीत नाहीं. त्यामुळे आम्हाला जरी मधून मधून कर्तव्यजागृति प्राप्त होत असली तरी त्याच्या गतिशीलतेचे सतत कर्तव्य आमच्या ठिकाणीं कसे उमटेल या प्रश्नाचे उत्तर आम्हांला कधींच मिळत नाहीं. ती खुबी त्यानें दडवून ठेवलेली आहे इतकेच काय पण तो स्वतःहि दडलेला आहे. त्याला आम्ही कोठे शोधूं ? त्याची खुबी आम्हाला कोठे मिळेल ?– निश्चितच हृदयात ! आमच्या हृदयात ! तेथेच तो आणि त्याची सर्व खुबी दडलेली आहे !

५६

आतून शांति, मधून कारुण्य, वरून निर्मलता. तिहेरी प्रवाहानी तुझी पावनता युगयुगांची चैतन्यगाथा गात गात जीवनाचे पुण्यक्षेत्र सुफलित करीत आहे ! विशालतेच्या पोटात दडलेलीं असंख्य गुणरत्नें तिच्यामध्ये समाविष्ट होण्यासाठीं अधीर होऊन तिजकडे धाव घेत आहेत ! त्या सर्वांना वाहवून त्याना आपल्या प्रवाहवेगाने पैलू पाडून ती पुढें नेत आहे ! ती रत्नें मिळविण्यासाठीं अनेकांनी, अनेक वेळा, अनेक ठिकाणीं बुड्या मारल्या, पण त्याना कळेना कीं आपणहि रत्नेंच आहोत. आपण या प्रवाहांत नुसती बुडी न मारता कायमचेच निमग्न होऊन राहिलो तर बुडी मारणे आणि वर येणे हे श्रम वांचून आपणाला अखंड विश्रामाचा लाभ होईल. आपणाला रत्नाची आपुलकी लाभेल. त्याच्या संगमसौख्य-तरंगात रंगून जाऊन तरंगत तरगत आपले अंगअंग अभंग मांगल्यात मुरून जाईल ! हे देवदेवा ! कोणाला हें कळो न कळो, मला तरी हें समजण्याची बुद्धि तू देशील का ?

५७

आमच्या दुराव्यामुळे तूं आणि सर्वांना आम्हीं दूरावलो तुझ्या-जवळ याची दाद नाहीं. कारण तू सतत सर्वांच्या जवळच आहेस. तरी तुझी जवळीक आम्हाला साधतच नाहीं. जो जो ती साधण्याचा आम्ही प्रयत्न करतो तो तो जवळ असून तुझी दूरताच वाढत जाते. त्यामुळे आम्ही आतां एकच युक्ति योजीत आहोत कीं, ही दूरताच दूर करावी म्हणजे जवळिकेचा प्रश्न सुटेल ! हे देवा ! दूरतेला दूर करण्याची शक्ति आम्हाला दे म्हणजे जवळिकेची शक्ति सहजच लाभेल !

५८

आधीं निर्मलता, नतर साम्य, नंतर कृपा, तदनतर निवडीचा श्रेष्ठ निक्षेप, त्यापुढें त्याच्या उन्नतीचा सतत प्रयत्न, अनुकूलतेची जोड आणि प्रतिकूलतेचा विनाश. इतक्या क्रियाकलापातून—हे देवा ! तुझ्या विपुल ऐश्वर्याची उषा उदयाला येते. तिच्यापुढे आम्हाला नम्र करून तिच्या उदयापूर्वीच्या तपोमय पार्श्वभूमीवर आम्हाला आरूढ कर.

५९

रुक्षतेची सिद्धता, स्थूलतेची सूक्ष्मता, असाराची सारमयता बनवून तूं आपल्या जीवनाला केवळ परार्थ जीवनाचे स्वरूप देतेस. आमच्या दुर्मतीपासून आम्हांला वाचवून बुद्धिबोधाचा विकास करविणाऱ्या अमृतालाहि लाजवतेस. आम्हा दुर्बलांना पुष्टीचे वरदान देणाऱ्या तुझ्या अनादि काळापासून चालत आलेल्या उपकाराची आम्ही कोणत्या कृतीनें फेड करावी हेच आम्हाला समजत नाहीं ! तेंव्हां हे देवी ! हे माउली ! तुझ्या कृपेवाचून अन्यत्र कृपायाचनेची बुद्धि आम्हांला न होवो एवढीच आमची प्रार्थना आहे.

६०

आत्मस्वातंत्र्य, मुक्तता, ध्यान, आणि ज्ञानाच्या दिग्विजयासाठी खेळ आणि खेळणीं यात गुतवून माता जरी कोठेहि गेली तरी बाळाचा दिग्विजय पाहावा, त्याचे पोषण व्हावे, त्याच्याशीं ऐक्य अनुभवावे म्हणून तिच्या चित्ताची ओढ सतत त्याच्याचकडे लागलेली असते, आणि बाळालाहि सर्व काहीं फेकून आई केव्हा भेटेल हाच ध्यास लागलेला असतो. माझ्या मना ! हा अनुभव जेव्हापासून तूं सोडून दिलास तेव्हा-पासून तुझ्या अपयशाला सुरूवात झाली. हे जाणून तुझ्याकडे सतत नजर लागलेल्या त्या जगन्मातेकडे हा सर्व खेळ सोडून तू केव्हा धाव घेशील ?

६१

आत्मवैभव, परसन्मान आणि देवपूजा तिहींचा आपल्या अगाअगात समावेश केल्यामुळे प्रत्यंगात माधुर्याचा बहर आलेलीं पानापानातून डोकावणारीं फुले ही एक भूलच असून पानाच्या कानात दिव्य डौलानें डोलणारे ते डूलच होत ! ती पानाचीं केवळ आभरणे नसून अतरात्म्या-मधल्या सुरम्य गुजगोष्टी ती पानापानाला ऐकवीत असतात, आणि म्लान झाली तरी आपली परंपरा चालविणाऱ्या कळयाना प्रतिनिधि नेमून ती वृक्षाच्या पायीं समर्पित होतात. फुलाच्या माळा गुफणाऱ्या हे मालाकारा ! लक्षात ठेव, जन्मभर माला गुंफून गुफून एक क्षण जरी तुला हें पुष्प-जीवनरहस्य कळेल तरी जीवनाच्या बगीचात तू कृतकार्य होशील !

६२

पश्चात्तापाने पोळलेल्या मनाला अश्रूंच्या आश्रयानें जी अंतर्मुखता प्राप्त होते तेथें त्याचें हरपलेलें श्रेय त्याला अस्पष्टपणें दिसूं लागतें. तेथें कृत-कर्मांच्या हानीचा सर्व हिशेब संपून जातो, आणि नव्या उत्साहाचे दिव्य दालन उघडें होतें. त्यामध्यें आश्वासनाचा भविष्यकाळ भूतकाळाच्या भुतावर मात करील अशी आशादेवीची कारुण्यमूर्ती पाहून चित्त पूर्णपणें निःस्पंद होतें. मग तें आशादेवीची आशा धरून तिच्या स्तुतिस्तोत्रांच्या मनोराज्यांत विहार करूं लागतें. तोंच ती गंभीरपणें म्हणते बाळ ! मी आशा म्हणून तूं माझी आशा धरूं नकोस आणि हें मनोराज्याचें स्वप्न सोड. माझा तुझा आणि सर्वांचा सर्वाधार जो कोणी आहे त्याचींच भजनें तूं गा. त्याच्याच भजनीं तूं लाग. मी याच आशेनें तुजकडे पाहात आहें !

६३

तुझ्या भजनाच्या लहानशा झांजा हरवल्या हातात धरून त्याच्या नादामध्ये गुगून आजपर्यंत मी तुझी किती तरी भजने गाइलीं आहेत. ती आता त्याचा मधुर मित्र गमावल्यामुळे मजवर अप्रसन्न झाली आहेत माझ्या भजनाचे एकमेव साधन मी हरवले तरी कसे? त्या झाजा कोठे ठेवल्या गेल्या? कीं त्या कोणी चोरून नेल्या? की त्याना माझी बेसावधानता न आवडून त्या लपून बसल्या? शोधून शोधून मी दमलो, हताश झालो, निराश झालो. दुमरे काही गेले तरी हे साधन गेल्याचे दुःख झाले तसे दुःख झाले नसते. माझे दारुण दुःख मी कोणाला सागू? सागितले तरी माझी वेड्यातच गणना होईल ना? अरे! हरवल्या तर हरवल्या. दुसऱ्या झाजा घेता येतील. अशी समजूतहि पटेना! त्या दुसऱ्या झाजाना याची सर कशी येईल? याच्या सगतीने मी अप्रत्यक्षपणे तुझी सगति साधली ती का दुसऱ्या झाजानीं साधता येईल? त्या दुसऱ्या झाजातून निश्चितपणे पहिल्या झाजाच्या वियोगाच्या ध्वनींशिवाय दुसरा ध्वनि निघणार नाही! अरेरे! मी स्वतःच का हरवलो नाही? खरोखर त्या झाजा हरवल्यामुळे मी स्वतःलाच हरवून बसल्यासारखा झालो आहे! मी कळवळून म्हटले, "देवा! तूच आता त्या आणून दे! मी शोधण्याचे सोडून दिले आहे." देवाची करुणा धावून आली आणि सहज त्या सापडल्या. त्यानेंच आणून दिल्या आतां मी त्या डोळ्याआड करणार नाही साधन डोळ्याआड झाले की मग काय उरले? देवा, माझ्या हातून ही चूक पुन्हा न होवो साधनाचे विस्मरण हेंच मरण, हे माझ्या चित्तात ठसव! आणि तो ध्वनि या सापडलेल्या झाजाबरोबर मला म्हणू दे—

पतित जनो को करो पुनीता। हे रामसीता! हे कृष्णगीता!

६४

आज करू उद्या करू, म्हणता म्हणतां काळ निघून गेला. कामहि हातात राहिले नाहीं वेग तर नव्हताच मग हातात उरले काय? उद्वेग! माझ्या मना, आता तरी काळ-काम-वेगाकडे लक्ष ठेवशील का?

६५

स्नेहाच्या अमृतधारांनीं शीतलतेला बहार आल्यानंतर रूक्षतेचा त्रास जरी विशेष जाणवला तरी पुन पुन्हा ती घालवण्याचे आश्वासन अव्यक्तात सांठवलेले असल्यामुळे तितिक्षेच्या उपदेशाची जरूर न राहताच उचसखल कसाहि प्रदेश असला तरी तुझ्याच दृढ भूमिकेच्या अधिष्ठानावर तो उभा आहे. हे लक्षात येईल आणि आम्हीं त्या भूमिकेवर पडलो तरी त्याला साष्टांग प्रणाम समजून आमची खात्री आहे कीं, तू आम्हाला उचलून हृदयाशी धरशील!

६६

निद्रेतून जागृति, निर्बलतेतून बल, अप्राप्ताची प्राप्ति सर्व काही तू आपल्या हातात ठेवले आहेस! तुझी झाकलेली मूठ आम्हीं पाहू शकत नाहीं. उघडू शकत नाहीं! पण आम्हाला फार फार आशा आहे कीं, तूं आम्हा बालकांना ओळखरे! काय आहे माझ्या मुठींत? असे म्हणून एकदम मूठ उघडून या तिन्ही गोष्टी आमच्या हातावर ठेवशील! आणि आम्हीं सतुष्ट झालेलो पाहून तूंहि सतुष्ट होशील!

६७

वरून सरक्षण, मधून पोषण, आणि आतून अनत जीवन, या साफल्याची सृष्टि तुझ्याशिवाय कोठून दृष्टीस पडणार? पण ती ओळखण्यालाहि दृष्टि नाहीं अशी अध नसून अधासारखी आमची स्थिती जर असेल तर तुझ्या सृष्टीचा उपयोग काय? म्हणून आमचे एकच मागणे आहे कीं तू आम्हाला दृष्टि दे. तुझ्या सृष्टिदर्शनाचे महाद्वार मोकळे कर. त्यामधूनच तुझ्या उपासनेसाठीं आम्ही तुझ्या मंदिरात दाखल होऊ

६८

वाणीच्या एकाच सूत्रात सर्व वस्तूना गुंफून त्याच्या गुणाचीं लेणीं लेवून मन डौलानें विहरू पाहते, तेव्हा त्याला प्राणमय करण्याला बोधाचे भव्य वाहन पुढे करून त्यात पुढेच तू बसतोस त्याच वेळीं तुझ्या सारथ्याची खरी कल्पना येते. राजरस्त्याच्या बाजूने दुतर्फा हजारो डोळे तुझ्याकडे लागलेले असतात तेव्हा तुझ्या रथाच्या चाकाच्या भूमीवरच्या विशिष्ट भ्रमणविन्यासात तुझे जे नियमनपाटव दिसून येते ते आमच्या चित्तावर कायमचे ठसत जाते! तुझी केवढी कृपा आणि आमची धन्यता!

६९

आकाशांतल्या भूमींत चंद्रसूर्यांच्या बीजांची पेरणी करून लाभलेल्या अद्‌भुत आणि अमाप पिकाची साठवण निःसंगचित्तात करीत जाण्याची तुझी रीति आम्हाला ठाऊक झाल्यापासून आम्ही ज्या श्रेष्ठ पुरुषाच्याकडे आशेच्या वेगाने धाव घेतो आणि कधीं काळीं क्वचित् का होईना त्याच्या चित्ताचे द्वार किलकिले होईल म्हणून त्याच्या संगतींतच राहण्याचा प्रयत्न करतो. लोकोत्तर पुरुषाचे चित्त जाणणे ही सोपी गोष्ट नाही, तरी त्याच्या मुखावर आणि हालचालीवर पसरलेली त्याच्या दिव्य चित्ताची ती कांति आणि ती शांति पाहून जगात शंभर वर्षे जगण्यापेक्षा त्याच्या संगतींत अल्पायु होण्यातच आम्हाला शतायुषतेची धन्यता वाटते !

## ७०

मी असे ऐकले आहे की तुझ्या आगमनाचीं पूर्व-चिह्ने अतःकरणातच प्रगट होऊ लागतात. तुझ्या आगमनाचे स्पंदन हृदयाच्या स्पदनाशी साथ करू लागते की हृदयाचे स्पदन तुझ्या आगमनाच्या स्पंदनाशीं साथ करू लागते, काहीच कळेनासे होते. तूं प्रत्यक्ष बोलला नाहीस तरी कानात " मी आलो आहे " या स्वराची मधुरता छेडली जाते. डोळ्याना तू दिसला नाहीस तरी डोळ्यांत तुझ्या दर्शनाचीं दिव्य दर्शने दाटून गेल्यासारखीं होऊन अश्रूच्या धारा वाहूं लागतात तुझ्या पायाला वदन केले नाही. तरी मस्तक तुझ्या पायांवरच ठेवलेले आणि तुझ्या हातानीं ते उचललेले भासू लागते नैवेद्य पुढें न ठेवूनहि तुझ्या सतत आठवणीनें साठवलेले निवेदन तुझ्यापुढें ठेवल्यासारखे भासू लागते ! तू येण्यापूर्वींच जर ही अवस्था तर प्रत्यक्ष तुझे आगमन झाल्यावर मी माझा तरी राहीन काय ? मी बावचळल्यासारखा तर होणार नाही ? या शंकेने माझें हृदय शोकाकुल झाले आहे हे शोकाच्या आणि सशयाच्या परतीरावर नेणाऱ्या माझ्या प्रिय-सहृदा ! तू येण्यापूर्वीं माझें हृदय निःसशय कर आणि तुझ्या-माझ्या भेटीतले सर्व अनराय दूर कर !

## ७१

हे देवा ! हे माउली ! डोळे असून तुझें क्षणभरहि दर्शन नाही म्हणजे मी आधळाच ना ? तू दर्शन देऊन मला खरा डोळस कर ही तळमळहि माझ्या ठिकाणी नाही म्हणजे मी आंधळ्याहून आंधळा झालो. हे आई ! हे माउली ! तुझ्या ह्या लहान मुलाला काहीच कळत नाही. तूच त्याला तळमळ दे. तो नको म्हणत असला तरी तूच त्याला दूध पाज. त्याच्या पालनपोषणाची सर्व जबाबदारी तुझ्यावरच ना ? तो अगदीच लहान अजाण लेकरू. त्याला काय कळते बरें !

## ७२

रात्रभर पाऊस पडला. ईश्वराच्या कृपेचा वर्षाव होत होता. सगळे निजले होते. त्या दयामयाची आम्हाला नकळत आमच्यावर किती कृपा होत असते. आम्हाला त्याचा पत्ता तरी असतो का?

## ७३

अनित्यतेत नवीनपणाचे रूप घेऊन तुला माझ्याकडे डोकावून पाहताना ओळखला रे ओळखला असे मी म्हणतो न म्हणतो तोच तूं सटकून दूर दूर जाऊ लागतोस. जो जो दूर जाऊ लागतोस तो तो तू हृदयात पक्का ठसत जातोस आणि तुझी दूरता अगदीं जवळ भासू लागते ती जवळ भासू लागली की तूं तिच्यातहि लपून जातोस. हा तुझा लपंडावाचा खेळ कोठपर्यंत चालेल? ही गोष्ट निश्चित आहे की हा खेळ सोडून तू केव्हा ना केव्हा प्रगट होशीलच या आशेनेच मी खेळात सामील झालो आहे!

## ७४

स्नेहाच्या नवीन नवीन नवलाने माझ्यातून मी मुक्त होत आहे. या मोकळेपणाचा अनुभव एकीकडे येत असतानाच मला नकळत अधिकाधिक बद्धतेच्या पाशात पडावे लागले त्यामुळे स्नेह आणि मी दोहोतून माझी मुक्तता कशी होईल या द्विविध पेचांत मी सापडलो. इतक्यात माझ्याकडे ये एकविध, द्विविध, शतविध कसलीहि बद्धता माझ्याशी बद्ध झाल्यावर टिकणार नाही मी तुझ्याशीं बद्ध होऊन तुला मोकळा करीन हा अतरात्म्याचा आवाज मी ऐकला आणि त्याच्याशी बद्ध होण्याच्या पाशाचे दासानुदास होण्याचे मी ठरवले!

७५

श्रोतृत्वाच्या उपाधीला दूर करून अत्यत एकांत स्थानी मी तुझ्या गायनाचे आलाप आलापीत असता मला दुरून कोणाचे तरी विलाप ऐकूं आले म्हणून मी माझे गाणे बंद करून जो जो तिकडे जाऊं लागलो तो तो त्या विलापानी तुला लवकरात लवकर गाठण्याचे साधन सपादन केलेले माझ्या लक्षात येऊन मी धावू लागून त्या विलापकर्त्याचे पाय धरले, कारण तुझ्यासाठी विलाप करण्याने तुझी प्रत्यक्ष गाठ पडेल तशी केवळ तुझ्या गायनाच्या आलापानें पडणार नाही याची त्या विलाप करणाऱ्याकडून मला गुरुदीक्षा मिळाली ।

७६

जे जे पहावे ते ते तुझ्यापायी वाहिलेले आहे. हे माझ्या लक्षात न येता फुलेच तेवढी तुला वाहावी या भ्रमांत आजपर्यंत फुले वेचण्यांत मी घातलेला वेळ केवळ व्यर्थ गेला असे नसले तरी तुझ्या पूजेची केवळ एकविध कल्पना त्यामुळे माझ्या मनात शिरली. आणि तुझ्या बहुविध किंवा सर्वविध महापूजेच्या लाभाला मी अतरलो. ही तुझी पूजा माझ्या अतःकरणात चाललेली मला केंव्हा दिसेल ? आणि मी अत्यत शोभिवंत अशा तुझ्या सर्वात्ममूर्तीपुढें केंव्हा लोटागण घालीन ?

७७

तुझा प्रसाद थोडा असला तरी त्यातली गोडी थोडी नाहीं. त्यामुळे माझ्या सतोषाला सीमा रहात नाही त्यामुळेच तुझ्या प्रसादाची भूक एकसारखी वाढत जाऊन तुझ्यापुढें मी एकसारखा हात पसरीत जातो तरी मला अधाशी किवा हावरा न मानता उलट पूर्ण सतोषानें अनत हस्ताने माझ्या समोर प्रसाद देण्यासाठी तूं उभा राहतोस. तेव्हा मीच प्रसादरूप होऊन प्रसादाचे देणे घेणे थाबते. आता मी जो प्रसाद झालो तो प्रसाद देवा तू स्वीकारशील ना ? या माझ्या प्रश्नानें तुझ्या प्रसन्नतेची कळी अधिकच खुलली आणि मी कृतकृत्य झालो

७८

परमोच्च स्थानावर राहून ज्याना क्वचित् कधीकाळी उपयोग होईल अशाच्या संग्रहाच्या जबाबदारीची भूमिका घेऊन तू जेव्हां आमच्या नजरेस पडतोस तेव्हां तुझ्या थोरवीने आमचे अतःकरण भरून येते ! तुला हात जोडून आम्ही एवढेंच विनवितों की आता आम्ही जे हीन दीन त्यांनाहि तूं आपल्यात केव्हा समावून घेशील ?

७९

तीव्र आघाताने स्वतःला तयार करून, निश्चिततेत पक्के रोवून, बलिदानाच्या रगाने रंगून अव्यवस्थित आणि निराधार जीवनाला आधार देण्याचे तुझे मूर्तिमत आवाहनहि आम्ही ऐकत नाही तरी आम्हाला तू दड देत नाहीस. तू आमच्या उद्धाराच्या लालसेने रात्रंदिवस वाट पाहत असतोस आणि हाका मारीत असतोस. हे देवा ! या हाकेला 'ओ' देण्याची सुबुद्धिहि तूं दे आणि आम्हाला लवकरात लवकर आपणाकडे ओढून घे !

८०

तुझ्या ठिकाणची गाढता उत्तरोत्तर इतकी गाढ होत गेली की तिला सकोचाने तर घेरले नाही असा भास होऊ लागला, परतु अनततेला धक्का न लावता तुझी गाढता नित्य वर्धमान होत असल्यामुळे तेथे सकोच-विकासालाहि अवकाश राहिला नाही अशा त्या अद्वितीय स्थितीत कोणतीहि अपेक्षा करावी आणि ती फलद्रूप व्हावी, कोणताहि अर्थ सार्थ व्हावा आणि कुठेहि जावे तो अत्यंत प्रेमाने स्वागताचे सौदर्य-निकेतन पुढें उभे राहते असा अनुभव येऊ लागला. आता या अनुभवा-मृतात प्रवेश करून स्थिर व्हावे एवढेंच शिल्लक राहिलें आहे!

८१

मी जेव्हा नित्यशुद्धतेची नित्यपूजा आरभिली तेव्हा तिच्यासाठी मला काहीच करावे लागले नाही. असा अनुभव येऊन मी मोकळाच्या मोकळा राहूं लागलो. त्या निर्बंद्ध स्थितीत मनावरचे भूतभविष्याचे सर्व दडपण दूर होऊन केवळ वर्तमानहि मजबरोबर आहे किंवा नाही अशी माझी अगदी हलकी स्थिति होऊन जणू मला आकाशाच्या पोकळीत केव्हाहि विहार करण्याची सिद्धि प्राप्त झाली असे वाटू लागले. जर आकाशातच भ्रमण करावयाचे असेल तर आकाशगमनसिद्धि उपयोगी नाही. त्याच्यापलीकडे जावयाचे असेल तरच तू तिचा उपयोग कर अशी सूचना मिळाल्यामुळे आतां या मोकळेपणाच्या पोकळीपलीकडे असलेल्या तुझ्या स्वरूपात प्रवेश करावा म्हणून मी तुलाच आळवीत आहे!

## ८२

अमुक करावे म्हणून ठरवितो, पण होते निराळेच ते निराळे तुझ्या इच्छेने होत असल्यामुळे तुझी इच्छा कळण्यासाठीच मी माझी इच्छा वापरू लागलो आहे पण तुला हें पसत नसेल तर माझ्या इच्छेवाचून तुझी इच्छा कळण्याचे सामर्थ्य मला दे, एवढीच एक इच्छा मी आता तुम्हापुढें माडतो.

## ८३

अधारातल्या खाबाने मला गुरूस्वरूप दाखवून माझे प्रपंचभय दूर केले. त्याला सत्य न मानता मी त्याच्या ठिकाणच्या गुरूमूर्तीलाच सत्य मानू लागल्यामुळे मी भ्रमिष्ट म्हणून मजकडे पाहणाऱ्याची प्रपचातली भयावह दुर्दशा पाहून डोळयाना प्रकाशात दिसते तेवढेंच सत्य मानण्याकडे कोणाचा कितीहि कल असो मी मात्र अतःश्चक्षूनी जेथें समाधान मिळते तेच सत्य मानून त्याबद्दल 'सत्यमेव जयते' असेहि म्हणण्याला मागेपुढें पाहत नाही.

## ८४

कोणताच सबध नसून सर्वसबध असलेल्या तुला त्या त्या रूपानीं पाहूनहि माझे समाधान झाले नाही. तेव्हा सबध-असबंधाच्या पलीकडे असलेल्या माझ्यातच तुझे रूप मी न्याहाळले आणि तेथे ते पूर्ण समाधानानेच घडलेले दिसले. तेव्हा त्या रूपात 'मी' लोपवून मला तुला सोपवून दिले. आता हे माउली! मला मुलाला तुला सांभाळावेच लागेल! नाहीं का?

८५

अमरत्वाचे तुझें काम योग्य तऱ्हेने करता यावे म्हणून तू आम्हाला दीर्घजीवनाच्या पाठशाळेत दाखल करून घेतले आहेस. आणि प्राणमय कृतीच्या पाठानी व प्राणप्रिय मैत्रीच्या खेळानी आमच्या पाठशाळेला कधीहि कटाळू नये इतकी ती तू आवडती बनविली आहेस. ती सोडत असताना आम्हाला दुःख होऊ नये आणि आम्हाला सतत तिचे सहाय्य मिळावे म्हणून पाठशाळेचा आणि तुझा आमचा सबध तू अबाधित ठेवून खऱ्या गुरूकुलाला शोभविले आहेस. तूं गुरुदक्षिणा मागत नाहीस पण हे जगद्गुरो ! तुला आत्मसमर्पणाशिवाय कोणती गुरुदक्षिणा देणार ?

८६

बुद्धीला सदैव उच्चता देऊन तिला सुखशातीत निमग्न करण्याचा तुझा नित्यक्रम पाहून आकारापेक्षा गुणकर्मालाच खरे महत्त्व आहे हें आमच्या लक्षात येऊन त्याप्रमाणे आम्ही आमचा आयुष्यक्रम राखला पण सर्वानाच तशी सद्बुद्धि झाल्याशिवाय तो यशस्वी होणार नाही. म्हणून हे प्रभो ! सर्वाना तशी प्रेरणा देऊन आम्हाला सर्वांना यशस्वी करण्याचे यश तुला मिळो हेच आमचे मागणे आहे.

८७

अतःकरणाची खोली वाढवीत गेल्यामुळे सर्वाची अतःकरणे आमच्या ठिकाणी समाविष्ट झाली. त्यामुळे शुद्धता, निश्चितता आणि विपुलतेचे आम्हाला सतत दर्शन होऊ लागले इतकेच काय पण आजूबाजूची रुक्षता जाऊन तेथे फळा-फुलानी बहरलेले मळेच मळे दिसू लागले. या मळ्यात येऊन तू केव्हा विश्राति घेशील आणि केव्हां आम्ही आमच्या मळ्यातली फुलेफळे अर्पण करू याचीच आम्ही वाट पाहत आहोत. कारण तुला अर्पण केल्याशिवाय हे सर्व जीवन सफल असूनहि निष्फळ ठरेल.

८८

जागृत्स्वप्नसुषुप्तीचा परस्परावर परिणाम होतो पण तुरीय अवस्थेवर कशाचाहि परिणाम होत नाही तुरीय अवस्था सर्व अवस्थाना व्यापून पुन्हा अलिप्त असते तुरीय अवस्थेचा सर्व अवस्थावर परिणाम होतो. तुरीय अवस्था प्राप्त झाल्यानतर जागृति, स्वप्न, सुषुप्ति त्या मधुर अवस्थेत बुडून जातात. त्या मधुर स्थितीत सर्वच मधुर बनते. "मधुराधिपतेरखिल मधुर" हा अनुभव सर्वत्र येऊ लागतो. तेथे सर्व सगति लागते परस्पर-विसगति, परस्पर-विरोध कोठेच रहात नाही. एकाच त्या सुरात अनेक रागरागिण्या आलापिल्या तरी तो सूर कायमचा सर्व व्यापून उरतो. सर्व-व्यापक तत्त्व जितके जितके विकसत जाते तितके तितके ते शातीचि मधुरता निर्माण करते तुरीय अवस्था सर्वव्यापक अवस्था असल्यामुळे जागृतीतले ज्ञान, निद्रेतली विश्राति, स्वप्नातला स्वेच्छ सचार तीहीचे सार तिच्यात समाविष्ट होऊन त्याची एकागिता नष्ट होते. आणि तीहीच्या पलीकडची सदोदित नवी वस्तु तीत अनुभवली जाते जागृतादि अवस्था जुनाट बनत जातात पण ही अवस्था सदैव नवी राहाते ती कालातीत व कलातीत म्हणावी लागते. कालातीत असून ती अनुभवास येत असते. तो अभौतिक अनुभव !

८९

आधींच जाग. मग उपाययोजना करण्याऐवजी आधीच उपाय-योजना केलीस तर तिचा अधिक लाभ होईल. समोरचे दार गंजून अगदी तुटून पडले म्हणजे मग सुताराला बोलवावयाचे त्याऐवजी आधीच का उपाययोजना करूं नये ? जन्ममृत्यु, जरा, रोग, दु ख, दोष ही आधीच हेरली पाहिजेत. मागून विचार करून त्याचा काय उपयोग ? निश्चित गोष्टीचाहि विचार केला जात नाही. तेथें अनिश्चित एकाएकीहि काही गोष्टी उद्भवतील याचा आधी कोण विचार करतो ? आणि कित्येक लोक याला वीरता समजतात. 'अरे' मरायचे तेव्हा मरणारच त्याचे आधीच दुःख कशाला ? खुशाल खावे, प्यावे, मजा करावी, आनदी असावे. व्हायचे ते होईल तेव्हा पाहले जाईल ! असे ते म्हणतात– ही वीरवृत्ति का आहे ? भावी विषमकाळाचें दु.ख नकोच करायला पण उपायचिंतन नको का ? उपायाचितन कोणते ? ते विविध तऱ्हेचे असेल. पण मुख्य म्हणजे सर्वाधार परमेश्वर त्याचें चितन. तोच बरोबर उपाय सुचवील ही श्रद्धा सतत हवी. तो समतेची समता, वैद्याचा वैद्य, दुःखातला आधार, दोषाला परिवर्तिन करणारी निर्दोपता आणि मृत्यूचाहि मृत्यू आहे हे सतत स्मरण राहील ना ?

९०

मला तुझी बरोबरी करणे कधींहि शक्य नाही. पण माझा उद्धार करून मला तू आपल्या बरोबरीचा केलास. त्यानेहि जेव्हा मला समाधान होईना तेव्हा तू क्षणभर आपल्यापेक्षा हि माझी उंची वाढवलीस. मी तुझ्यावर विनाकारण रागावलो तरी प्रसन्नतेनेच तूं माझ्या कटुतेचे निवारण केलेस माझ्यांत सामान्य वस्तु प्राप्त करण्याचेहि सामर्थ्य नसता मला निरनिराळ्या मधुर आणि अप्राप्य वस्तूचाहि लाभ करून दिलास, इतकेच काय पण हे देवा ! तूं स्वतः देव असून मला देवमंदिरात नेलेस आणि तेथला तीर्थप्रसाद दिलास— या सर्व आठवणींनीं माझे हृदय भरून येते ! यापुढें माझ्या हृदयात तूंच भरून रहा, या पलीकडे माझ्याने आता काहीच बोलवत नाही !

९१

या होडीने मी तरलो तिचा केवढा मोठा उपकार ! परतीराला जातां जाता मी कृतज्ञतेने होडीकडे पाहू लागलों तो काय, क्षणार्धात ती दुसरे उतारू घेऊन ऐलतीराला निघून गेली ! कृतज्ञता ऐकण्यालासुद्धा ज्या वस्तूला परोपकारकार्यांत फुरसद नाही ती वस्तु परमेश्वरमूर्तिच नव्हे काय ?

९२

तू आलास आणि हाक मारलीस. परतु तुझी हाक ऐकूनहि मी जागा झालों नाही. तू निघून गेलास तुझा काय, दोष ? उलट मला तूं झोंपेंतून जागवले नाहीस. माझ्या विश्रातीत अतर पडू नये ही तुझी सद्भावना. पण मला तू जागविले असतेस तर किती उपकार मानले असते मी ! पण तुला माझ्या या मनःस्थितीची कल्पना नाही पण तसे तरी कसे म्हणू ? इतकी तळमळ होती तर जाग का नाही आली मला ? तळमळ होती पण नव्हती असेच ना मी समजूं ?

९३

जमा आणि खर्च केवळ अर्थविषयकच पाहण्यात कार्य अर्थ आहे? परमार्थविषयक, सेवाविषयक, ज्ञानविषयक, भक्तिविषयक जमाखर्च आत्मनिरीक्षणानेच कळेल तेथे आकड्याचा वाकडा हिशोब चालणार नाहीं. तेथे सरळपणावरच सर्व काही अवलंबून राहील देवा! हा सरळपणा तू मला केव्हा देणार?

९४

ही प्रत्यक्ष रात्र आणि हा प्रत्यक्ष दिवस दोहोत किती फरक! एक शांतीची मूर्ति आणि दुसऱ्यात प्रवृत्तीच प्रवृत्ति! हे जीवा, तुला काय हवे? मोठा पेच पडतो दोन्ही हवे म्हणण्याला समत्व हवे दोन्ही नको म्हणण्याला विलीनभाव हवा. एक हवे आणि दुसरें नको म्हणण्याला विभक्तता हवी. देवा, मला शांति हवीच. प्रवृत्ति हवी पण तुझ्या ठिकाणची हवी, एवढेच मी म्हणतो. मला दिवसरात्र हे दर्शन नकोच.

९५

सर्वसंपन्नता कोठेच नसते पण समजा, कोणाच्या ठिकाणी ती असेल तर तिने काय होणार? उलट उणीवेमुळे संपन्नतेला जी किंमत राहते ती किंमतहि येथे राहणार नाही. म्हणून देवा! मला संपन्न करूं नकोस. संपन्नतेचा आदर माझ्याठिकाणी राहू दे, आणि ती संपन्नता सर्व प्रकारें सुरक्षित असलेली मला पाहूं दे!

## ९६

न्यायालयांत न्याय मिळतो की केवळ निवाडाच होतो ? न्यायालयात कधी कधी न्याय मिळतो. कधी कधी अर्धवट न्याय मिळतो. कधीं कधी अन्याय पदरात पडतो. निवाडा मात्र होतो. पण तोहि ताबडतोब होतो असे नाही. निवाडा हीहि महत्त्वाची गोष्ट आहे. कोणता तरी एक किनारा गाठला म्हणजे मनुष्य मार्गक्रमण तरी करूं शकतो. पण ईश्वराकडे गेल्याने न्याय, निवाडा, दया तीहींचा लाभ होत असल्यामुळे अनिश्चित न्यायालयाची पायरी चढून काल, शक्ति आणि द्रव्याचा अपव्यय करण्यापेक्षा हे जीवा, ईश्वराकडेच तूं जा तेथें न्याय, निवाडा, दया याशिवाय तुला आणखी भक्तीची प्राप्ति होऊन ईश्वराच्या दरबारातून तुला पुन्हा परत यावे न लागता तेथेच ईश्वर तुझ्या योगक्षेमाची व्यवस्था करील !

## ९७

बापाच्या बापाच्या बापाच्या बापाचा बाप असे कोठपर्यंत मागें जाणार ? हा मागचा माग कोठपर्यंत काढीत जाणार ? मोठमोठ्या राजाच्याहि वंशावळी जेथे लुप्त झाल्या तेथे आपली वंशावळ कोठपर्यंत लावणार ? म्हणून अधिक मागे पाहण्यात अर्थ नाही. हे जीवा ! ‘मागे पुढे उभा सांभाळीत’ अशा त्या एका ईश्वराचे स्मरण करावे म्हणजे त्यात सर्व पितृस्मरण सहजच येऊन जाईल !

९८

या समोरच्या झोंपडींत तुझें वास्तव्य आहे. अनेक वळणाच्या गुफणीबरोबर मधून मधून मुक्ततेची योजना केल्यामुळे तुझ्या आकाराचा प्रकार साधेपणाच्या अमूल्यतेला सुशोभित करतो म्हणूनच अनेक सुमनाचे तेथे एकत्रीकरण सहजपणे होऊ शकते ते सर्व भिन्न भिन्न सौमन्यस्य तुझ्या ठिकाणी नाना कोमल वर्णाच्या दडपण नसलेल्या अभिन्न राशीचे दर्शन करविते. आता त्याच्या माळा बनोत की गुच्छ बनोत, आता झालरी, जाळ्या, गजरे काहीहि तयार होवो. त्याची सगळी तयारी तुझ्या वाहनात केवळ परमेश्वराला मंडित करण्यासाठीच झालेली असल्यामुळे तुझा परमेश्वराच्या दरबारापर्यंतचा प्रवास अतिशय हळुवारपणाने, सावधपणाने, पवित्रतेने करविण्यात सर्वांची प्रत्येक चढाओढ लागते. आणि त्यात कोण्या भाग्यवताच्या हातातून तू परमेश्वराच्या दरबारात दाखल झाल्यावर सर्व तुझ्या दर्शनात दंग होऊन जातात. आणि एकदा तू परमेश्वराच्या पायापर्यंत पोचलीस, सगळ्या माळा, गुच्छ, झालरी, हार, तुरे तुझ्याद्वारे त्याच्यावर वाहिले गेले म्हणजे तुझी रिक्त मूर्तिहि लोकाच्या नेत्राचा एकच एक विषय होऊन तू पुन्हा परत आपल्या झोपडीत प्रवेश करतेस. ती तुझी झोपडी आणि तुझें जीवन खरोखर आमच्यासारख्या साधकाना साधनेची साधनाच वाटते आणि तुझा हेवा न करता आम्ही प्रार्थना करतो की आम्हालाहि तूं तुझ्याप्रमाणे बनव.

## ९९

बाळपणात निसर्गाच्या सान्निध्यातले आरण्यक जीवन, तारुण्यांत अधिकाराची तुच्छता, उद्योगाचे सातत्य, परदुःखकातरता, आत्मसुखाचा संतोष, वार्धक्यांत परावलंबन आणि एकूण भौतिक जीवनाची समाधि-योगाने समाप्ति अशा एकेक वरच्या पायऱ्या चढत चढत प्रभुपदी लीन झालेल्या योग्याची कल्पना दुधाला मिसळलेल्या साखरेची यावी तशीच ती असणार यात नवल नाही. नवल हेच की माझें चित्तरूप दुग्ध आतां साखर बनण्यावर मुग्ध झाले आहे।

## १००

महापुराच्या आगमनाशिवाय सर्वत्र शुद्धीचे आणि समृद्धीचे दर्शन होणे दुष्कर असल्यामुळे तुझ्या कृपेच्या महापुराची मी वाट पाहत असतो. पण वाट किती पहावी? महापूर ही निश्चित गोष्ट नसल्यामुळे तुझ्या कृपेच्या बिंदूलाहि महापूर समजून तो तरी निश्चित माझ्या मुखात पडू दे. अशा काकुळतीला मी आलो तरी ना महापूर ना बिंदू अशी माझी स्थिति तू का करतोस? एवढे तरी मला कळू देशील का? माझ्या उणीवेला पार नाही. हेच तर तुझ्या कृपेला मोठे आवाहन आहे. ते तूं कधी स्वीकारणार? ते न स्वीकारण्याची उणीव तुझ्या ठिकाणी न रहावी एवढें तरी तू पहाशील का?

१०१

नियमिततेने जेव्हा निश्चित कृतीला आपलेसे केले तेव्हा नवनिर्मितीची पाऊलवाट दिसू लागली. परतु स्फूर्तींच्या राजरस्त्याला लागण्यासाठी कोणी उपाय सागेल या आशेने मैल न् मैल त्या वाटेने निर्जन अरण्यात फिरलो तरी कोणीच भेटेना निर्देश करणारी एखादी पाटी, एखादा खुणेचा दगड दिसेल म्हटले तर त्या बाजूनेहि निराशाच पदरात पडली. एखादे जगली फळ खावे, एखाद्या झुळझुळ वाहणाऱ्या झऱ्यावर पाणी प्यावे, थकवा आला तर खुशाल घनदाट वृक्षाच्या छायेत झोपावे, कोणाचीहि मनाई नाही. अशी जरी तिथली स्थिति होती, तरी अरण्यातल्या पशूचे भय कमी नव्हते त्यामुळे जरा कोठें आवाज झाला की पोटात धस्स होऊन झोपण्याचा कार्यक्रम सोडून थकलो तरी पुढें जाण्याशिवाय गत्यतर राहिले नाही. रात्र झाली तरी झोपण्याची शक्यता नव्हती पण गाढ अधारामुळे त्या पुसट पायवाटेने चालणेहि शक्य होईना. अशी अगतिक स्थिति झाल्यावर तोडाने तुझ्या नावाचा आश्रय घेऊन, कशीबशी रात्र हळूहळू चालत काढल्यावर तुझ्या कृपेचा अरुणोदय झाला. जिकडे तिकडे दशदिशा तेजाने उजळून निघाल्या आणि स्फूर्तींचा राजमार्गहि त्याच वाटेने मिळवून दिला. आता त्या स्फूर्तींने तुझीच कवने आणि तुझींच गाणीं गात गात जरी निद्रारहित थकला भागलेला असलों तरी हे देवा ! तुझ्या गावात येऊन एकदम तुझ्याच दाराशीं उभा राहीन अशी उमेद वाटूं लागली आहे. तेव्हां इतकेच मागणे आहे की, इतका पल्ला गांठल्यावर तुझें दार उघडें राहूं दे ! ते बद करू नकोस !

१०२

तुझ्या आगमनाची वाट पाहून पाहून आम्ही थकलों. आमची तुझ्या आतिथ्याची सर्व तयारी फुकट गेली. ती फुकट गेली म्हणून आम्हाला इतके वाईट वाटले नाही जितके तुझ्यासाठी बनवलेल्या कुशल वस्तु आम्हाला अन्य जनाना वाटण्यामुळे वाटले नतर तू येणार नाहींस असे समजून आम्ही कोणतीच तयारी केली नसताना तुझें एकाएकीं आगमन झालेले पाहून आम्ही आनदित झालो तरी अगदी गडबडून गेलो. आतां ऐनवेळीं आम्ही तुझ्यासाठी काय करावे ते कांही आम्हाला सुचेना. इतक्यात तूं मागून येऊन आमच्या पाठीवर हात ठेवून विचारलेस, ही एवढी तयारी कशासाठीं करता ? ते ऐकून आम्ही अतिशय लज्जित झालो ! अरेरे ! आमच्या आवडीप्रमाणे त्याच्यासाठी आम्हाला काहीं करता आले नाहीं. जेव्हा केले तेव्हा तो आला नाही. अशा मनःस्थितीत असतांनाच त्याने एकदम पुढें होऊन स्वतः आणलेला प्रसाद आमच्या तोंडात घातला. तो खाल्ल्यानतर आम्ही काहीहि केले असते तरी त्याच्या प्रसादासारखें करताच आले नसते. याविषयी आम्हाला शका राहिली नाही. मग सर्व सकोच सोडून निःशंकपणे आम्ही त्याला म्हटले—हे आमच्या प्रियसुहृदा ! आम्हाला तू आणलास तसा प्रसाद तयार करण्याला शिकव म्हणजे आमचा सर्व विषाद कायमचा नष्ट होईल !

अचानक येऊन ज्ञानाच्या साधनेने सपन्न झालेल्या दीर्घ अनुभवाची उदार देणगी पुढें ठेऊन उपकृत करण्याची अपूर्व रीति, जीर्णतेवर मात करून बेफिकिरपणाने आणि दिलदारपणानें वागण्याची स्नेहमयता, सर्वांना ऋणी करून कोणाचेहि ऋण यत्किंचितहि राहूं न देण्याची दक्षता, या दिव्यतेवर उभारलेल्या तुझ्या दर्शनाने जी आनंदाची लयलूट झाली ती जणूं पुष्कळ काळ वाट पाहिल्यानंतर आलेल्या पावसाच्या अमृतवृष्टीप्रमाणे ठरून ही सगति पुढें लाभावी या लोभाने तुजकडे केव्हां

आणि कसे यावे याची चिंता प्रगट केली तेव्हा अगदीं मोकळेपणानें "केव्हाहि कसेहि या, मजकडे नेहमीच मुक्तद्वार आहे." हे तुजकडून उत्तर मिळाले! हे देवाधिदेवा! खरी गोष्ट आहे. तुजकडे मुक्तद्वार आणि मुक्ति सहज आहे. पण आम्ही आमचीं बंधने तोडून तुजकडे सहज आणि केव्हाहि केव्हा येऊं हेंच कोडे पडले आहे तुझ्या सगतीची ओढ वाढून ती अतिशय तीव्र होईल तेव्हा हें कोडे सुटेल या आशेवर आतां आम्ही जगत आहोत.

## १०३

स्नेहाच्या मधुर मार्दवात मुरून पूर्णतेच्या विकासासाठी केवढीहि गतिशीलता प्राप्त होवो, तिला दिव्य तपस्येची जोड मिळेल आणि स्वतःच्या ठिकाणी शून्यतेची परिपक्वता निर्माण होईल तेव्हां लोकोपयोगाच्या भाषेची ओळख होईल. त्यांतहि लोकोपयोग हा आत्मदर्शनाचे साधन म्हणून आपल्यासाठीच आहे अशी अतःकरणाची खात्री होईल आणि मग सामुदायिक सहकाराच्या प्रदेशात प्रवेश होऊन तुझ्या उत्सवात आम्हाला सामील होता येईल. आणि त्यांतील सेवाकार्य पार पडेल. त्या तुझ्या अपूर्व आणि अपार उत्सवप्रसंगांत आम्हाला सामील होण्याचे भाग्य आणि योग्यता तूंच देशील तर हे होईल. आमच्या बळावर हे होण्याची शक्यता कोठली?

## १०४

अहो ! मधून मधून डोकावून का बघता ? आत का येत नाही ? या प्रश्नाला बाहेर राहून मधून मधून डोकावूनच तुम्ही उत्तर देता. प्रश्नाला उत्तर देण्याची ही रीति अद्भुत आणि अतिशय मनमोहक आहे. कारण तीमध्ये स्वतःच्या कृतीवरच निष्ठा मुद्रांकित झाली असून प्राणमय अनाग्रही भूमिकेचा अतर्भागस्थ आम्हाला लाभ करून देण्याचा हेतु आहे. तो हेतु तूर्त साध्य झाला न झाला तरी तो शेवटी साध्य होईलच ही तुमची खात्री आहे. याची आता खात्री पटल्यामुळे तुम्हाला प्रश्न न करता आता आम्हीहि मधून मधून तुमच्याकडे आतून डोकावण्याला सुरूवात करू आणि परस्पराचा आनंद वाढवू ! तुम्हाला हे मान्य होईल ना ?

## १०५

विनम्रतेने वश करणाऱ्या तुझ्या विशाल वदनाची आणि माझी तुझ्यापूर्वीच ओळख झाली पक्षाने विशाल आकाश बाजूला सारीत सहज सचार करीत यावे, त्याप्रमाणे स्वतःला बाजूला ठेवून तुझे वदनच सतत सचार करीत येत असते याचे मोठे कौतुक वाटते. स्वतःला अलग ठेवून त्या कौतुकात गुंतवून तूं स्वतःला लपवीत आहेस. हे जेव्हा माझ्या लक्षात आले तेव्हा वंदनाच्या पलीकडच्या तुझ्या श्रीमूर्तीवरच माझी दृष्टि खिळली आणि त्या दृष्टीत जेव्हा तू ठसून गेलास तेव्हा हे परमेश्वरा ! मी सर्वत्र, सर्वकाळ तुझ्या वंदनाचाच दिनक्रम आणि जीवनक्रम निश्चित केला !

१०६

आधीं जाण्याची कोण घाई ! जाण्याची वेळ ठरली हे वाहन चुकले ! आता पुढच्या वाहनात जावे ! तेहि चुकले आता या माणसाबरोबर जाऊं. तोहि गेला ! असे करता करता तू आज जाण्याचे रहित केलेस. आम्हाला किती आनंद झाला ! आमच्या प्रेमाच्या ओढीमुळे तुझा आज दिवसभर समागम घडेल हे खरेंच पण ती जाण्याची घडी उद्या येईलच. प्रेमामुळे एखादा दिवस लाबला तरी अधिक लाबणे शक्य नाही. मग वाटले आता उद्याचा दिवस उजाडणार नाही तर किती बरे होईल ! हाच दिवस पुष्कळ – अगदी पुष्कळ लाबेल तर किती मजा येईल ! — पण वेडया मना, प्रेमप्रमगात गेलेला वेळ कितीहि लाबला तरी तो लाबलेला वाटतच नाही. त्याला तू काय करणार ? — तुला जर दिवस लाबवावयाचा असेल तर प्रेमाची ओढ सोड. ती सुटल्यावर तो कटाळवाणा दिवस खूपच लाबेल. पण असा दीर्घकाल कोणास हवा वाटेल ? म्हणूनच मी म्हणतो माझ्या जिवलगा ! तुझ्याशिवाय अतिदीर्घजीवन मला मुळीच नको. माझी खात्री आहे की तू गेलास तरी आमच्या हृदयाला सोडून कोठे जाणार ?– तू आमच्या सर्वांच्या हृदयात राहून कोठेहि आवागमन कर आमचे काही म्हणणे नाही.

## १०७

वाळत घातलेले कपडे कडक उन्हात केव्हाच वाळून गेले. ते काढले नाहीत तर वाऱ्याने उडून धुळीत पडतील आणि कडक उन्हाने कमकुवत होतील जरी वर वर ही त्याची मलिनता, त्यांचा कमकुवतपणा दिसला तरी मी त्याचे कारण आहे आणि वास्तविक तो माझा कम-कुवतपणा माझी मलिनता आहे. ते कपडे कसेहि असोत त्याचे मजवर अपरंपार उपकार आहेत ही केवळ कपडयाचीच बाब नाही. माझ्या मना ! तुजजवळच्या सर्व वस्तूंविषयी तूं जर हीच भावना ठेवशील आणि त्याची नीट व्यवस्था ठेवशील तर तुझे बघता बघता केवढें कल्याण होईल !

## १०८

विजयाच्या मनोराज्याने अतःकरणातल्या चितनात एकसारखी उलथापालथ झाल्यानंतर विजयानतर चित्ताची काय अवस्था होईल ? आणि विजयाच्या अभावीहि चित्त कसे असेल या विचाराने विजय हा भ्रमप्राप्तीसाठी केलेला व्यर्थ श्रम वाटून हा चित्त-विभ्रम सोडून विश्रामार्थ तुझ्याच चरणाचा आश्रय घेण्याची ही पश्चाब्दुद्धि आधीच सुचती तर किती बरे झाले असते असे वाटले. पण इतके तरी बरे झाले की पुष्कळ आधी ही बुद्धि सुचली. आणि तिने हे बजावले की, बाबा, तुझा इतरावर विजय होण्यापेक्षा, तुझा इतरावर काबू राहण्यापेक्षा, तुझ्या स्वतःवर कोणी तरी विजय मिळवून तुला काबूत ठेवण्याची जरूरी नाही का ? परमेश्वरचरणी आश्रय घेच. पण त्याच्या काबूत राहून त्याचा विजय होऊ दे !

१०९

अनेक प्रकारच्या उपचाराच्या प्रयोगातून आता निश्चित अशा 'एखाद्या निकराच्या प्रयोगाने योग साधले असे जर तुम्ही म्हणत असाल तर हरकत नाही जरी त्यात प्रगति झाली नाही तरी हानि होणार नाही ही खात्री असेल तरच चित्त थोडे तरी तिकडे वळू शकेल, अन्यथा चित्ताला आता नवीन अनुभवाची जरूरी नाही अनुभवाने ते अनुभवी बनत नसून ते उलट निःशक्त बनत असल्यामुळे अनुभवशून्यतेच्या योगाचीच आता ते अपेक्षा करीत आहे अनुभवशून्यतेचा अनुभवी जरी कोणी आला तरी तो मला त्या स्थितीला कसा नेईल ? म्हणून मला तो योगीहि उपयोगी नाही तर आजपर्यंत सतत ज्याचा वियोगच मी अनुभवला आहे त्या ईश्वराशीच मला योग साधला पाहिजे.

११०

तुझ्या वेशाच्या अनुकूलतेच्या अनुभवामुळे तुझे प्रतिकूलतेचे रुद्ररूप कधीच लक्षात आले नाही आणि केवळ तुझ्या अनुग्रहाने एकतर्फी सुखात आम्ही जड बनून गेलो त्या जडतेतून आमची सुटका करण्यासाठी जेव्हा तुझे रुद्रस्वरूप आम्हाला तू दाखविलेस तेव्हा आम्हाला तुझा हेतु तर कळला नाहीच पण हे तुझे का रूप, असाहि सम्भ्रम आमच्या ठिकाणी निर्माण झाला. इतकेच काय पण आम्ही अतिशय भयभीत होऊन गेलो तुझ्या निग्रहातहि अनुग्रह आहे हे आम्हा दुर्बळाना तू कशा तऱ्हेने समजाऊन देशील ? त्याच तुझ्या मुक्तीच्या कुशलतेकडे आम्ही सतत लक्ष पुरवून तुला सर्वांगी केव्हा पाहूं आणि हे देवा ! आमची भीति केव्हा जाईल ?

## १११

भविष्यत् लाभाच्या लक्ष्याने वर्तमानहानीची जरासुद्धा पर्वा न करता कित्येकानी जेव्हा पुढे पाऊल टाकले आणि त्याचे प्रत्येक पाऊल पूर्वीच्या भूमिकेचे विस्मरण करवून केवळ नवाविष्काराची भव्यता सुशोभित करू लागले, तेव्हा वर्तमानहानीच्या सशयाच्या कृपणतेत पडलेले आम्ही पश्चाताप करू लागलो. परंतु आमचा मूळ-स्वभाव आम्हाला सोडीना, आणि त्या अग्रेसर भाग्यवताचे अनुकरण आम्हाला करता येईना. ते कोणाचे अनुकरण न करताच अग्रेसर झाले. तरी त्याच्या उदाहरणाने वर्तमानाची कोडी आम्ही फोडलीच पाहिजे आणि अगतिकतेची दुर्गति टाळली पाहिजे त्यासाठी लागणारी धैर्यशक्ति आणि निश्चितवृत्ति त्याना तुझ्याच कृपेने लाभली तर आम्हालाही त्याचे उदाहरण आणि तुझी कृपा असा दुहेरी लाभ झाला तर आम्ही त्याच्याहि पुढे मजल गाठणार नाही का? या विचाराने आम्ही त्याना आणि हे परमेश्वरा! तुम्हा दोघानाहि एकस्वरूप समजून तुमच्या साह्याने आशा बाळगतो की ही आमची कोडी फुटून पक्षाचे अंडे फुटून ज्याप्रमाणे तो क्रमाक्रमाने आकाशात विहार करतो त्याप्रमाणे तुझ्या विशाल हृदयात आम्ही विहार करू

## ११२

मोहाला माझा मोह पडेल तेव्हा मी मोहाच्या पकडींतून सुटलों असे होईल. मागें-पुढें सर्वत्र उभा राहून माझे मोहापासून रक्षण कर अथवा सगळीकडून मोह माझ्याच आकर्षणानें मोहून मजमध्ये बद्ध होईल अशी व्यवस्था कर पण ह्या दोन्ही गोष्टी घडण्यासाठी मला तुझ्या मोहाने ग्रासले पाहिजे तेव्हाच हे घडेल मला तुझा मोह का पडत नाही ? माझा तरी तुला मोह पडतो का ?— मी जसजसा मोहापासून दूर होईन तसतसा मोहाला आणि तुलाही माझा मोह पडेल तेव्हा मोहापासून दूर होण्याच्या प्रयत्नात तरी हे मनमोहना ! मला तूं मदत कर ! मला तुझा थोडा तरी मोह पडू दे !

## ११३

आता आपल्याला येथून जावयाचे आता सगळी आवराआवर करून सामानसुमान बाधून सर्वांना भेटून त्याना एखादी प्रेमाची भेट आठवणीदाखल देऊन सर्वांचा आनंदानें निरोप घ्यावयाचा आमचे काही बोलण्याचालण्यात चुकलें असेल तर माफ करा, असे म्हणून योगायोगाने आता पुन्हा केव्हा भेटू म्हणून गहिवरून जावयाचे हें दृश्य हे जीवा ! काय तू पाहिले नाहीस ? मग तू असा जड कसा ? तूंहि चिरप्रवासी नाहीस का ? मग तू चिर-रहिवाश्यासारखा जडतेच्या अतिपरिचयाच्या चुका का करीत असतोस ? तुला त्या एका परमेश्वराचाच चिरपरिचय करून घ्यायला नको का ? तुला त्या एका परमेश्वराच्याच ठिकाणी चिररहिवासी व्हावयाचे नाही का ?

११४

ते फूल अतिशय आनदाने फुललेले पाहिले। पण ते तोडून घेण्याचे मी विसरलो. ते म्लान झाले. त्याच्या पाकळ्या मातीत मिसळून त्याच्या सुगंधाने मातीहि सुगधित झाली. माझ्या विस्मरणामुळे व पुष्पजीवनाला मी मातीमोल करून टाकले हा विचार मनात येतो न येतो तोच मातीत त्याची सहज-समाधि निर्माण झालेली होती ती निःस्तब्धतेने म्हणाली, ज्या मातीतून मी पोषण घेतले आणि मला सुकुमारता, लोभस रंग आणि सुगध प्राप्त झाला त्या मातीलाच मी अर्पित होऊन तेथेच माझी अकृत्रिम समाधि निर्माण झाली खरोखर, माझ्या जीवनाच्या यशोमदिरावर हा कळसच चढला आहे हा अव्यक्त ध्वनि ऐकल्याबरोबर सपूर्ण विश्वोद्यानातल्या अर्पित जीवनाची यशोगाथा माझ्या मनामध्ये घुमू लागली आणि मी त्या मातीचा टिका माझ्या कपाळाला लावला. त्या टिक्याने समर्पित जीवनाचे भाग्य माझ्या कपाळी नसले तरी त्या भाग्यवताच्या समादाराचे भाग्य तरी माझ्या कपाळी अकित झाल्याचे समाधान मला प्राप्त झाले.

११५

ते पाहा ! मंदिराच्या प्रहराचे मधुर ठोके पडले. त्यातून सावधानतेच्या सूचनेची मधुर लकेर निनादत आहे. मधून मधून त्या मधूर लकेरी ऐकून जीवाला सुख होते पण सावधानता प्राप्त होत नाहीं. तीमुळे कठोर कर्तव्य बाजूला राहते. ते बाजूला रहावे म्हणून त्या आवाजात मधुरता नसली तरी आणि कर्तव्यात माधुर्य निर्माण व्हावे हाच त्याचा खरा हेतु असला तरी आम्हाला तो मुळीच कळत नाही आणि त्याचा उद्देशहि सफल होत नाहीं. पण त्यामुळे त्याच्या नित्यक्रमात यत्किंचितहि खंड पडत नाहीं. जिकडे तिकडे कर्तव्याची मधुर प्रेरणा निर्माण व्हावी हाच त्याचा निनाद सांगतो. परंतु ती प्रेरणा न झाली तरी निदान एक सतत मधुर कर्तव्य करणारा आदर्श सर्वांपुढे आहे हे त्या मंदिराच्या प्रहराच्या ठोक्यातून प्रतीतीला येते केव्हाही प्रतीति माझ्या मनोमंदिरातली मूर्ति बनेल आणि तिची मी मनोभावाने पूजा करीन ?

११६

खडतर सेवेमध्येच विश्रांति मानणाऱ्या सत् पुरुषाने त्याला विश्रांतीची विनंति करण्यात आल्यावर " आता आम्हाला त्या प्रभूकडेच आपण म्हणता तशी विश्रांति मिळेल. " हे उत्तर देऊन विनंति मान्य केली नाही. आणि विश्रामाचे खरे धाम तोच एक प्रभु आहे हे दाखवून दिले. प्रभूच्या धामाचे सतत स्मरण आणि त्याच्या सेवाकार्याचे खडतर व्रत या जीवनातल्या दोन तत्त्वाची त्याने सहज मांडणी केली. ती त्याच्या जीवनात मुरलेली असल्याशिवाय झाली नाही. आता तो सत्पुरुष प्रभूच्या त्या दिव्य धामात पोचल्यावर तेथे त्याची सेवा थांबेल हाहि भ्रम हे चित्ता ! मनात ठेवूं नकोस. त्याची सेवा आता हवापाण्यातून, झाडाझाडातून, झऱ्याझऱ्यातून मिसळलेली असेल. ती आता दिसली नाही तरी अदृश्यपणे चालूच राहील. ती दिव्य दृष्टीनेच दिसू शकेल !

## ११७

उत्तरोत्तर प्रश्न विकट होऊन, त्याला अनेक फाटे फुटून, तो सुटणे कधीच शक्य नाही. त्या प्रश्नाने आपल्यापुढे विनाशाचाच महा-समुद्र उभा केला. त्याला तरणे शक्य नाही अशा सर्व बाजूंनी निराशेच्या वातावरणाने आम्हाला घेरले असले तरी अरे ! हा प्रश्न बाहेरचा ना ? अतर्गत शक्तीला त्याने धक्का लागला नाही ना ? तर त्या अतर्गत शक्तीची भक्ति कर. वाऱ्यावर भूस उडावा त्याप्रमाणे हा विकट प्रश्न उडून जाईल. तो होता का नव्हता, अशी स्थिति व्हावी म्हणून प्रभूचे अखड स्मरण कर. हा सत्पुरुषाचा उपदेश शेवटी आम्हाला उपयोगी पडला आणि प्रश्न समाप्त झाला.

## ११८

मातीतून सोन्याचे कण शोधता शोधता सोन्याचीच माती प्राप्त झाली आणि माती कोठल्या कुठे लुप्त झाली माती आणि सोने अलग करण्याच्या शोधन प्रक्रियेचा उपयोग न राहिल्यामुळे आमचे शोधन-सामर्थ्यच नष्ट होणार नाही ना ? या शंकेने चित्ताला घेरले तोच चित्ताचेच शोधन करून त्यात सोनें किती, माती किती हे महाविकट कार्य डोळ्या-पुढें उभे राहिले. आणि खरे सोन्यासारखे कार्य लाभल्यामुळे आम्हाला आनदाने आपल्या राजमदिरात अतिशय आनदानें आमत्रण दिलें. त्या आमत्रणाने जरी आम्हाला तात्कालिक आनंद लाभला तरी ते आनंदाचे राजमदिरच कसे आपले होईल हा विचार सुरू झाला आणि एकाएकीं आकाशवाणी झाली—" हे जीवा ! आनंदाचे राजमदिर प्राप्त झालें म्हणजे तुझ्या चित्ताचे पूर्ण सोनें झालें समजून तू आतापासूनच चित्तमशोधनाला लाग. "

११९

आम्हाला माहीत नसलेल्या किती तरी वस्तु आमच्या जवळ आहेत की जर त्याची यत्किंचित् कल्पना आम्हाला आली तरी त्या-योगाने जन्मोजन्मीचा अंधकार विलयाला जाईल. परंतु त्याची कल्पना येण्याच्या आड आमच्या कल्पनाची मोठमोठी जाळी असून ती जाळी घनदाट बनून त्याच्यापलीकडे काय आहे याचा मागमूसहि लागू देत नाहीत. ती जाळी तोडण्याची सुरुवात करावी तर त्यामध्यें उलट नवीन जाळ्याची भर पडून भ्रम वाढत जाऊन जुन्यामध्ये नवीन भर टाकण्याचेंच विपरीत कार्य होतें. मग काय स्वस्थ बसावे? स्वस्थ बसणे हाच खरोखर उपाय आहे. खऱ्या अर्थानें स्वस्थ बसणे जर साधेल तर त्या सर्व कल्पनाची जाळी सूर्योदयानंतर जसें धुकें कितीहि दाट असलें तरी कोठल्याकोठे पळून जातें त्याप्रमाणे विलयाला जातील आणि अकल्पनीय अशा त्या आमच्या जवळच्या निजवस्तूची पूर्ण कल्पना येऊन कल्पवृक्षाच्या खाली सर्व कल्पना गळून आम्ही केवळ अमृत-प्राशनासाठीच बसू.

१२०

मनुष्य नखशिखात आपले प्रतिबिंब पाहून आपणच आपणाला भेटलो असे न मानता दुसऱ्याला आपण भेटत असताना कसे दिसू हा अंदाज घेत घेत स्वतःच्या उणीवा दूर करीत करीत स्वतःला वस्त्राभरणानी विभूषित करीत करीत उत्तरोत्तर खूष होत जातो. आणि कोणी मोठा माणूस किंवा आप्तेष्ट भेटण्याला आला म्हणजे स्वतः स्वतःवरच प्रसन्न होतो. पण इतकी काळजी घेऊन स्वतःला नटवूनहि जर कोणी भेटण्याला आला नाही तर आपणच आपल्या मनात खजिल होतो स्वरूपावर सुव्यवस्थित कलेचा फुलोरा आणल्यावर त्याच्या-भोवती भुंग्याचा गुंजारव न चालेल तर आत्मपूजा व्यर्थ गेली असे वाटण्यात वास्तविक आत्मपूजा झालीच नाही हे समजून हे जीवा ! तू खऱ्या आत्मपूजेला लाग !

१२१

ज्या अर्थी गावोगावी समुचित आतिथ्याची अल्पहि अपेक्षा न राखता, अनेक तऱ्हेच्या कष्टाना क.पदार्थ समजून ज्ञानदानाचे कार्य अविरत करीत करीत तूं आमच्याकडे आला आहेस, त्या अर्थी तुझ्या-जवळच्याना अनुभवानी भरलेल्या अदृश्यजनगुभाडाराचे तू थोडे तरी दर्शन करवून आम्हाला उपकृत करशील या आशेनें तुला आम्ही सन्मान्य आतिथ्याचा स्वीकार करण्याची विनति केली आणि ती मान्य करताना तू उलट उपकार कृतज्ञता दर्शवलीस तेव्हा हे शुभमस्कार-सपन्न बधो ! तुझ्या वागणुकीनें आम्हाला ज्या भूमिकेचे दर्शन करविलं ती भूमिका तू एका परीनें कोठेहि न जाता आम्हाला प्रदान केलीस यात सशय नाही खरोखर भीषण समुद्राच्या तळाशी जाऊन प्राण धोक्यात टाकून तू आणलेली मनोहर मुक्ताफळे तू आम्हाला विनामूल्य दिलीस ! गहन अरण्यातल्या मधुमक्षिकाच्या पोळ्यातला मधुराहून मधुर अमृततुल्य मध तू आम्हाला अर्पण केलास ! अनेकाच्या स्नेहसलिलाच्या तीर्थाचे स्नान तू आम्हाला घडविलेस ! यात तिळमात्र शका नाही. यासाठीच तू अतिथिरूपाने देव आहेस !

१२२

आत्मीयतेमध्ये किमानपक्षी आत्म्याची अर्धी तरी सुखसमृद्धीची साम्यभूमिका लवकरात लवकर दाखल व्हावी यासाठी तुमचा जो प्रयत्न चाललेला आहे त्यात बाहेरच्या अनेक तऱ्हेच्या आपत्तीला तोंड द्यावे लागून अनुकूलतेसाठी सतत जागृतीचे अवलंबन करावे लागते त्यामुळे चित्तावर मोठा भार पडतो. पण हे लक्षात ठेवले पाहिजे की हे सर्व त्या चतुर विश्वनाटक कर्त्याचे तात्कालिक नाटक आहे. ते त्याने पडदा पाडी-पर्यंत चालेल. तोपर्यंत तुमची भूमिका तुम्हाला पार पाडावी लागेल ती एकदा पार पाडली म्हणजे मग तुम्हाला त्रयस्थपणे त्या नाटकाचा खरा अर्थ आणि त्यातला खरा आनंद कळेल तर जरा धीर धरा सबूरी करा. आपला प्रयत्न चालू द्या त्या प्रभूशी तो यत्न जोडून द्या. म्हणजे आत्मीयतेमध्ये आत्म्याचे साम्यसुख सहजच जोडले जाईल. आणि ते शुभमंगल पाहून तुमचे डोळे निवतील !

## १२३

मी मधून मधून सहज इकडे तिकडे फिरतो तेव्हा हे देवा! तूहि मजबरोबर फिरताना भासतोस माझे कान तुझे शब्द ऐकून तृप्त होतात. परंतु तुझ्या शब्दाचा अर्थ एकसारखा विकसित होत जातो आणि नवीन नवीन रूप धारण करतो. त्यामुळे त्याचे आकलन होत नाही तरी पण काही तरी आकलन होईलच ही आशा सुटत नाही. त्यामुळे माझे मधून मधून उगीचच फिरणे हे केवळ कटाळा घालवण्यासाठी किंवा केवळ नुसती सवय म्हणून नसून तुझ्या शब्दाच्या गूढगुजनातली रहस्ये थोडी तरी कळतील आणि कानाच्या तृप्तीबरोबर मनाचेहि समाधान होईल या हेतूने होत असते हा माझा हेतु लक्षात न आल्यामुळे एकाएकी उठून फिरण्याला लोकाच्या दृष्टीने लहरीचे स्वरूप येत असले तरी तुझ्या सहवासाची सुंदर लहर त्यात मिसळत असल्यामुळे माझी लहर मला आवडते आणि ती सतत टिको अशीच मी इच्छा करतो. आणि मजबद्दलच्या अभिप्रायाबद्दलहि मला मोठी मौज वाटते!

## १२४

ओळख नसताना मजकडे एकदम येऊन ओळख देतोस. आणि मजकडून अल्पस्वल्प कामहि करवून घेतोस आणि त्याबद्दल ऋण प्रदर्शित करतोस. ही तुझी ओळख तू जी मला देतोस ती तर खरीच आहे पण तेवढीच मात्र खरी नाही तुला तू सपूर्णपणे ओळखतोस की नाही हीच शका आहे पण माझी ही शका मी तुझ्याबाबत प्रकट केली तीच मला लागू होते मी तुला पूर्णपणे कोठे ओळखतो ? तुझ्या ओळखीचे काही प्रकार तुझ्या कल्पनेनेच केव्हा केव्हा माझ्यासमोर येतात तेवढयावरून तुझी सपूर्ण कल्पना न आल्यामुळे तुला तूच पूर्ण ओळखतोस ही सत्य स्थिति न ओळखून तुझ्याबद्दल विपरीत शका वाटल्याबद्दल हे देवा ! मला तू क्षमा कर ! तुझ्यावाचून तुला कोणीच ओळखू शकत नाही

## १२५

तू वरून केवळ सामान्य वस्तु दिसत असलास तरी आतून तू श्रवण, मनन, ज्ञान दर्शनाची सर्व शक्ति केंद्रीभूत करून घेत असतोस, हे लक्षात न आल्यामुळे तुझी हेळसाड करण्यात कोणालाच काही वाटत नाही तेहि दुर्लक्षून जेथे तुझी हेळसाड होते तेथेच तुझी प्रेम-कृपा तू आकाराला आणतोस तरीहि तुझ्याकडे कोणी लक्ष देत नाही त्या दुर्लक्षालाहि दुर्लक्षून तू तुझ्या विशाल प्रेमकृपेची आयोजना करतोस. मग तुझ्याकडे म्हणजे तुझ्या प्रेमकृपेच्या विशाल आकाराकडे आम्ही धाव घेतो तरीहि आतून तुझ्याविषयी आम्हाला तुझ्याप्रमाणे प्रेमाचा जिव्हाळा नसल्यामुळे तुझ्या अमृतत्वापाशीच आमची जवळ जवळ मृतावस्था होते. भगवन् ! आमची ही दुरवस्था टाळणे तुझ्या हाती आहे तू आम्हाला तुझ्या प्रेमामृतात बुडवून टाक ! अंतःकरणात तुझ्या प्रेमाचा जिव्हाळा निर्माण कर !

## १२६

जगाच्या सर्व उपाधीसकट जगावर निःसीम प्रेम करणाऱ्या भक्ताना नेहमी यशस्विता लाभून ते जगामध्ये कोठेच अडकून पडत नाहीत इतकेच काय पण ते यशामुळेहि बद्ध होत नाहीत. बालकृष्णाच्या खोड्यासकट बालकृष्णावर निःसीम प्रेम करणाऱ्या यशस्वी यशोदेची जन्ममृत्यूच्या खोड्यातून सहज सुटका झाली भक्त जन्ममृत्यूला ओळखतच नाहीत ते केवळ एका परमेश्वरालाच ओळखतात त्याचीच सतत सेवा करतात त्यामुळे त्याच्यापुढे कोणताच प्रश्न नसतो या प्रश्नरहिततेमुळेच जगाचा प्रश्न आणि जगातले प्रश्न त्याच्याचपाशी सुटू शकतात. हे माझ्या मना ! तू भक्ताचा भक्त हो म्हणजे कोणताच प्रश्न राहणार नाही.

## १२७

सतत हेलावणाऱ्या विशाल जीवनाच्या वैभवाने, परमोच्च दिव्यतेच्या तेजस्वितेने, अतिशय खोल अशा निगूढ शांतीने, अणूअणूत साकार झालेल्या प्राणमयतेने आणि प्रेमप्रकर्षाच्या माधुर्याने माझ्या हृदयात तुझ्या उपासनेचा प्रवेश होऊ लागताच तुझ्या कृपेचा मजवर वर्षाव होऊ लागला सर्वांगातून तुझ्या पावनतेचे अमृत स्रवू लागले माझेपणाच्या आवरणात जरी मी दडलेलो होतो तरी ते आवरणहि केव्हा कसे निघून गेले हेहि मला कळले नाही अशी माझी स्थिति झालेली असल्यामुळे माझ्या द्वारे आता जगात तुलाच हालचाल करावयाची आहे हे प्रभो ! ते उर्वरित कार्य तूं कर मीहि माझें उर्वरित आयुष्य तुझ्या कार्यदर्शनात व्यतीत करीन ! यापेक्षा मी आणखी तुला काय सागू ?

१२८

लगबगीने जाण्यासाठीं उठून दोनदा परत येण्यात दुसऱ्यासाठी विस्मृत वस्तूची पोच आणि स्वतःच्या सोयीच्या विचाराचा पोच जेव्हां लक्षात येतो तेव्हा प्रत्येक आवागमनाबरोबरच्या नमनातला अर्थ उलगडतो आणि विशिष्ट स्थितीतली द्विविध साधना सामान्य जीवनावर आपला ठसा उमटवून देते. हे प्रभो ! त्या साधनाकिततेमुळेच तू मागे-पुढे उभा राहून आम्हाला साभाळीत आहेस याची खात्री पटते

१२९

हे जीवा ! लाभलेल्या सुस्थितीत समाधान न मानता जेव्हा तूं अधिक लोभाची दीनता स्वीकारतोस तेव्हा तुला दीनतेचे स्वामित्व मान्य आहे असे दिसते पण ते स्वामित्व तुला सुखकारक तर वाटत नाहीच. मग का विनाकारण तू ती दीनतेची बेडी पायात घालून घेतोस ? का त्या दीनदयाळ प्रभूचे दास्य स्वीकारीत नाहीस ? का त्याच्या स्वामित्वाच्या गौरवगाथेने आपले जीवन ओतप्रोत भरून घेत नाहीस ? त्याच्या कृपामृतगगेत स्नानपानाचा लाभ घेउन ते तीर्थ का आपल्या घरी आणून ठेवीत नाहीस ? —या प्रश्नाचे उत्तर देशील काय ?

१३०

मननाच्या मूर्तीला आकाराची वस्त्रे लेववून जेव्हा ती उपयोगाच्या उद्योगाला लागलेली आम्ही पाहतो तेव्हा तिच्या त्या नवनिर्माणाने आनंदाचा ठेवाच सापडल्यासारखी आमची स्थिति होऊन जाते. पण तिथेच थाबण्याचा मोह होऊन मग मूलाधार सुटलेल्या फादीप्रमाणे आम्ही जीवनरहित रुक्ष स्थितीत उत्तरोत्तर कृश होत होत उपेक्षेच्या कोपऱ्यात जाऊन पडतो तेव्हा आम्हाला मूलाधाराचे महत्त्व पटते आणि तो सोडल्याबद्दल पश्चात्ताप होतो त्या पश्चात्तापाच्या अश्रुसिंचनानें ती रुक्ष फादीहि टवटवीत होऊन तेथे पुन्हा अकुर फुटू लागतात आणि पुन्हा आम्ही मननाच्या मूलाधाराला पोचतो, तेव्हा चुकलेल्या बाळाला त्याची शोधून शोधून त्रस्त झालेली माउली भेटावी त्याप्रमाणे आमची अवर्णनीय स्थिति होते. हे प्रभो ! अतर्विश्वात नेणाऱ्या तुझ्या मननाचा आमचा आधार तूं कधीच तोडू नकोस आणि आम्हाला अल्पसतोपाचा मोह होऊ देऊ नकोस

१३१

उदयास्ताचा चक्रामध्ये न सापडावे म्हणून तू आमच्या उपासनेला उदयास्ताच्या मध्यभागी योजले आहेस. ही मध्यस्थभूमिका जरी उदयास्ताच्या एकांगितेत सापडली नाही तरी उदयास्ताना स्पर्श करणारी असल्यामुळे तुझ्या स्पर्शापासून ती आम्हाला वचित करणारीच समजून आम्ही तुला विनति करतो की, केवळ तुझ्या वरदहस्ताचा स्पर्श असेल त्याच भूमिकेत आमच्या उपासनेची स्थापना कर. अन्यथा आमची उदयास्ताच्या चक्रातून सुटका होणार नाही. आणि तुझ्या उपासनेला यात्रिक स्वरूप येईल. तुझ्या सर्वातीत मत्रसामर्थ्याने तिची तात्रिकता आणि मात्रिकता तू पूर्ण मोडून टाक.

## १३२

एकीकडे तुझी अपेक्षा आणि दुसरीकडे तुझें निरपेक्ष चिंतन या विरोधाभासातून एक रमणीय जीवनप्रक्रिया आम्हाला सापडली. त्या दिव्य नौकेचा आधार घेऊन आम्ही निर्भयपणे परदेशच्या सफरीवर निघालो आहोत खवळलेल्या समुद्राची त्यामुळे आम्हाला मुळीच फिकीर वाटत नाही कारण कितीहि खवळलेला समुद्र असो, तो आम्हाला वर उचलून पुढे नेणार आणि परतीवर गेल्यावर त्याच्या पोटात साठवलेल्या अपार शान्ति-रत्नाची खैरात करणार यात शका नाही

## १३३

प्रतिवर्षी आपल्या नम्र दूताला पाठवून न मागताहि तू ज्ञान-साधनेसाठी नित्य नवी भेट पाठवीत गेलास. तुझा क्रम अस्तित्वविसर्जना-पर्यंत तूं अव्याहत चालू ठेवलास. आता अमावास्येच्या एकत्र-मीलनालाहि मागें टाकणारे तुझें अतर्ध्यान अतर्ध्यानात सम्मीलित होऊन गेल्यामुळे आमच्या हृदयात तुझ्या भक्तिभावाचा समावेश तू अधिकच तीव्रतेने करवि-लेला आहेस ! आता तुझी अतर्ध्यानातली भेट आणि भेटी आमच्यासाठी साधनेच्या चढत्या सोपानपरपरा ठरल्या आहेत ! हे प्रिय सुहृदा ! आमची खात्री आहे की त्याच्यावरच्या आमच्या पदन्यासाने तू अतिशय सतुष्ट होशील !

१३४

नेहमी मिळतें घेण्यात जे काही मिळते आणि जुळते करण्यामध्ये जे काही जुळते त्याची कल्पना तशाच लोकविलक्षण साधकाला येऊ शकते त्यामुळे ही महालाभाची युक्ति उघड असून हे एक गूढ मानले गेले आहे त्या गूढावरचा पडदा जो जो दूर सारावा तो तो ते अधिकच गूढ आहे असे इतराना वाटते त्यामुळे तो नसलेला पडदा तसाच राहू देऊन त्या नसलेल्या गूढात उघडपणे शिरून महालाभाच्या परतीरावरची मौज आपण का सेवन करू नये या विचारानेच खऱ्या साधकाची साधना सजली जाते तिच्या ऐश्वर्याने हे देवा ! माझे डोळे दिपू देऊ नकोस तिचे दर्शन आणि आराधना माझ्याकडून नीटपणे होऊ दे !

१३५

सुखदुःखें ही सतत येतजात राहतात. त्याच्याकडे लक्ष देण्यान त्याचा कार्यक्रम बद होत नाही उलट आमचा कार्यक्रम बद होतो म्हणून त्याच्याकडे दुर्लक्ष न करता आणि लक्षहि न देता आपल्या कार्यक्रमाला प्रभूशी जोडून दिले तर आपला आयुष्यक्रम सुखदुःखातीत ध्येयाकडे वाटचाल करू शकेल हे कळले खरे, पण सुखदुःखाच्या तीव्रतेत हे सर्व कळणे न कळण्यासारखेच होते या अनुभवाने व्याकुळ होऊन आम्ही म्हणतो देवा ! आम्हाला तुझ्या भक्तीची तीव्रता दे. जेणेकरून या दोन तीव्र सकटातून आम्ही उत्तीर्ण होऊ

## १३६

बाल्यकाल मागे सारून तारुण्य, तारुण्य मागें सारून वृधाप्य आल्यामुळे अभावाच्या रिक्ततेचे संकट उभे राहते. ते बाल्याला सामावून तारुण्य, तारुण्याला सामावून वृद्धत्व ही जेव्हा युक्ति साधेल तेव्हा सहजच टळून आमच्या मरणातहि आमच्या जीवनाचा समावेश होऊन मरणाची अभावरूप महारिक्तता नष्ट होऊन तेथे सर्व जीवनाचे भावरूप केंद्रीकरण होईल. त्या केंद्रित जीवनभावाला जीव जेव्हा परमेश्वराच्या महान् जीवनात प्रविष्ट करील तेव्हा त्याला महाभावाचा लाभ होऊन अभाव रिक्तता याचाच अभाव आणि रिक्तता व्यक्त होऊन सर्वत्र आनंदाचा चिद्घन–सच्चिदानंदघन लाभेल.

## १३७

वर्षानुवर्ष श्रमाने थकून गेल्यावर आमच्या विश्रांतीसाठी, आमच्या पोषणासाठी आणि आमच्या सेवेसाठी तुझी तिसरी व्यवस्था व्यापकतेत विसर्जित होण्याचे महाद्वार असून स्वातंत्र्य आणि पुढच्यांना सौहार्द मिळवून देणारा तो जीवनाचा कायाकल्पच आहे। त्याने लोपलेल्या बाल्यतारुण्याला परतून पाहण्याचे प्रेमळ आमंत्रण मिळून त्याच्या सारभूत समावेशनाची पिकलेल्या फळाप्रमाणे परिपक्वदशा तूं आम्हाला प्राप्त करून देतोस. त्यामुळे जीवनांतली सर्व कटुता गळून जाऊन मधुरतेचा रस गळू लागतो हे रसिकाच्या रसिका प्रभो। तो रस आमच्या रोम-रोमात वाहवून तुझ्या माधुर्यात मिसळण्याची पात्रता आमच्यात निर्माण कर।

## १३८

पराक्रमाच्या प्रेरणेने बहुविधतेत संचार करून प्रतिकूल संघर्ष स्वीकारून अनुकूलतेच्या संचिताला आत्मकेंद्रात घेऊन जाणारा तुझा जीवनपट जरी एकागितेने आणि बहुतेक बहिर्दृष्टीने भरलेला असला तरी विशालतेच्या आणि औदार्याच्या सोनेरी किनारीने त्याला शोभा आणलेली आहे तेवढीच पुरेशी नसून आत्मकेंद्रात प्रेमळपणाने, वात्सल्याने आणि सूक्ष्म दृष्टीच्या जिव्हाळ्याने जेव्हा तुझी एकागिता जाईल तेव्हा हे जीवा ! त्या परात्पर पूर्णमूर्ति प्रभूच्या धामाकडे जाण्याची योग्यता प्राप्त होईल या बाबतीत पराक्रम करण्याचे राहून गेलेले कार्य तू करशील तर काय पहावयाचे ! तुला बसल्या ठिकाणी स्वर्ग निर्माण करता येईल

## १३९

तुझ्या महिम्याचे वर्णन कोण करू शकेल ? तू प्रेमाचा पुतळा, वात्सल्याची अमृतकळा, आत्मीयतेचा जिव्हाळा, सूक्ष्मातिसूक्ष्म कार्याची मंगलमाळा आहेस ! तूच सर्वांचे संरक्षण, पोषण, संवर्धन करणारा आणि नकळत जास्तीत जास्त ज्ञान देणारा आहेस तू आहेस म्हणून सगळे आहे. तू नसशील तर काहीच नाही. तुझ्याकडे युगयुगापासून दुर्लक्ष चालू आहे पण त्याला दुर्लक्षून तुझे कार्य अव्याहत चालू आहे ते केव्हा सर्वत्र फैलावेल ? केव्हा त्याचा सर्वत्र प्रभाव पडेल ? केव्हा त्याला स्वनिर्भरतेची जोड मिळेल ? केव्हा त्याने सर्व जीवन व्याप्त होईल आणि संघर्षाची सर्वत्र भरलेली कटुता नष्ट होईल ? याची तहान सर्वांना लागलेली आहे. पण त्यासाठी तुला शरण जाण्याची बुद्धि कोणालाच होत नाही, हे दुर्दैव आहे ! या दुर्दैवातून निदान तू आम्हाला तरी सोडवशील का ?

१४०

उपचाराच्या बाहुल्याने ईश्वरी प्रेमसुखाची वृद्धि होत नसून उलट त्यामध्ये उणीव निर्माण होते. निरुपचारपणाची निवातता हेच ईश्वरी प्रेमसौख्याचे माहेर आहे परंतु त्या खऱ्या दृष्टीच्या अभावी आम्ही भरमसाट क्रियाकांडाच्या यंत्रातून प्रेमरसाची निर्मिति होण्याची वाट पहात असतो त्या क्रियाकर्मांतराचे अवडंबर वाढत जाते तसतसा खरा प्रेमरस आटत जातो आणि म्हणण्याची पाळी येते की, हे जगदीश्वरा ! हे प्रेमामृताच्या सरोवरा ! आमच्यासाठी तू सुकून जाऊ नकोस वास्तविक ते सरोवर परिपूर्ण भरलेले काठोकाठ ओसंडून जाणारे असून आम्ही कृत्रिम तऱ्हेने निर्मिति करू पाहतो ते सरोवर सुकलेलेच असणार. त्याच्यात केवळ कचरा साठणार, त्याच्यात जीवन कोठून निर्माण होईल ? म्हणून हा उपचाराचा क्रम, हे जीवा, तू टाकून दे ! अरुप खूण म्हणून उपचाराला हरकत येणार नाही, पण तू त्याच्या जाळ्यात कधीहि सापडू नकोस

१४१

तू पहिला म्हणून केवळ अद्वितीयतेने तुझ्यात अद्वितीयता आली आहे असे नव्हे. तर तू द्वितीय तृतीय . अथवा कोठल्याहि सख्येत असतास तरी हे अनता ! तुझे सख्यातीत—अद्वितीयत्व अटळ असते. ती अद्वितीयतेची चमक तू सदैव दाखवीत असतोस आमची अपेक्षा एक आणि तुझी लीला दुसरीच. असेच सदैव घडत असते आमच्या कृत्रिमतेमध्ये न बसता तुझ्या अकृत्रिमतेमधून आम्ही बोध घ्यावयाचा सोडून कृत्रिमतेने तुलाच बोध देण्याचा प्रयत्न करतो. तो सफल कोठून होणार ? आमच्या योजना तू पार तोडून टाकतोस, आमच्या व्यवस्थेने भरलेले कुभ तू फोडून टाकतोस आणि जे हाती येईल त्याला हाताशी धरून तुझा खेळ चालू असतो तो अतर्बाह्य सतत चालू असल्यामुळे तू म्हणजे शक्तीचा अवतार भासतोस आणि आम्ही सर्व तुला आवर घालण्यासाठी अपुरे पडतो उघडच आहे की तुझे कितीहि कौतुक केले तरी आम्हाला आमच्या व्यवहाराने आवर घातलेला असल्यामुळे त्या व्यवहारासाठी तुलाहि आवर घालणे भाग पडते आणि आमची तारांबळ उडते तुझे पारमार्थिक परम सत्य प्रातिभासिक तऱ्हेने व्यवहारात कस उतरेल याची आम्हाला चिता लागली आहे. ती आमची चिता हे अनता ! तुझ्या परम सत्याची परमोच्च प्रतिभा व्यवहारात सफलतेने उतरवून लवकरात लवकर दूर कर

## १४२

तुझ्या दुसऱ्या व्यवस्थेत दुसऱ्याच्या आधीन होण्याच्या तितिक्षेचे अनुभव येत असतात । पण दुसऱ्याना आपलेच करून त्याच्यात अभिन्नपणा निर्माण करण्याचीहि ती एक मोठी अपूर्व पर्वणी असते. ती साधणे अतिशय कठिण असून तीत छिन्नविछिन्न होण्याचा फार संभव असतो पण ज्या अल्प महात्म्याना ती साधली त्याच्याकडून चारी दिशाना आश्रयाचे आमंत्रण मिळून त्याच्या लाभाने लोकाच्या अस्तित्वाला स्थैर्याची बैठक लाभून त्याच्यात अकृत्रिम सहकार्य निर्माण होते तुझ्या द्वितीय व्यवस्थेचा हा उद्देश आहे प्रथम व्यवस्था जर उत्तम विकसित झाली असेल तर या द्वितीयावस्थेचा तुझा उद्देश सहजसाफल्याने कृतकृत्य होतो. ती कृतकृत्यता आम्हाला ठिकठिकाणी पाहावयास सापडो एवढीच आमची इच्छा आहे ।

## १४३

अनुकूलता प्रयत्नसाध्य असेल तेव्हाची गोष्ट वेगळी पण तसे नसेल तर तिच्या आगमनाबरोबर तिला अनुकूल होण्यानेच तिचा लाभ घेता येईल अन्यथा तिचे यदृच्छेचे आगमन गमावले व प्रयत्नाने तर ते आपल्याला साध्य नाही. अशी दोन्हींकडून आत्मवंचना होण्याचा संभव आहे. परवंचनेमध्ये आत्मवंचना होतच असते, पण अशा द्विविध आत्मवंचनेमध्ये अडकित्त्यात सापडलेल्या सुपारीप्रमाणे आपली छिन्नविछिन्न दशा निश्चित आहे. म्हणून हा धोका तू कधी पत्करू नकोस. आणि सदैव अनुकूलतेला अनुकूल हो हाच अंतर्नाद ग्राह्य ठरतो.

## १४४

चारी दिशानी मायबापांची माया पसरून दिली आहे. उत्साहाच्या उषःकालातच पदविन्यास होत आहे. सर्व स्थानात आपुलकीला बहर आला आहे. सर्वत्र मुक्काम आणि मार्गाची अभिन्नता विकसून राहिली आहे. केवढीहि खोल नदी असो तिला एकदम उतार पडून नावेची जरूर राहिली नाही उचातले उच पर्वत पायीं पडून विनम्र झाले आहेत. सर्व सिद्धाताची सिद्धसरस्वती जिव्हाग्रावर नाचूं लागली आहे. बाल, वृद्ध, स्त्री, पुरुष, पशु, पक्षी, वृक्ष, वेली, तारे, वारे– सगळेच्या सगळे सहवासासाठी अहमहमिका करीत आहेत. अशी ती अवस्था देहात असून देहाबाहेर ओमडून आतबाहेर सर्वच प्रकाशाच्या लाटात बुडवून टाकीत आहे. ही तुझी चवथी व्यवस्था तुरीय अवस्थाच असल्यामुळे ती आमच्या आटोक्याच्या बाहेर असली तरी ज्या अर्थी तू तिला आपल्या व्यवस्थेत दाखल केले आहेस त्या अर्थी हे देवा! आम्हाला तिचा अल्पसा स्पर्श होऊ दे. तिच्या द्वारे तुझ्या दाराशीं आम्ही पडून राहू!

१४५

आत्मीयतेने सर्व काही घ्यावे आणि परकीयतेने नुसता दृष्टिक्षेपहि करू नये या स्वभावगुणामुळे प्रथम माझ्याच बागेत माझ्याच मित्राची मुले हळूहळू एकमेकाशी बोलत फुले वेचीत होती ती कल्पना न आल्यामुळे, कोणी तरी परकी आहेत असे भासले आणि मी काठी घेऊन पुढे झालो पण त्या फुले वचणाऱ्या माझ्या मित्राच्या मुलाना पाहून माझ्यात एकाएकी किती फरक झाला! त्यानी मला पाहिले नाही हे किती तरी बरे झाले! माझी काठी माझ्या हातात होती पण तिच्यावरची माझी पकड ढिली झाली. आणि मी परत येऊन माझ्या आसनावर बसलो हे परमेश्वरा! तुझ्या या जगद्रूप बगीच्यात मी परकीयतेने प्रवेश केल्यास तुझी अशीच निग्रही नजर मजवर पडेल! म्हणून मी तुझी आत्मीयता सपादन करून मगच तुझ्या बगीच्यातली फुले वेचीन म्हणतो! हे बरोबर आहे ना? नाही तर माझ्या काठीप्रमाणे तुझा दड मला दड दिल्याशिवाय कसा राहील?

१४६

जे जे मी पाहतो त्यामधून तू मला पाहतोस पण तुझे पाहणे मला पाहता येत नाही मी प्रत्येक वस्तूकडे काही अपेक्षेने पाहतो मजकडे पाहण्यात तुझी काय अपेक्षा आहे? माझी अपेक्षा त्या त्या वस्तूना कळत नाही त्याप्रमाणे तुझी मजबद्दलची अपेक्षाहि मला न कळो, पण निदान पाहणे तरी कळले पाहिजे? त्या जड वस्तूप्रमाणे मीहि तुझे पाहणे न कळण्याइतका जड आहे ना?—तर मग ही जडता एकदम तूं दूर कर आणि प्रत्येक वस्तूत तूं मला दर्शन दे! तुझ्या चैतन्याने जडता दूर केलीच पाहिजे!

## १४७

असे म्हणतात की आपले विकार गेल्यानतर चित्ताला महानता प्राप्त होऊन ते समर्थ बनून त्यागाच्या वैभवाने मंडित होऊन दुसऱ्याना आपले वैभव वाटण्याच्या भूमिकेशी जोडले जाते. मग सत्परपरा आणि तिची साधने याची मुळीच कमतरता नाही अशा दिव्य लोकातली यशस्विता त्याला आपण होऊन वरते पण ते तेथेच अटकून न राहता तेथे थोडा वेळ विश्राति घेऊन तेजस्वितेने पुढे जाते. त्याची सतत इतस्ततः फिरण्याची चचलता नष्ट होऊन सर्व गति आत्मबोधाच्या दिशेला लागते. अशा रीतीने आत्मबोधाचा बोध मनाला प्राप्त होतो– हे म्हणणे ठीक आहे. पण त्यात ईश्वराचे साहाय्य नसले तर केव्हा काय होईल हे सागता येणार नाही. म्हणून आरभीच ईश्वराला नमन करून त्याचे सतत सहाय्य का मागू नये ?

## १४८

धिक्कार असो त्याचा की जे मूढपणे आधिक्याच्या मागे लागतात ! त्याना आपल्यातले आधिक्य, सारातले सत्त्व, सत्त्वातली खोली, खोलीतली गूढ नवनिर्मिती कोठून लाभणार ? त्याना हव्यास आणि त्याचा सतत थकवाच येत रहावयाचा ! हे प्रभो ! मला तूं त्यापासून सोडव आणि तुझ्या पायाचा अल्पसा स्पर्श करव !

१४९

विशालतेच्या, गतीच्या, तेजाच्या आणि शक्तीच्या सर्वोत्तमतेने तुझी कृपा आमच्या सर्व जीवनाची घडण करून त्यामध्यें प्रविष्ट होऊन त्याला अस्मितेच्या विराट प्रदेशात, पुरुषार्थांची प्रेरणा देऊन, कौतुकाने बाजूला होऊन, तटस्थ मरक्षणाची माता बनते. तेव्हा आमच्यावर फार मोठी जबाबदारी येते. तिची विशालता, तिची सद्गति, तेजस्विता आणि शक्ति यांचा आमच्याकडून सतत विजय होत राहिला पाहिजे, निदान तिच्या थोरपणाला काळिमा लागेल असे कांहीच, आमच्याकडून चिंतिले जातां कामा नये तिच्या दिलेल्या देणग्याचा जर आम्ही उधळपट्टी न करता उपयोग करू तर हे सहज घडून येईल. असा जो आम्ही विचार करतों तोच हे बाळानो ! तुम्ही भिऊ नका ! माझी तटस्थता तुम्हाला मजपासून अलग करण्यासाठी नसून तुमच्या पराक्रमाला वाव देण्यासाठी असल्या-मुळे माझे प्रबल सहाय्य तुमच्या पाठीशी आहेच. आता तुम्हाला कोणी बनवूं शकणार नाही ! तुम्हाला सौख्याचे सख्य लाभेलच लाभेल ! हे तिचे आश्वासन मिळाल्यावर आम्ही किती आनदून गेलो त्याचे वर्णन करता येणार नाही. आम्ही क्षणभर स्वतःला विसरून केवळ मातृमय बनलो ! आमची उत्तरदायित्वाची भीति कोठल्या कोठे निघून गेली आणि आम्हाला निर्भय पराक्रमाला आता आमच्या मातेचा आशीर्वाद आहे. या स्फूर्तीने शतपटीने स्फुरण चढले !

१५०

सर्वांना संतोष देणारी, सत्याला जोडून, असत्याला तोडून विरोधाच्या प्रसंगात अविरोध निर्माण करणारी तुझी शक्ति अल्पांशानेहि जरी तू आम्हाला दिलीस तरी तीव्र उन्हाळ्यानंतर आलेल्या पावसाच्या अमृतधारेने निर्माण करावे त्याहूनहि केवढे अधिक परिवर्तन होईल? आम्हाला ती शक्ति अल्पांशानेहि तू का देत नाहीस? हा विचार आम्हाला अस्वस्थ करून टाकत असला तरी अधिक विचाराने आम्ही अभिनिवेशाला जितके वश होतो तितके या शक्तीच्या मागणीला वश होत नाही हेच त्याचे खरे स्मरण आहे. असे लक्षांत आले. हा अभिनिवेश काढून टाकण्याची मागणी तरी आम्ही तुझ्यापाशी करू शकतो ना?

१५१

साधक जेव्हा काया-वाचा मनाने ईश्वराच्या दैवी प्रेमप्रकाशात बुडून जातो तेव्हा त्याला सर्वसमावेशकत्वाने परतीरावरच्या परम सत्याचे सहज आकलन होते. इतकेच काय पण त्याच्या बुद्धीला सर्वव्यापक निर्लिप्त सत्याची सतत प्रेरणा मिळून तो बोधामृताची मूर्ति बनतो. तो कुठेहि असला तरी त्याला शोधण्यासाठी अनेक लोक अनेक प्रयत्न करतात. हे प्रभो! त्या परिसाच्या स्पर्शाची पात्रता तुझ्याशिवाय कोण निर्माण करील? त्या मंगलघटिकेचा योग घडवून आण,– जीमुळे आमच्या जीवनाचे सोने होईल!

## १५२

सतत सरळपणाने शांतीचा संग्रह करण्याची कला हस्तगत करावी आणि तीमुळे सुंदरतेला उपयुक्ततेची परिसीमा प्राप्त होऊन आम्ही पोपणाच्या माधुर्यात मुरून जावे ही परममंगल उपासना हे प्रभो ! तुझ्या कृपेनच आम्हाला लाभलेली आहे तिची जिकडे तिकडे प्रस्थापना होऊन तिच्या सार्वत्रिक सर्वांगितेनं सर्वांना लाभान्वित करावे हा प्रयत्न तुला अमान्य कसा असेल ? जर तो अमान्य नाही तर त्यात तुझा हातभार नको का ?

## १५३

प्राधान्यगौणत्वानं एकमेकांना उपयुक्त अशा संबंधाने या जगाची रचना तूं केलीस पण तू प्रधानगौणत्वापासून वेगळा राहिलास कारण तुला उपयुक्त असे काहीच नाही, तूच तुला उपयुक्त असे म्हणावयाचे ! तरी ही गोष्ट निश्चित आहे की, जगातल्या कोणत्याहि वस्तूपेक्षा तूंच आम्हाला उपयुक्त आहेस. तुझी प्रधानता आम्हाला शिरोधार्य आहे कारण उपयुक्तता तुझीच कृति आहे ते कसेहि असो, जीवनात सर्वोपयुक्ततेचा तुझा गुण तूं आम्हाला दे एवढेच आमचं म्हणणे आहे

१५४

अनात्म विषयाचा सर्वथैव निषेध जोपर्यंत चित्तात ठसला नाही तोपर्यंत चित्ताची द्विविध दोलायमान अवस्था चित्तात निर्बलता निर्माण करण्याला कारणीभूत होत असते. त्यामुळे तो निषेध विस्मरणाने सर्वथैव क्षीण करून तुझ्या प्रगाढ लालसेने समूळ नष्ट होण्याला आम्हाला त्या तुझ्या प्रेमामृताची गोडी थोडी तरी का चाखवीत नाहीस? तुझे प्रेमामृत आम्ही झिटकारून टाकू असे तर नाही ना? त्या प्रेमामृताला झिटकारण्याचे कोणाचे सामर्थ्य आहे? अनात्म विषयाच्या विहिरीत आम्ही डुबक्या खात आहोत वरून दोर टाकशील तर खचित आम्ही चढून येऊन तुझ्या पायांवर लोटांगण घालू!

१५५

अत्यंत तीव्र सुखानुभवाच्या आभासामुळे अत्यंत अनित्य म्हणजे क्षणभंगुर विषयात आम्ही वाहवत जातो त्यामुळे अनित्यताच नित्य असलेल्या या जीवनात आम्हाला अनित्यतेचा भाससुद्धा होत नाही आणि आयुष्यात करावयाच्या गोष्टी न करता ते व्यर्थ जाते अनित्यतेच्या नित्य जाणिवेमुळे आमची अनित्यतेतून सुटका करणारी सत्प्रवृत्ति जर अखंड निष्ठेने चालली तर अनित्यतेचे खरोखर उपकारच मानावे लागतील.

१५६

ज्या वेळेला आतला डोळा बाहेरच्या डोळ्याला खरोखर सहाय्य करतो त्या वेळेला जिकडून मिळेल तिकडून, जितका मिळेल तितका अशा रीतीने गाढ अंधारातला प्रकाशहि डोळा ग्रहण करू शकतो. ईश्वराच्या घरी कोठेहि अंधार नाही!

१५७

असख्य नामे, रूपें, गुण आणि कर्मे यांमधून नेमके कोणते नाम, रूप, गुण आणि कर्म आम्ही शोधून काढावे की जे सर्व नाम-रूप गुण-कर्मांचे आणि त्यापलीकडे जे काही असेल त्याचेहि सार असेल देवा ! तुझ्या नावात सर्व काही येते असे म्हणतात, पण त्याचा अनुभव येत नाही. विचार करता करता साक्षात्कार झाला की बाळकृष्णात सर्व कांही येते अथवा आईमध्ये सर्व काही समाविष्ट होते. कारण आम्हाला हे प्रभो ! हेच प्रथम तू दाखविले आहेस ! हेच प्रथम उपासनादर्शन ! हेंच सारांचे सार. यात सर्व कांही येते !

१५८

सकोचाची दशा असो की विस्ताराचा पसारा असो, तुझ्या गुणाची असख्य डोळस लेणी कधीही लपत नाहीत. उलट त्याची निर्गुण पार्श्वभूमि त्याना खुलावट देऊन आम्हाला सतत आकृष्ट करीत असते. आणि ज्या वेळी तुझा विस्तार चोहीकडून लीलामय गतीचा फेर धरूं लागतो त्या वेळेला तर आमचे सर्वांग रोमहर्षित होऊन तुझ्या आर्त अतर्निनादाबरोबर आमच्या हृदयाचे स्पंदन साथ करू लागते. श्वास निरुद्ध करून आम्ही तुझी आनंदमय लीला पहात विचार करतो की या लीलेचे रहस्य काय ? तेंव्हा प्रतिध्वनि निनादतो की आत्मविद्येचे वाहकत्व हेच या लीलेचे रहस्य आहे मग आमची सर्व विद्या अविद्या असून ती विसरलीच पाहिजे या निर्णयावर आम्ही येतो, आणि आम्हाला विस्मरणाचे सामर्थ्य दे हीच आम्ही मागणी करतो !

१५९

तूं प्रत्येक वस्तूत आपल्या सर्व आशयासह रहात असून आम्हाला त्या त्या वस्तूंत ते ते आकार आणि गुणच तेवढे दिसतात. त्या गुणांचा आणि आकाराचा गुणाकार करून तुला पाहू गेलो तो माझा आणि तुझाहि पूर्ण लोप होऊन तुझे सर्वैश्वर्याच्या आशयाने नटलेले रूप डोळे दिपू लागल्यामुळे दिसूनहि न दिसल्यासारखे झाले ! हे परमेश्वरा ! माझ्या डोळ्याना दर्शनाची शक्ति देऊन कृतार्थ करण्याचे तेवढें का बाकी ठेवतोस ?

१६०

भिन्न भिन्न आकाराच्या, वळणाच्या आणि वर्णाच्या घनसामजस्याचा समन्वय आतरस्थितीला जरी अप्रकट ठेवतो तरी आतरस्थितीचे मर्मच तो उघड करून सागत असतो. हे मूर्तिकाराला आपल्या मूर्तींत मूर्तिमत करावयाचे असल्यामुळे दिवसामागून दिवस तो मूर्तीची आतरस्थिति सम्यक् रीतीनें कशी प्रगटेल याचेच चिंतन करीत मूर्तिविश्वात गढलेला असतो —हे विश्वमूर्तिकारा ! तू या विश्वमूर्तिचिंतनासाठी कोणत्या मूर्तिविश्वात गढून गेला होतास ? त्या तुझ्या परमधामाचा मार्ग आम्हाला दाखवशील काय ?—की जो पाहून तुझी मूर्तिविश्वातली चिंतनमग्न मूर्ति आम्ही पाहू शकू !

१६१

दिलेल्या वस्तु अपरपार वाढ करून परत करण्याच्या तुझ्या ऐश्वर्यानेच आमचे कृपण जीवन संपन्न होत असते. त्या संपन्नतेला तुझ्या उदारतेची जोड मिळेल तेव्हाच ते खरे संपन्न होईल आणि कृपणतेचे लांछन निघून जाईल तुझ्या ऐश्वर्याची आम्ही मागणी करीत नाही, तर त्यामागे उभ्या असलेल्या उदारतेची मागणी करीत आहोत. उदारतेने आम्हाला ऐश्वर्य मिळवावयाचे नाही, आणि ते मिळवणे शक्यहि नाही फक्त आमच्या जीवनातली कृपणता जावी एवढीच आमची इच्छा आहे. हे प्रभो ! ती घालवशील तरच तुझे ऐश्वर्य खरे, हे खरें ना ? मग आता उशीर का ?

१६२

तुझ्या जीवनाच्या प्रावृषवर्षावामध्ये तुझ्या चिंतनाचाहि वर्षाव आंतर्भूमिकेत होत असतो आणि तिला सर्व तऱ्हेने शांतवून, सजवून अपूर्व नाविन्याची लयलूट तू करवीत असतोस या तुझ्या कृतीकडे आमची दृष्टी न गेल्यामुळे तुझी वृष्टि हे देवा, होऊनहि न झाल्यासारखी फुकट जाते ! याचे तुला वाईट वाटत असल्यामुळे वृष्टिरूपाने हजारो नेत्रांनी तुझ्या अश्रुधाराच वाहत आहेत असेहि वाटल्यावाचून रहात नाही आम्ही तुझ्या चिंतनवृष्टीचा अर्थ बरोबर समजू तेव्हाहि तुझ्या असंख्य डोळ्यातून असंख्य अश्रुधारा वाहतीलच पण त्या आनंदाच्या अश्रुधारा असतील ! त्यांनीच हे प्रभो, आम्हाला तू अभिषिक्त कर !

## १६३

परिवर्तनाच्या भीतीमुळे आम्ही तसेच राहिल्यामुळे परिवर्तन न थांबता ते अनिष्ट दिशेने होत गेले आणि आम्ही अधिकाधिक दुर्बल बनत चाललो ही दुर्बलता घालविण्यासाठीं, परिवर्तनाला इष्ट वळण लावण्यासाठी आणि परिवर्तनावर मात करण्यासाठी आम्हाला भीति सोडावीच लागेल पण तुझ्या प्रीतीचाहि आश्रय घ्यावा लागेल. तो घेतल्यावर भीति कशी उरेल?- पण भीति सोडावी म्हणून सुटते थोडीच! उलट ती अधिकच चिकटते! म्हणून ती सोडण्यासाठी तुझ्याच पायाशी धरणे धरावे लागेल!- खरोखर तुझे पाय हाच सर्व उपायाचा उपाय आहे!

## १६४

आम्ही ज्या देशात आलो आहोत तो स्वदेश नाहीच पण स्वदेश नसला तरी स्वदेशाप्रमाणे सुपीकपणाने भरलेली शेतं, आत्मीयतेने भरलेली गावे, कारुण्याने भरलेल्या नद्या, बोधाने ज्याना नित्य आश्रय दिला आहे असे आश्रम, श्रमाच्या महिम्याने विश्राम जेथे नटून गेला आहे अशी मैत्रीची नदनवने, परमोच्च भावभूमिकेने विशालतेला तोलून धरणारे उत्तुग पर्वत, सर्व रत्नानी भरलेले महासागर, सहजव्यवस्थेने चालणारी व्यवहारोपासनेची देवघेव जरी आम्हाला यत्किचित् दिसती तरी आम्ही हा परदेश पण जेथे याचा लवलेशहि नाही तेथ अजाणता आम्ही आलो आहोत!- तेव्हा आता याला स्वदेशासारखा बनवला तरी पाहिजे, नाही तर लवकरात लवकर हा देश सोडला पाहिजे पण हे परमेश्वरा! खरे म्हटले म्हणजे आम्ही स्वदेशालाहि स्वदेश मानीत नाही जेथे तुझा निवास असेल तोच देश आम्ही स्वदेश मानतो! तेव्हा आता आम्हाला लवकरात लवकर स्वदेश- परदेश दोन्ही सोडून तुझ्या खऱ्या स्वदेशात घेऊन जा!

१६५

सत्याचा विजय होतो म्हणतात. असेल. पण आम्हाला सत्य हवें अशी स्थिति नसून विजय हवा असतो आणि त्याचे सत्य हें आम्ही साधन मानीत असतो. आणि जरी पराजय झाला तरी ज्या अर्थी आमच्याजवळ सत्य आहे त्या अर्थी शेवटी आमचा विजय होईलच असेहि आम्ही म्हणत असतो. सर्वांत आम्ही विजयाला प्रामुख्य देत असतो.—पण विजय म्हणजे काय? समोरच्या बाजूवर, समोरच्या पक्षावर किंवा परिस्थितीवर मात करणे हा विजयाचा अर्थ घेतला तर सत्य हे विजयाचे साधन म्हणून त्याला महत्त्व असो. पण ते गौण ठरते यात शंका नाही. म्हणून सत्यच जय आहे सत्याहून वेगळा जय नाही. सत्याचा जय होतो हा आभास आहे. सत्य विजय-स्वरूप आहे. पराजय वाटला तरी सत्याचा विजय आहेच. कारण सत्य परमेश्वरस्वरूप आहे! हे आम्हाला कळले पाहिजे.

१६६

स्थिरतेत केवळ अद्वितीय असून तसा आभासहि होऊ न देता आपल्याभोवती नकळत सगळ्या परिवर्तनशील जीवाची सोय करून समदृष्टीने सगळ्यांना तोलून धरण्यात जर कोणाची तपस्या कारणी लागली असेल तर ती तुझीच! अफाट जीवनात मार्ग चुकून गोते खाण्याचाच जेथे अधिक प्रसग तेथे आपल्या मार्गाची योग्य कल्पना जर कोणी देत असेल तर ती तुझीच अनमोल सहाय्याची दक्षता! मार्ग चुकत नसला तरी स्वस्थानाच्या भूमिकेची बिनचूकता जर कोणी ठसवूं शकत असेल तर ते तुझेच दर्शन! सर्व बाजूंनी परस्परसापेक्ष व्यवस्थिति निश्चित करण्याला जर कोणता मानदड असेल तर तो तूंच! म्हणून सर्वांच्या सहकार्याच्या महान् महोत्सवात तुझे विस्मरण हा महापराध गणला जावा यात आश्चर्य काहीच नाही पण तुझे स्मरण होऊनहि मायेची दाट पटले तुझ्या दर्शनापासून आम्हाला वंचित करतील ही भीति आहे! माडीवर बसलेल्या बाळाचे बागुलबोवापासून निवारण करणाऱ्या मातेप्रमाणे तू दूर कर आणि आपला अभयहस्त आमच्या डोक्यावर ठेव!

१६७

ज्याची डळमळित स्थिति आम्हाला जीवनापासून वंचित करील, ज्यामधल्या अल्प क्षतीनेहि आम्ही कोठल्या कोठे नष्ट होऊ. ज्याची प्राणमयता जर योग्य तऱ्हेने समाविष्ट होणार नाही तर आमचा प्राण टिकणार नाही, जो अज्ञात शत्रूपासून कुशलतेने दूर राहणार नाही तर आम्ही सर्वस्व नागवले जाऊं, ज्याचे सहाय्य घेण्यात आम्हाला किती तरी धोके आहेत पण दुसरा इलाज नसल्यामुळेच ज्याच्या आश्रयाला आम्ही आलो, तो हा नर-देह केवळ हे परमेश्वरा, तुझ्या सागण्यावरूनच मान्य केला, त्याबद्दल आम्ही अविश्वास धरला नाही, पण तुझ्या या साधनाबद्दल सावधानता प्रगट केली आहे ही गोष्ट तुला अमान्य होणार नाही असा आमचा विश्वास आहे

१६८

दूरच्या कठिण प्रवासात नित्य बरोबर राहण्यात, स्वगृही उत्सुकतेने प्रतीक्षा करण्यात, मधून मधून सावधानतेची सूचना देण्यात आणि अनिष्टाला स्वतः होऊन दूर पिटाळून लावण्यात हे मित्रा ! तुझी जी स्नेहाची सांभाळण्याची रीत दिसून येते तीत मित्र आणि मातेच्या एकीकरणाची प्रक्रियाच मूर्तिमंत झाल्याचे भासते तुझे सख्य असे सौख्यहिताच्या प्रेमाने ओसंडून जात असल्यामुळे ते शेवटपर्यंत टिकून त्याचे अनुकरण करण्याचे सामर्थ्य जर मला लाभेल तर परस्पराची उत्तम जोडी जमेल या विचाराने माझ्या मित्राविषयी सर्वोच्च सन्मानाचे स्थान माझ्या हृदयात कोरून ठेवले आहे !

१६९

माझे हे फळ पिकून पडून सडून जाईल ही भीतिच व्यर्थ आहे. कारण हे विश्ववृक्षाला लागलेले लाडके फळ आहे! हे काय सामान्य फळ आहे? या फळात भविष्यत जगाची सर्व रचना आयोजित झाली असून ती रसमयतेने भरलेली आणि बीजभूत तत्त्वाच्या मजबूत आधाराने स्थायी टिकणारी असल्यामुळे येथे मधुर आशांचे प्रातिभासिक हास्य साकारले गेले आहे. यात आत बाहेर मध्ये कोठेहि पहा, ईश्वराची अद्‌भुत कला साकल्याने अवतीर्ण झालेली आहे रत्नानाहि लज्जित करणाऱ्या लहान लहान पेशीच्या कोशानी येथे स्वतंत्र पण संबद्ध सामंजस्यच कोंडून गेले आहे हे अत्यंत मोहक असून ते सेवन करण्याचा मोह कोणालाहि होणार नाही हे मोहाचा निरास करून परमेश्वर-चरणाच्या जवळच त्याचे अर्पणद्रव्य म्हणून सन्मान्य पदवीला पोचेल! ते नित्य पिकून पडून सडून जाईल ही भीति मला वाटत नाही!

१७०

तुला पाहणे शक्य नाही तरी तुझेच दिव्य दर्शन आम्हाला घडत आहे, तुझा शब्द ऐकणे शक्य नाही तरी सदा सर्वकाळ तुझीच मधुर वाणी कानाला सुखवीत आहे तुझ्याशी बोलणे अशक्य पण तुझ्याशी गुज-गोष्टी करण्यातच मी गुतलो आहे तुझा स्पर्श कोणालाच शक्य नाही पण तुझ्या पावन स्पर्शाने मी सतत पुनीत होत आहे या स्थितीच्या महापुरात काल-स्थल सर्व जग लोपून जात आहे मग मी कोठून उरेन? आणि असे वाटते की, तू टिकशील तर टिकशील आणि आम्हालाहि वाचवशील!

१७१

तुझ्या दर्शनाच्या आड आमची कल्पनाच अंतररूपानें उभी आहे. तिला दूर सारू म्हटले तर ती दूर सरत नाही, मग तिला तुझ्याच सेवेसाठीं ठेवून घेतली. त्या तुझ्या सेवेत झिजून झिजून ती पार मावळून गेली. त्या कल्पनारहित अकल्पनीय स्थितीत तुझे अकल्पनीय दर्शन झाले ही तुझी कृपा खरीच ! पण कल्पनेचीहि कृपा नव्हे काय ?

१७२

तुझें अशक्य कोटीतले दुर्लभ दर्शन आम्हाला शक्य व्हावे इतकेच काय पण ते सदैव सहज शक्य व्हावे. आणखीहि आम्ही म्हणतो कीं दुसरे कोणतेहि दर्शन तुझ्या दर्शनांकितच असावे किंबहुना दुसरें कोणतेहि दर्शन आम्हाला अशक्य व्हावे. आमच्या इच्छेची ही मजल पाहून तुला आश्चर्य वाटेल पण जर इच्छाच करावयाची तर ती अल्प काय म्हणून करावी ? तूच आम्हाला अमर्याद इच्छा दिली आहेस म्हणूनच आम्हीहि इच्छेला मर्यादा घालीत नाहीं !

१७३

विचार करता करतां चित्त क्षीण होते. मग विचार तात्पुरता बंद होतो. पण तुझा विचार करता करता तो बंद न होता तो तुझेंच रूप धारण करतो. त्यामध्ये माझेपणहि लुप्त होऊन मी तद्रूप होऊन जातो. मग तेथे चित्ताला क्षीण कोठला ? हे सकलविश्वविश्रामधामा प्रभो ! अशा तऱ्हेने आमचा सर्व शीण दूर करण्याची कृपा कर !

१७४

शाति हा एक केवळ तात्कालिक विसावा आम्ही समजत नसून ते जीवनातले सर्वव्यापी तत्त्व असून त्याला अतिम उद्देशाचे परमोच्च स्थान असल्यामुळे आमच्या सर्व हालचाली त्याच सार्वभौम दिशेने आम्ही कराव्या, आणि भिन्न भिन्न तात्कालिक उद्देश त्याच सूत्रात ओवून आम्ही अनेक लहान लहान ओहोळ, नाले, नद्या मिळून महानदी बनते त्याप्रमाणे त्या सर्व उद्देशाना शातीच्या महानदीत मिसळून देण्याची प्रक्रिया साधून जीवनाची कला सशास्त्र रीतीने हस्तगत करावी हाच हे देवा ! तात्कालिक विसाव्याने थोड्या शातीचा अनुभव करून देण्यात तुझा अतःस्थ उद्देश आहे. तो तुझा अतर्गत उद्देश उलगडून आमच्या मुख्य महान् उद्देशाला तू जोडून दे !

१७५

जगातल्या गुतागुतीच्या आणि रागद्वेषमय प्रपंचाचा सर्वथैव तिटकारा असलेल्या मनाला कितीहि समजावले तरी ते लौकिकाचारात कधींच सामील होऊ शकत नाही. परतु आतून तसा पूर्ण तिटकारा असूनहि लौकिकाचारात केवळ अलौकिक न व्हावे म्हणून सामील होणारें मनहि लौकिकाचार साभाळीत असतानाच ते अलौकिक आहे हे लपू शकत नाही आतली स्थिति बाहेर प्रगट झाल्याखेरीज रहात नाही. या अनैक्यामुळे धड लौकिकाचारातहि नाही आणि धड अलौकिकहि नाही अशी एक तिसरी अवस्था निर्माण होते कितीहि सद्भावाची पार्श्वभूमि असो, आमची अशी तृतीय प्रकृती हे देवा ! तू कधींहि बनवू नकोस ! तू आम्हांला एकनिष्ठेचीच दीक्षा दे !

१७६

आपल्या मननाला पूर्वप्रवाहाचे वळण जसे लागलेच आहे त्याप्रमाणे अस्थिरतेची आणि स्वैरतेची ओढहि त्याला अस्ताव्यस्त करीत असते तो ओघहि प्रवाहाच्या गतितत्त्वामुळे पुढेच जात असला तरी त्याची स्वैरतेची अस्थिरता मोडून त्याला निश्चित योजनेने स्वाधीन करण्यासाठी आम्ही जो जो प्रयत्न करतो तो तो तो प्रयत्न विफल होताना दिसतो वैफल्यातले मन निराधार बनून पुन्हा स्वैरतेचा आश्रय घेऊ लागल्यास नवल नाही. पण या वेळी त्याचा उद्दामपणा कमी झालेला असतो त्यामुळे स्वैर मनाची विफलता आम्हाला बाधक न ठरता साधकच ठरेल असा आम्ही अदाज करतों तोच त्यामुळे स्वैरतेच्या सवयीने स्वैरताच दृढ होईल ही भीति आमच्यापुढे उभी राहते ही भीति साधार असल्यामुळे आमच्या मननाच्या पूर्व-प्रवाहाप्रमाणेच आमचा उत्तर प्रवाहहि हे परमेश्वरा ! विशेष दिशेने जाईल असे कर, अशी प्रार्थना केल्याशिवाय गत्यंतर नाही.

१७७

एकीकडे जागत जागत आणि दुसरीकडे झोपत झोपत तुझ्या दुनियेतल्या लोकाचे आयुष्य चालले असते त्याना तुझ्या स्वतःच्या जागृतिनिद्रेची यत्किंचितहि कल्पना येत नाही ती येवो न येवो, आम्हाला मात्र ती कल्पना आली पाहिजे. कारण तुझ्या ठिकाणच्या जागृतीच्या आणि तुझ्या ठिकाणच्या ललावस्थेच्या अनुभवासाठीच आमची जागृति आणि आमची निद्रा आहे, असे आमचे निश्चित मानणे आहे.

१७८

आत्मवचना आणि परवचना यामध्ये सतत अभ्यासाने अत्यत प्रवीण झालेल्या मनाला या दोन गोष्टीइतकी कोणतीच गोष्ट आवडेनाशी होते त्या वेळेला त्याला या दुहेरी फासातून सोडविणे अतिशय महत्त्वाचे आणि अतिशय दुःसाध्य ठरते साधकाला ही आपल्या सामर्थ्याबाहेरची गोष्ट वाटून एक वेळ तो हताश झाला तरी हरकत नाही पण त्याने अशा वेळी ईश्वराचा धावा करण्याला सुरवात केली तर त्याची सुटका करण्याला तोहि लवकरात लवकर धावून येईल, यात शका नाही कारण स्वतःला आणि दुसऱ्यालाहि कितीहि फसवले तरी ईश्वराला फसवणे शक्य नाही आणि ईश्वर कधी फसतहि नाही. त्यामुळे तो हा फसवणुकीचा फासा सहज तोडू शकतो.

१७९

अनुकूलतेच्या अनेकविध प्रकारानी आम्हाला दिव्य जीवनाचा मार्ग ईश्वराकडून नकळत दाखविला जातो आणि नानाविध प्रतिकूलते-मधून आमची कसोटी करून ईश्वर आम्हाला नकळत मजबूत बनवीत असतो. ही ईश्वराची सार्वकालिक सार्वभौम योजना असून कोठेहि गेले तरी तीमध्ये मुळीच फरक पडत नाही आम्ही त्या त्या स्थळी नवीन असतो. म्हणजे कमीअधिक अनुकूल-प्रतिकूलतेचा भाव आम्हाला होत असतो. परतु वास्तविक पाहता अनुकूल मात्र ईश्वराची कृपा आहे आणि प्रतिकूलतेला आपणच मूळ कारण आहोत हेहि जेव्हा आम्हाला कळेल तेव्हाच आम्हाला खरी दृष्टि प्राप्त झाली असे म्हणता येईल किबहुना सर्वच ईश्वराची कृपा आहे हा अनुभव आम्हाला आला पाहिजे.

१८०

आता वाहन येईल, निघायचे म्हणून वाट पाहतां पाहतां व्यर्थ वेळ गेला. वाहन आले नाही. कारण ते परावलबित होते. त्यामुळे आम्ही आहोत तेथेच ताटकळत राहिलो. परावलंबनामुळे साधना कुंठित होणे हें दुर्दैवच ! पण परावलबन हेच खरे दुर्दैव आहे ! ते साधन भासले तरी ते दुर्बलतेचे साधन आहे ते साधनेला बाधकच आहे. परावलबी साधनाला साधन मानण्याचा भ्रम हे प्रभो ! कोणालाहि पडूं देऊ नको.

१८१

माझ्या बरोबरीचे सोबती केव्हाच पुढें निघून गेले. मी मात्र या पडशाळेत झोपून राहिलों आहे मजजवळ सामानहि इतकेच आहे की ते मला एकट्याला नेववणार नाही ते टाकून जावे तर तेहि शक्य नाही त्यात किती तरी मौल्यवान् वस्तु आहेत अशा चिंतेने खिन्न होऊन किंकर्तव्यमूढ झालों असता शुभ्र घोडयानी जोडलेल्या दिव्य रथाचा आवाज ऐकूं आला. तो रथ अगदीं जवळ आला. त्यातून त्या दिव्य प्रभूची मूर्तिहि स्पष्टपणे दिसली. मग काय? तिने विचारले, “ तुला कोठे जायचे आहे? रथात बस. सामानसुमानासकट सुरक्षित पोचवून देतो. ” काय उत्तर देणार? मी हात जोडून, पाया पडून सागितलें, “ मला कोठेहि जायचे नाही. माझे सामानहि येथेच सोडून द्यायचे आहे मला फक्त आपल्या रथात बसवून आपल्या परमधामाकडे न्या. ” हे ऐकल्याबरोबर त्या प्रभूच्या प्रसन्नतेला पार राहिला नाही ! त्याच्या प्रसन्नतेला प्रसन्न करणाऱ्या हास्याचा मी दास झालों आणि रथात बसलो आता मला कसलीच चिंता राहिली नाही. मजजवळ कसलाहि बोजा नाहीं !

## १८२

अनेक बाबतीत मजपाशी योग्यता नाही हे चांगलेच आहे. सर्व बाबतीत जर मी योग्य असेन तर मला विश्रांति तरी मिळेल काय? म्हणून योग्यता तेवढीच योग्य नसून अयोग्यताहि योग्य आहे। अयोग्यतेलाहि योग्यता देऊन त्या प्रभूने आमच्यावर केवढा उपकार केला आहे।

## १८३

अभावाची पूर्ति करण्यासाठी सतत धावून जाणारी तुझी स्फूर्ति आमच्यापुढें मूर्तिमंत होऊन आमच्या रोमरोमांत ती ठसून जाईल तर अभावाने दीन झालेला आमचा स्वभाव पालटून तेथे समाधानाचे सामर्थ्य निर्माण होईलच, पण त्यापुढेंहि जाऊन तुझ्या कारुण्याचे कर्तव्य तेथे प्रगटेल आणि विश्वचैतन्याच्या वागीश्वरीने सगळीकडची संकुचित परस्परसंबंधाची भाषाच पलटून तेथे सर्व विकासाची एकच भाषा— एकच आशा दरवळून जाईल। हे प्रभो। त्या सुगंधाने आम्हाला प्राणवान् कर आणि केवळ मानवच नव्हे तर सर्व प्राणिमात्र आमचेच होऊ दे।

## १८४

निरर्थक वाटणाऱ्या गोष्टींतहि ईश्वराने अर्थ भरलेला आहे हें न कळून आम्ही अनेक वेळा अर्थयुक्त वस्तूनाहि निरर्थकतेमध्ये टाकून आमचेच जीवन व्यर्थ करीत असतो. म्हणून अर्थ कळला नाही तरी निरर्थकतेचे कोणावरहि कधीहि आरोपण न करता अर्थ कळण्याच्या कळकळीने प्रयत्न आणि प्रभूची प्रार्थना आम्ही करू तर निरर्थक वाटणाऱ्या वस्तूंत परमार्थ भरलेला आढळून येऊन आमचा सर्व प्रपंच परमार्थमय होईल. त्यात स्वार्थ-परार्थ आणखी जे जे अर्थ असतील ते सगळे अविरोधाने मालकी-हक्क सोडून सेवक बनतील।

१८५

माझ्या दीर्घ प्रवासाच्या अती घोर अरण्यात रात्र पडण्यापूर्वी निदान मला एखाद्या तपस्व्याच्या झोपडीचा तरी आश्रय मिळेल या आशेने मी थकलो होतो तरी झपाझप पावले टाकीत चाललो होतो तोच परम आश्चर्य ! मी एक भव्य राजमदिर पाहिले. त्यात माझ्यासारख्या भणगाला कोण आश्रय देणार या कल्पनेने मी थबकून राहिलो. तोच दुसरें आश्चर्य ! माझ्या स्वागताची सुस्वर गाणी गात गात अत्यत विनयाने कित्येक सेवक बाहेर आले. माझी याना माहिती तरी कोठून मिळाली याविषयी चकित होऊन मी तोंडात बोट घातले न घातले तोच त्यांनीं मला साष्टाग प्रणिपात केला. आणि माझ्या गळ्यात दिव्य फुलाची माळा घातली. माझ्या भिकारी वेशाला ती मुळींच शोभा देत नव्हती मी काहीसा वरमून त्याच्याकडे पाहतो न पाहतो तोच त्यानी मला मृदु वाणीनें " आंत चलण्याची कृपा व्हावी " म्हणून म्हटले. त्यानी माझे पाय धुण्यासाठी सोन्याच्या पात्रातून उमललेल्या कमळाच्या सुगंधानें सुगधित झालेले पाणी आणले. मीं पाय धुतले तरी तेथल्या शुभ्र आणि मखमली गालिच्यावर माझे मलिन पाय उमटलेच ! त्यामुळे मीच लज्जित झालो ! परतु त्याना त्याचे काहीच वाटले नाहीं. आता आत कोणत्या राज-राजेश्वराचे मला दर्शन करवितात म्हणून मी उत्सुकतेने वाट पाहूं लागलो तो आत्मराजाचे लखलखीत सिंहासन मला दिसले पण तेथे कोणीच बसलेले नव्हते मलाच त्यानी त्यावर बसविले आणि तत्क्षणी माझा भिकाऱ्याचा देह आणि त्यावरचा वेष नष्ट झाला. ते सेवक म्हणाले, " आता आपली आणखी कोणाशी भेट होणार नाहीं. आपणच येथले स्वामी आहात आणि आपलीच आपणाशीं अखड भेट येथें होत राहील. आपला प्रवास आता सपला. आपणाला आमचीहि जरुरी नाही. आपणच येथे सेव्य-सेवक सर्व काही आहात आता आम्हाला

जाण्याला परवानगी असावी." असे म्हणून तेहि निघून गेले. आणि आश्चर्य असे की ते राजमंदिर, तें सिंहासनहि लुप्त होऊन तेथे मीच तेवढा उरलो. मार्ग नाही, अरण्य नाही, प्रवास नाही, प्रवासी नाही, तपस्वी नाही, त्याची झोपडी नाही, राजमंदिर नाही, सिंहासन नाहीं, सेवक नाहींत,– केवळ मी. तेंच प्रभूचे कैवल्यधाम !

## १८६

ते दिवस आम्हाला आठवतात जेव्हा रानावनात आणि– डोंगर-पठारावर आम्ही केव्हाहि निर्भयपणे खेळत होतो वन्य फळांच्या आस्वादाबरोबर वन्य पक्ष्याची तऱ्हेतऱ्हेची गाणी आम्ही ऐकत असू आणि पक्ष्याची नाना तऱ्हेची घरटीहि कौतुकाने पहात असू आमचे ते मोठे घर पण डोंगरावरून एखाद्या लहान पक्ष्याच्या घरट्याहूनहि लहान दिसे. त्याजवळची विहीर तर लुप्तच होऊन जाई. पण आमच्या गावा-जवळचे तळे विहिरीसारखें भासे. गावातल्या गवताच्या झोपड्या आणि पेंढयाचे माचे अगदीच किरकोळ भासत. आमच्या चिमुकल्या डोळ्यात ते सर्व गाव चिमुकले होऊन ते जणू आमच्या हातात आले असे आम्हाला वाटत असे. हे सगळे देवाचे जग देवाला असेच अगदी चिमुकले दिसत असेल, आणि म्हणूनच तो मोठ्यातला मोठा असून आमच्या देवघरात चिमुकला होऊन राहिला असेल का ? हा प्रश्न जरी त्या वेळी आमच्या चित्तात उद्भवला नाही तरी आमच्या देवघरातले चिमुकले देव आम्हाला फार आवडत. त्याची पूजा आम्हाला कोण करू देणार ? त्याच्यापुढे हात जोडताना आम्हाला जो आनंद होई तो आम्ही नाचत नाचतच प्रदर्शित करीत असू. ते आमचे दिवस आमच्या चित्तात पुन्हां आम्ही आठवतो तेव्हा अंतःकरणाची कालवाकालव होते. ते दिवस गेले. परमेश्वराकडे त्यानी आमच्या सरळपणाची– निर्दोषतेची नोंद केली. मग आता व्याकुळता का वाटते ? पुढच्या सगळ्या दिवसानीं परमेश्वराकडे

आमच्या वक्रतेची नोद केली असेल म्हणून त्याबद्दल परमेश्वर आम्हाला शिक्षा करील. ही भीति आम्हाला नाही. आम्हींच आमच्या ठिकाणी अप्रसन्नतेची न संपणारी शिक्षा भोगीत आहोंत !— वास्तविक ती भोगणे अवश्य नव्हते, यामुळेच चित्त व्याकुळ होत आहे. क्षमेमुळे चित्ताचे समाधान होणार नाहीं. आम्हाला क्षमा नकोच आहे ! फक्त पुन्हा त्याच लोपलेल्या बालदशेची निर्व्याजता आम्हाला हवी आहे !— आता ती आम्ही इतक्या काळानंतर, इतक्या विरुद्ध सस्कारानतर कोठून मिळवणार ? ती आमच्या हातची गोष्ट राहिलेली नाही. तरी पण आम्ही पुन्हा त्याच रानावनात डोगरपठारावर कधी कधी जाऊन आमच्या अश्रुधारानी आमच्या वक्रतेचे परिमार्जन करतो, आणि आम्ही त्याच देवघराच्या जागी देवासमोर हात जोडतो तेव्हा थोडा वेळ आम्हाला बरे वाटते !

## १८७

मला कळले की, थोर थोर भक्ताचा सत्सगमहोत्सव होणार आहे. पण मला आमंत्रण नाहीं. अनेकाच्या आमत्रणात माझें आमत्रण राहून गेले असले तरी हरकत नाहीं. मी निमंत्रणावाचून गेलों तरी कोणालाहि अनपेक्षित वाटणार नाहीं. या विश्वासाने मी पुढे चालूं लागताच जेव्हां अनेकानी माझ्या गमनाचे स्थान विचारले तेव्हा लोकाना भक्ताच्या महोत्सवाची कल्पना नसावी याचे मला आश्चर्य वाटले. पण लगेच विचार आला कीं, सत्सगमहोत्सव म्हणजे जत्रा नव्हे. नसेल लोकाना कल्पना । मग अनेक वळणे घेत घेत त्या निवान्त स्थानी मी दाखल झालो, तेव्हां तेथें फक्त १०–१२ मडळी होती आणि ती मडळी महोत्सवाचे आमंत्रण नसताच आलेली होती. तेथे कोणाला बंदीहि नाही आणि आमत्रणहि नाहीं असे मला कळले. तेव्हा मला फार बरे वाटले कीं, मी आमत्रणाच्या भरंवशावर न राहता स्वतःच्या उत्सुकतेच्या भरवशावर राहून ही पर्वणी साधली । ते दहा-बारा भक्तच, पण त्याच्या प्रेमसुखाच्या वार्तालापात त्यानी मलाच काय पण प्रत्यक्ष प्रभूलाहि हर्षनिर्भराने नाचावयास लावले. आमच्या अतरंगाच्या सभामंडपात हे दृश्य आम्ही प्रत्यक्ष पाहिले आणि आम्ही धन्य झालो ।

१८८

कोणी केव्हाहि, कितीहि आणि कसेहि आघात केले तरी त्याचे प्रत्युत्तर एकाच मधुरतेच्या मार्दवाने मिळावे ही अलौकिकता आपल्या प्रत्यंगात पसरवून दिल्यामुळे मगलतेचे प्रकटीकरण करण्यासाठीच त्याचे जीवन वाहिलेले आहे ! ते आपल्या सहज नित्यकर्माच्या द्वारे परमोच्च अशा दिव्य मंगलमूर्तीकडे आमचे लक्ष वेधून आपण नेहमी बाजूलाच राहतात. मुख्याची भेट झाल्यावर गौणाना कोण विचारतो, ही जरी आम्हा सर्वाची भूमिका असली तरी त्याना त्याचे मुळीच वैषम्य वाटत नाही, उलट आपणाकडे कोणाचे लक्ष वेधणे ही गोष्ट ते आपल्या जीवित-कार्याच्या विरुद्ध समजतात. त्याच्या या अद्भुत परोपकाराकडे पाहून कोणीहि त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करीत नाही की त्याच्या ऋणातून अशतः तरी मुक्त होण्यासाठीं त्याना कोणती वस्तु देत नाहीं, पण त्यामुळे त्याना उलट सतोष होतो. आणि सर्व काही त्या मंगलमूर्तीपुढे ठेवावे, सर्वानी तिलाच सर्व द्यावे असेच त्याना वाटते. या सर्वाचा विचार करता वास्तविक मगलमूर्ति हे आहेत, की आम्ही समजतो ती मूर्ति आहे याचा उलगडा होत नाही हे प्रभो ! तू याच्या आड लपून आम्हाला सभ्रमात टाकू नकोस !

१८९

गायनाचे सूर हवेत विरून गेले नाहीत अजून वातावरणात त्या मधुर चिजा घुमत आहेत तोच तू त्याचे अनुकरण कर, नाही तर मागून त्याचे अनुकरण तर होणार नाहीच पण गायनाच्या मिषाने लोकाना तू रडतो आहेस असे वाटेल ताज्या टवटवीत घमघमणाऱ्या वासाच्या फुलानीच तूं पूजा कर. निर्माल्याने तूं पूजा करशील तर तूच निर्माल्य होशील. अरे ! जोंपर्यंत हे अन्न निवालेले नाही तोपर्यंतच तू ते अतिथीला वाढ, नाही तर शिळ्या आतिथ्याबरोबर तूंहि शिळा होऊन जाशील. जोपर्यंत तारुण्याचा भर ओसरला नाही तोच तू त्यात ऋषीच्या आरण्यक जीवनाचा रंग भर, नाही तर सर्व बेरग होऊन जाईल. अनेक आघात सहन करण्याची शक्ति आहे, तोंच त्या प्रभूची आपल्या जीवनातून सर्वांगसुंदर मूर्ति घडव नाहीं तर केवळ दगड होऊन पडावे लागेल.

१९०

माझें बाल्य हरवले तरी ते अनेक बाल-बालिकाच्या रूपानं सर्वत्र पसरून जाईल. माझें तारुण्य ओसरले तरी अनेक तरुण-तरुणीनी विभूषित होईल. माझी वृद्धताहि जीर्ण होऊन अनेक वृद्धाची वाकळ बनेल. माझा देह धरणीवर पडला तरी त्याच धरणीतून अनेक नवे देह अवतार धारण करतील.—एकाच अवस्थेंत राहण्याच्या कारागृहांतून माझी मुक्तता होऊन मी सर्व अवस्थात विहार करीन. पूर्वी मी अनेक बालबालिका-बरोबर खेळत असे, पण यापुढें सर्व बालबालिका मीच बनेन. यापुढें सर्व तरुणतरुणीच्या महत्त्वाकाक्षेंत माझीच मूर्ति रमलेली असेल. सर्व वृद्धाचा अनुभव माझ्यांतच मुरून जाईल ! सर्व जीवन माझ्यातच केंद्रित होईल. यापुढें हे परमेश्वरा ! तू सर्व अवस्थाच्या मेजवानीसाठीं मला आमत्रण देऊन धन्य करशील ! जागृति, स्वप्न आणि निद्रा याच्या मधुर मिश्रणाने आणि त्याही पलीकडच्या अपूर्व स्नेहवस्तूंनं बनविलेली विकासवर्धक पक्वान्नें मला तूं आग्रहा-आग्रहाने खाऊ घालून आकाशाएवढा मोठा, वाऱ्यापेक्षाहि गतिमान्, सूर्याहूनहि तेजस्वी, चद्राहूनहि सुदर, नक्षत्र-तारकाहूनहि सपत्तिमान बनवशील, आणि मी तुझ्या कृपेची गाणी गात गात म्हणेन की—

अगामुळेच माझ्या गगा पवित्र झाली ।
उची हिमालयाला माझ्यामुळे मिळाली ॥

१९१

अतिशय पीडेने व्याकुळ होऊन कळवळणाऱ्या या जीवाचा कळवळा येऊन सहानुभूतीने आणि काही उपाय करता येईल या उपाय-बुद्धीने अनेकाच्या रूपाने तू येऊन गेलास, पण मला ते कळले नाही. मी फक्त अमुक अमुक आले,–वैद्य आले, हकीम आले, भाऊ आले, मित्र आले– असेच बरळत राहिलो ते माझे बरळणे दूर करून जेव्हा सर्वरूपाने तूच मजकडे आला होतास हे कळले तेव्हा हे दीनदयाळा! माझी वेदना– जी कोणत्याहि औषधाने गेली नाही, कोणत्याहि उपचाराने कमी झाली नाही, कोणत्याहि शब्दाने जीत फरक पडला नाही, ती सर्व परिस्थिती पालटून गेली माझ्या दारुण वेदनेतहि तुझ्या सहानुभूतीची संवेदना आणि शांतीची मूर्ति मला आढळून आली, आणि तिला मी वारवार निरखून पाहू लागलो आता सर्व उपचार मदावले सर्व गर्दी कमी झाली मी तुझ्या विश्रामधामात तुझ्या स्वरूपाच्या ठिकाणी पूर्ण विश्राम पावलो आहे! या तुझ्या कृपेचा मी कधीहि उतराई होईन काय?

## १९२

तुझा अव्यक्ताचा अनत खजिना केवढाहि मोठा असला तरी त्यांतून आम्हाला वाटेल तेवढा लाभ होईल ही आशा तर सफल झाली नाहीच पण व्यक्ताच्या प्रत्यक्ष लाभालाहि आम्ही मुकलों असा अनुभव आल्यावर व्यक्ताकडे आम्ही जी जी मागणी केली ती भक्तिपूर्वक केल्या-मुळे आम्हाला खरोखर अपरंपार लाभाची ही खाणच आहे असा अनुभव येत आहे या अनुभवाने आम्ही तुझ्या अव्यक्ताच्या खजिन्याबद्दल अनादर किंवा अविश्वास दाखवीत नाही परतु आमचीच तेवढी पोच नाही असेच आम्ही मानतो. तसेच व्यक्ताच्या तुझ्या गगाजळीवर आमचा वाटेल तेवढा अधिकार नाही हेहि खरेच असले तरी त्या गगा-जळीची आमच्यावर अपरपार कृपा आहे, हे आम्हाला कबूल करावेच लागेल !

## १९३

निराधार अशा आम्हाला तुझा आधार मिळाल्यास आणखी काय पाहिजे ?–पण तो आधार नेहमीच मिळत नाही हेच आमचे दैन्य आहे ! तो आधार आता मिळाला आहे असे वाटून आम्ही आनदून जातो. आणि लहान मुलासारखे नाचू लागतों, तोच तो आधार सुटतो तूं तो काढून घेतोस की आमच्यामुळे तो सुटतो काही कळत नाही. पण तो सुटतो एवढे खरे तो सुटला रे सुटला की पुन्हा आम्ही दैन्यसमुद्रात गटगळ्या खाऊ लागतो. आणि तुझा थोडासाहि आधार वाटला की मग कोठेहि मर्यादा नाही असा तो आनंदसमुद्र बनतो. तुझ्यापाशी ही सर्व किमया आहे, यात शका नाही. पण त्या किमयेने तूं आम्हाला असा का चाळवतोस ? तुझा एक निश्चित आधार आम्हांला मिळू दे तुझा आधार सुटण्याची जी काही कारणे असतील ती दूर कर. तुझ्या किमयेत हेंहि येत नाही काय ?

१९४

अगदीं लहानशा आकारात महान् मूल्ये दडवून कोणालाहि नकळत त्यात एकसारखी भर टाकणाऱ्या साक्षेपी आणि सावध भक्ताच्या हातातच तुझी शोभा स्फुरद्रूपाने कधी कधी दिसते तीमधल्या मौल्यवान् वस्तु आम्हाला कोठून मिळणार ? पण तीमध्ये काय आहे याची जिज्ञासा मात्र आमच्या मनात घर करून राहते. तीमधील एकसारख्या वाढत जाणाऱ्या सर्व वस्तु आम्हाला कोठून पाहावयास मिळणार ? पण त्यातली एक तरी चीज आमच्या डोळ्याना कधी दिसेल काय ? ही आशा कांही सुटत नाही दुपारचीहि भ्रांत असणाऱ्या आम्हाला त्या वस्तूचा लोभ नाहीं. आम्ही फक्त त्या वस्तूचे जिज्ञासु आहोत. त्या भक्ताची आमची ओळखहि नाही. त्याच्या साठवणीतली एकहि वस्तु तो आम्हाला का आणि कशी दाखवील ? ती न दाखवो, पण तिचे नाव तरी आमच्या कानी पडेल काय ? एथपर्यंत आम्ही आलों तोच तुझे मधुर नाम कानी आले आणि कळले की, भक्ताच्या साठवणीत तुझ्या आठवणीच्याच सर्व महामूल्यवान् वस्तु साठविल्या जात असतात !

## १९५

अनिष्ट वस्तूमध्ये क्वचित् एखादी महत्त्वाची, कधी न आढळणारी वस्तुहि कधी दिसून येते. परतु इष्ट वस्तूंमध्ये मात्र अनिष्ट वस्तु बेमालूम मिसळत असते. आणि ती काढून काढून थकलो तरी तिचा जोर कमी होत नाही. याचे कारण तिला इष्ट वस्तूचा आधार मिळत असतो तो आधार काढणे तर शक्यच नसते. मग अनिष्टाचे निर्मूलन करायचे कसे ? या प्रश्नाचे उत्तर इष्टानिष्टतेला बाजूला सारून काही वेळ केवलावस्थेमध्ये सतत आणि सावधानतेने खोलपर्यंत जाऊन आपल्या अंतःकरणाची उलटापालट करून त्याला परिपूर्ण बदलून उत्क्रान्त करण्यानेच मिळू शकते. तोपर्यंत आमचे अनिष्टनिर्मूलनशास्त्र अनिष्टनिर्मूलन करीत जाऊनहि अनिष्टनिर्मूलनतेचे प्रश्नचिन्हच बनत राहणार यात सशय नाही. हे सर्वक्षेत्रज्ञ प्रभो ! या प्रश्नचिन्हयुक्त शास्त्रातून सोडवून आम्हाला तुझ्याच चतुर्भुज दर्शनाचे उत्क्रान्त साधन दे !

## १९६

भिन्न भिन्न उपाधींनी पीडित न होता आपले स्वातंत्र्य न गमावता उलट त्यामुळे अधिकच प्रफुल्ल होणारें तुझ्या पदरेणूने पावन झालेले ते गंगेचे पाणी, अनेक रागरागिण्यानी कितीहि नियमित केले तरी त्यातून मातेच्या महोदार-माधुर्यप्रेमाने गाइलीं जाणारी तुझी ती भक्त-वदनातून प्रस्फुट होणारी गाणी, आणि परस्पर विरुद्ध भासणाऱ्या असख्य भूमिकाच्या समन्वयाच्या आवर्तनातून सुखसवादाने सदैव शोभायमान झालेली साधुपुरुषाची ती बोधमय वाणी, मी सर्व पास तोडून केवळ या त्रयीचीच आशा धरली आहे !

१९७

निरनिराळ्या पदार्थांच्या ठिकाणी भासमान होणाऱ्या गुणाच्या स्थिरतेच्या मूलभूत कारणमीमांसेत जे काही निष्पन्न होईल त्या निष्कर्षावर आधार ठेवण्याच्या कधीहि न संपणाऱ्या खटाटोपात पडल्यामुळे काही व्यावहारिक उपयुक्त शोध लागून त्याने जीवनावर काहीं इष्ट परिणामहि घडेल हे मान्य करूनहि त्या निष्कर्षाला काहीच अंत नसल्यामुळे आणि निष्कर्ष काढणाऱ्या आम्हाला सर्व बाजूंनी मर्यादा आणि अल्पजीवित्व असल्यामुळे, तुझ्या अंतःस्वरूपावरच का भिस्त ठेवू नये? आणि तुझ्याच इच्छेच्या परमपावन प्रेरणेमुळें सर्व काहीं आहे, होते आणि असेल असे आम्ही का मानू नये? आणि तुलाच ओळखण्याचा आणि शरण जाण्याचा बाह्य खटाटोप सोडून अंत:प्रयत्न का करू नये? या प्रश्नाचे उत्तर कोठेच मिळत नसल्यामुळे हे प्रभो! तुझ्याच अंतर्निष्ठेत आम्ही आमची बुद्धि वाहू पाहात आहोत. तिचे सर्व फाटे तूं तोडून टाक!

## १९८

तुझ्या मूर्तिस्वरूपातहि किती प्रत्यक्ष स्वरूपें दडलेली आहेत, हे आजपर्यंत कळलें नव्हते. पण जो जो निरखून पाहू लागलो तो तो महावस्त्राची मोहक घडी उलगडावी अथवा सहस्रदल कमलाच्या पाकळ्या प्रस्फुटित होत जाव्या त्याप्रमाणे तुझी स्वरूपेंहि अतिशय रमणीय तऱ्हेने उलगडत जाऊन आम्हाला पाहून ती हसू लागली. त्या प्रत्यक्ष स्वरूपाच्या हास्यात आम्हाला अनत निगूढतेची यवनिका बाजूला सरत आहे, असे भासून आम्ही दिग्मूढ होऊन गेलो त्या किंचित बाजूला सरत असलेल्या यवनिकेच्या आत कालस्थलाच्या पलीकडच्या जगाच्या नव-रचनेचे नित्यनूतन नाटक रचलें जात असावे असा किंचित् भास होतो न होतो तोच तो पडदा पुन्हा पूर्ववत् जसा होता तसाच झाला. आणि आमच्या डोळ्यावर आमचा विश्वास बसेना. हे प्रभो ! तुझा तो पडदा, ती यवनिका तू उघड न उघड, आमच्या डोळ्यावरचा पडदा तरी दूर सार आणि आमचे डोळे उघडून रमणीय उषःकालाप्रमाणे मोहाचे माहेर बनलेल्या तुझ्या श्रीमूर्तीवर आमची दृष्टि खिळू दे !

## १९९

रस्त्यामध्ये जिकडे तिकडे वाहनाची एकसारखी ये-जा चालत राहिलेली पाहून ती चित्ताच्या चाचल्याचेच प्रत्यक्षीकरण का मानावे ? ती ती वाहने साधनाचे अनेक प्रकार असून त्या साधनानी प्रभुकृपा का साधली जाऊ नये ? या दृष्टिकोणातून पाहू लागता ती ती वाहने, त्यात बसलेले लोक जरी त्या त्या स्थानी आणि ते ते भिन्न उद्देश धरून जात असले तरी ते प्रभुकृपेच्या मार्गावरचे ध्यानात न येणारे टप्पेच आहेत ही दृष्टि प्रस्फुटित होऊन चित्ताला जे दर्शन झाले त्याने त्याच्या व्यर्थतेच्या हालचालीतला कंटाळवाणेपणा घालवून उलट दिव्यतेचे कौतुक निर्माण केले आणि प्रत्येकाला आम्ही प्रभु-कृपेच्या मार्गावरचा न कळतचा तीर्थ-यात्रिक समजून मनातल्या मनात वंदन करू लागलो !

२००

तुझ्या ठिकाणी चारी बाजूंनी सतत स्फूर्तिप्रवाह वाहात असल्यामुळे तुझ्या मूर्तीच्या ठिकाणी जडतेची कल्पना करण्यात आमच्या जडतेची परमावधि झालेली आहे तुझ्या ठिकाणी सर्वभावाने लीन झाल्याखेरीज ती जडता दूर होण्याचा दुसरा कोणताच मार्ग नसल्यामुळे आणि तुझ्या ठिकाणी लीनता कशी साधावी हे कळत नसल्यामुळे आमचा केवळ तूच एक त्राता आहेस तुला अशक्य काहीच नाही, आम्हाला शक्य काहीच नाही. या परस्परविरोधाचा मेळ वर्तुळाची दोन परस्परविरुद्ध टोके एके ठिकाणी मिळून साधला जाईल याच आशेने आता आम्ही तुझ्याकडे बघत आहोत

२०१

प्रत्येक वेळी अधिकाधिक विकराळ रूप धारण करणाऱ्या मोहाच्या मोहक आवरणाचा ते आले रे आले की तत्काल उच्छेद करणारे ते सत्पुरुष धन्य होत! तेच खरे वीर-पुरुष! पौरुषाचा प्रकर्ष त्याच्याच ठिकाणी प्रकटून त्यानीच अंतःस्फूर्तीने कोणालाहि नकळत सर्व जगताचे नियमन करण्यात यश मिळवावे यात नवल नाही! त्याच्या योगानेच वास्तविक जगाचे धारणपोषण होत आहे. ते त्याच्यामुळे होत आहे हे कळतहि नाही. इतकी त्याची त्या कार्याशी तन्मयता झाली आहे. कार्य होत राहावे कर्ता त्यात मिसळून अदृश्य होत राहावा आणि त्याची क्रिया कोणती याचा मागमूसहि लागू नये हीच सत्पुरुषाची लोकविलक्षण जीवनक्रम रीति आहे! त्याची क्रिया जरी कळली नाही तरी मोहाला प्रतिक्षणी दूर करणारी सत्यशोधनाची दिव्य प्रक्रिया आहे एवढे जर लक्षात येईल तर त्या प्रक्रियेचा आपणहि थोडा प्रयोग करून पाहू हे मना! असे तुला वाटेल ना?—जर वाटेल तर सुरुवात कर. येथे मागे-पुढे पाहण्याचे कारण नाही.

२०२

आम्ही केवळ अवजारें आहोत. केव्हा कुठे कसे काम करावयाचे हे सर्व मर्म त्या दिव्य कारागिरालाच माहीत. पण आम्ही त्या कारागिराची तयार आणि प्रिय हत्यारे बनू तरच तो आम्हाला त्याच्या प्रिय आणि महत्त्वाच्या कामासाठी वापरील. नाही तर कधी काळी क्षुल्लक कामासाठीच आमचा वापर व्हावयाचा हीहि भीति आम्हाला नाही. आमचा क्षुल्लक कामासाठी वापर झाला तरी त्यात त्याच अपूर्व कारागिराचे हात आम्हाला लागतील, आणि त्याच्या क्षुल्लक कामातहि त्याची दिव्य कारागिरी लपून राहणार नाही. इतकेच काय, पण तिला पाहून लोक दिपून जातील याची आम्हाला खात्री असल्यामुळेच आम्ही त्याच्या पेटाऱ्यात पडून आहोत !

२०३

माझ्या प्रेमळ मित्रा ! प्रवासाला जाताना माझा निरोप घेण्याला तू आलास तुला पुष्कळच बोलावयाचे होते परतु वाहन निघून गेले असते म्हणून चार शब्द बोलून तू घाईघाईने गेलास. तूं अधिक राहतास, अधिक बोलतास तर हवाच होतास, पण इतके निश्चित कीं तूं कितीहि राहतास तरी थोडाच राहिलास, कितीहि बोललास तरी थोडेच बोललास असेच वाटले असते ! तूं जाताना घाईघाईने गेलास पण कायमचे प्रेम देऊन गेलास, कायमचे प्रेमळ शब्द देऊन गेलास. मलाहि जगाचा निरोप घेतेवेळीं घाईघाईनेच जावें लागेल. माझ्या प्रेमळ मित्रा-एवढाहि वेळ मला मिळणार नाही. तरीहि जगाला जास्तीत जास्त प्रेम, जास्तींत जास्त प्रेमळ शब्द देऊनच मी जगाचा निरोप घेईन; सर्वांना आदरपूर्वक नमस्कार करीन आणि मगच माझ्या अनंत प्रवासाला सुरुवात होईल. माझ्या प्रेमळ मित्रा ! तुझ्यामुळे मला जो हा बोध मिळाला तो मी तुझ्या प्रेमाबरोबर कायमचा माझ्याजवळ ठेवीन !

२०४

सतत एकाग्रतेने व्यापकतेकडे आणि परमोच्चतेकडे लक्ष ठेवून अतिशय ऋजुतेनेच विकसित होत गेल्यामुळे जो परिणाम प्राप्त होतो तो इतराना वरून अगदी रुक्ष, तुटक आणि दुष्प्राप्य वाटला आणि त्यामधले अतःसार जरी लपलेले असले तरी त्याची सर कोणालाहि येणार नाही हा तुझा मकेत तेथे अकित झाल्यामुळे त्याच्या मागल्याचा स्वीकार करावा लागतो. कारण तेथे आत्मबलिदानाची महनीयता दडलेली असते. मीहि ते ध्येय डोळ्यापुढे ठेवण्यासाठीच हे प्रभो ! तुझा अनुग्रह म्हणून त्याचा स्वीकार करतो आणि पुन्हा तो तुलाच समर्पण करतो.

२०५

ते स्थान लहानच पण महानतेच्या पायाशी वेढून बसलेले असल्यामुळे तेथे अनेकाचे विश्रामस्थान बनलेले आहे. थकून भागून आलेले लोक तेथे थोडा वेळ बसतात, आपसात आपल्या सुखदुःखाच्या गोष्टी बोलतात आणि सहानुभूति प्राप्त करून मार्गस्थ होतात. हा क्रम अव्याहत चालू आहे पण विनथकलेल्या आणि उत्साहाने भारलेल्या लहान मुलानाहि तेथे आश्रय मिळतो आणि त्याचे अनेक खेळ तेथे चालू होतात कोणी तेथे कोणाची प्रतीक्षा करीत बसलेले आढळतात इतकेच काय, पण किरकोळ भाजीपाल्याची खरेदी-विक्रीहि तेथे चालत असते. अशा त्या लहानशा स्थानाने काही-एक न करता लोकाची किती तरी कामें करण्याचा क्रम अगीकारला आहे ! हे जीवा ! तूहि इकडे तिकडे न करता स्वस्थपणे सताच्या पायी नुसता पडून राहिलास तर तुलाहि काहीच न करता अनेक कार्याचे श्रेय मिळेल, आणि सत्सगाची पूर्ण विश्रातिहि मिळेल. मग व्यर्थ इकडे तिकडे का फिरत असतोस ?

२०६

उपासनेची वेळ सपल्यामुळे जेव्हा मदिरातल्या घंटा घणघणल्या तेव्हा दीर्घ निःश्वास टाकून जीव म्हणतो, एकूण इतका थोडा वेळच मिळाला मला उपासनेला ! अनेक दिवस पाणी न मिळालेल्या व्याकुळ मनुष्याला चुळकाभर पाणी पिऊन समाधान होत नाही तशीच ही अवस्था ! मग परमेश्वर म्हणाला, " मदिरातली उपासना सपली असली तरी तुझ्या हृदयमदिरात अशी कोणतीच बदिस्त व्यवस्था नाही तेथे तूं खुशाल तुझ्या इच्छेला येईल तितकी उपासना कर ! गगेवर गेल्यावर पाण्याला काय तोटा ? तू त्या गगाजळातला मासा जरी झालास तरी तुला कोणी मनाई का करणार आहे ? " जीवाला मतत आणि विपुल उपासना करावयाची तर त्याचे स्थान अतःकरणातच शोधले पाहिजे वास्तविक तेथे कालस्थळाचा प्रश्नच सपलेला असतो

२०७

रचनेच्या पलीकडची रचना हा तुझा स्वभावच असल्यामुळे मला नेहमी चिंता वाटते की माझी कल्पना माझ्या पसतीला उतरली तरी तुझ्या पसतीला उतरेल की नाही ? तुला काय आवडेल याची माझ्या आवडीवरून कल्पना करण्याचा मोह मी टाळू शकत नाही याचे मला जरी दु:ख असले तरी माझ्या आवडीहून तुझी वेगळी आवड कोणती असेल याची निवड करण्याचे सामर्थ्य मी कोठून मिळवू हा माझ्यापुढे प्रश्न पडतो. माझ्या मनातल्या रानावनातली कल्पनाची आणि आवडी-निवडीची वन्य फळे तुझ्या नंदनवनातल्या फळासारखी अमृतरसाने भरलेली कोठून असणार ! पण निश्चितच ती प्रेमरसाने भरलेली आहेत एवढे समाधान मजजवळ असल्यामुळे माझे तू कौतुक करशील, माझें लहानसे घरटे पावन करशील, माझ्या आवडीने तू मला आवडतोस तसा तुझ्या आवडीने मीहि तुला आवडेन आणि युगायुगाच्या वियोगानतर मला तुझ्या प्रेमभेटीचा प्रसग प्राप्त होईल ही आशा धरूनच हे प्रियोत्तमा ! प्रभो ! मी तुझी वाट पाहात आहे !

२०८

फारा दिवसाची सस्मरणे जिच्यामागे दडलेली आहेत ती वस्तु चोरून आम्हाला तू तुझेच सस्मरण करण्याला लावलेस आणि त्या वस्तूच्या सस्मरणाबरोबर तुझे सस्मरण जोडून वस्तुरहित अशा वस्तूची जोड करून दिलीस हे जेव्हा माझ्या लक्षात आले तेव्हा गेलेल्या वस्तूचा माझा शोक तर मावळलाच पण गेलेल्या वस्तूच्या करोडोपट मूल्यवान् वस्तु अनायासे मिळाल्याचा आनद माझ्या अंत:करणाबाहेर ओसडून वाहू लागला. ते पाहून माझे शेजारी मला वेडा म्हणूं लागले. त्याना बिचाऱ्याना काय माहीत कीं मी काय गमावून काय मिळवले आहे !

२०९

माझ्या वाटेमध्ये काटे पसरलेले आहेत ते माझ्याच कुटिल कल्पनाचे असल्यामुळे ते माझ्याच पायात रुततील, माझ्याबरोबर येणाऱ्या यात्रेकरूंना त्याचा उपसर्ग पोचणार नाही या कल्पनेने मी थोडा स्वस्थ झालो न झालो तोच माझे काटे रुतलेले पाय जेव्हा लगडतील तेव्हा माझे सोबती किती दुःखी होतील आणि त्याना ते काटे काढल्याशिवाय मला सोडून पुढे जाववेल तरी कसे ? हा विचार मला अस्वस्थ करू लागला आणि मी ठरविले की, आधी ते काटे दूर करूनच यात्रा करीन आणि माझ्यामुळे माझ्याबरोबरीच्या यात्रेकरूना अवरुद्ध करणार नाही हे अकल्पनीय प्रभो ! माझ्या पायातले काटे काढण्यासाठी नव्हे तर माझ्या मनातले कल्पनेचे काटे काढण्यासाठीं मी तुझ्यापुढे नतमस्तक झालो आहे ! मला सकल्प-विकल्प रहित कर !

२१०

कोणाकडे काहीहि मागावयाचे नाही असा माझा बाणेदार मित्र एकदा मजकडे आला. कारण त्याचे लहानसे घर तावडतोब दुसरीकडे हलविण्याची राजाज्ञा त्याला मिळाली राजरस्त्यावर असली भिकार घरे असता कामा नयेत हे त्या हुकमामागचे कारण ममजले तेव्हा मी त्याला म्हणालो, " तुझें घर तू एकान्तात बाध. त्यात तुला काय हरकत आहे ? " परतु तेथे सरक्षणाचा प्रश्न असल्यामुळे त्याला ते शक्य दिसेना मग त्याला सल्ला दिला, " माझ्याच घरात तुझे घर मिसळून जाऊ दे " त्यात अस्वतत्रतेचे भय वाटू लागले. मी त्याला आश्वासन देऊन म्हटले, " तुझ्या स्वातत्र्याला माझे घर आड न येता ते तुला सहायक ठरेल असे जर न वाटले तर मीच माझे घर हलवीन." इतक्या आत्मीय त्यागवृत्तीपुढे त्याला बोलण्याला काही वावच राहिला नाही हे प्रभो ! माझी आत्मीयत्यागवृत्ति शब्दात न राहता ती प्रत्यक्षात उतरवण्यासाठी माझ्या घरात तुझेहि घर मिसळून दे. मग किती मौज होईल ! मी, माझा मित्र आणि तूं नेहमी अगदी मिळून मिसळून राहू !

२११

अंतरगांतल्या दिव्य जीवनाच्या प्रकटीकरणासाठी अतिशय मेहनत करता करता नको असलेल्या वस्तूचाच पसारा पसरून आमच्या श्रमाचे पर्यवसान व्यर्थ पसाऱ्यातच होण्याची चिंता चित्ताला घेरूं लागली असता तूच त्या गाढ चिंतेतून आम्हाला गोड निद्रेच्या आधीन करून पुन्हा कामाला लावीत राहिलास त्यामुळे शेवटी जेव्हा काम पुरे झाले तेव्हा हे काम आम्हीच का केले ?—अशा संभ्रमात आम्ही पडलो अशी व्यापकता, अशी खोली, एवढे जीवनवैपुल्य, एवढी मधुर रुचि आमच्या हातून कोठून निर्माण होणार ? खरोखर आम्हाला निमित्त करून मागे राहून सर्व काम तूच केलेस अंतरगातल्या जीवनाच्या दिव्य प्रकटीकरणात तू मागे राहिलास तरी मागे कसा राहशील ? हे प्रकटीकरण म्हणजे तूच नव्हेस काय ? तेव्हा आम्ही हेच म्हणतों की देवा ! तूच मागें, तूंच पुढे आणि तूच सर्वत्र !

२१२

प्रत्यगामध्ये सूक्ष्मातिमूक्ष्म मखमलीसारखा गुळगुळीतपणा धारण करून, अल्प कणसुद्धा उरणार नाही इतकी गुणवर्धक मर्दनमाधुरी स्वत मध्ये मिसळून, परस्परविरुद्ध भासणाऱ्या मौल्यवान् वस्तूंना आपल्या ठिकाणी समन्वित करून, आकाराने क्षुल्लक पण परिणामाने महान् असे तुझें अमृततत्त्व जेव्हा गुरुकृपेने आम्हाला प्राप्त होते, तेव्हा ते पर्वताएवढ्या अडचणींना न जुमानता युगानुयुगाच्या सचित अनिष्टाला इष्टदेवतेचे रूप देते. त्या देवतेच्या अनुग्रहाने आम्हीहि देवतातुल्य बनू लागतो. त्या दैवी भावाने तुझ्या अमृततत्त्वाचा विजय जेव्हा अतरात्म्यात भिनून जातो तेव्हा तुझ्या गूढ कार्याचा आमच्या ठिकाणी उलगडा होतो त्या उलगड्यामुळे एका नवीन सृष्टीतच आमचा पुनर्जन्म व्हावा अशी अवस्था आम्हाला प्राप्त होते. हे प्रभो ! आता आम्हाला कधीहि त्या पूर्वसृष्टींत नेऊ नको येथेच आमचा विकास होऊ दे. येथूनच तूं आम्हाला बिनबोभाट आपल्याकडे घेऊन जा !

२१३

अतरंगातली रसिक साधना तीव्र तपश्चर्येने केवळ चिद्घन बनून शाश्वत सत्याशी समरसून सर्वांना दर्शन देऊन अनुग्रहासाठी आपण होऊन पुढे आली. तेव्हा तिच्या पायी पडणारे तेथून उठलेच नाहीत. ते तिच्या दिव्य चरणात विरघळून गेले. त्यामुळे जे कोणी तिच्याकडे जाऊं इच्छितात त्यांना लोक तेथे न जाण्याचा उपदेश करतात माझ्या मना ! हे असे युगायुगापासून चालत आलेले आहे. तुला त्या मातेच्या चरणी लीन व्हावयाचे ना ? तर लोकाचे न ऐकता लवकरात लवकर चल आणि आत्मलीनतेचे भाग्य हस्तगत कर !

२१४

त्याला भेटण्यासाठी कोणाची ओळख नको, कोणाचा वशिला नको, कोणाचे पत्र नको. तो प्रभूच मला कोणी भेटेल का म्हणून वाट पाहात असतो इतकी त्याच्या ठिकाणी विव्हलता असते ती विव्हलता जर उत्पन्न होईल तर तो का भेटणार नाही ? भेट एकतर्फी कशी होईल ? समान भूमिका होईल तेव्हाच भेट होईल ना ? तर त्या विव्हल जगन्मातेच्या भेटीसाठी तूहि विव्हल हो. लहानातला लहान हो ! मग तो प्रभू धावत तुझ्याकडे येईल !

२१५

अल्पसंतुष्ट राहून कोणी न सांगताहि सतत संरक्षणाची जबाबदारी घेणारी, रात्रदिवस जागृत राहणारी, कोठेहि गेले तरी मागेंपुढें राहून सांभाळणारी तत्परता जन्मताच कोणी गुरुदीक्षा दिली नाही तरी ज्याला प्राप्त झाली त्याबद्दल मी आश्चर्य व्यक्त केले. तेव्हा माझा मित्र मला म्हणाला, " ही त्याची स्वयंसिद्ध गुरुपदवी ओळखून त्याला नकळत गुरु करून आपण त्याचे शिष्यत्व पत्करावे आणि त्याच्या ठिकाणचे आश्चर्य शतगुणित करून प्रगट करावे तेव्हा त्या महान् आत्मदर्शनाने त्याची गुरुदक्षिणा त्याला दिली जाईल आणि आपणहि गुरूचे ऋण फेडून मुक्त होऊं " हे प्रिय मित्रा ! केवढी ही तुझी थोर दृष्टि ! मी गुरूच्या ऋणातून मुक्त झालो तरी मित्रऋणातून कधीहि मुक्त होणार नाही !

२१६

जिकडे तिकडे फिरून नाना प्रकारची महत्त्वाची कामे करून मी कितीहि महत्त्वाचा बनलो तरी मला त्याचे महत्त्व वाटत नाही. तुझ्या केंद्र-बिंदूकडे केव्हा येईन हीच एक ओढ चित्ताला लागलेली असते. केव्हा केव्हा वाटते की, फेक ती कामे, फेंकून दे ते महत्त्व आणि सरळ त्या केंद्रबिंदूकडे निघून जा पण तेथे गेल्यावर अप्रतिष्ठा होऊन तेथून निघून जाण्याची पाळी येईल हे स्पष्ट असल्यामुळे महत्त्वाच्या कामात राहूनहि मी तुझ्या केंद्रबिंदूलाच महत्त्वाचा समजतो आणि तेथे नेहमी जाणे शक्य नसले तरी माझ्या अश्रुबिंदूत त्याला साठवून ठेवतो!

२१७

तुझ्याजवळ काय नाही आणि तू काय देणार नाहीस या तुझ्याबद्दलच्या विश्वासाने मी हावरा होऊन एकामागून एक अशा मागण्य करीत सुटलो. तेव्हा माझा तोल सुटल्यामुळे तू मला सावरण्यासाठी तुझा हात आखडता घेतलास हे मला न कळून मी व्याकुळ झालो.— अरे! असा व्याकुळ होशील आणि हावरा होशील तर तुला तो उदार—देणारा कधी तरी भेटेल काय? तू वस्तूच्या ढिगाऱ्याखाली दडपला जाणार नाहीस काय? तुला कधींहि संतोष होईल काय? —म्हणून तू सर्व मागणे सोडून त्याच्यापाशीं एकच माग—" हे प्रभो! मला तुझें कांहीच नको. मला फक्त तुझ्या पायाचीच आशा आहे!"

## २१८

आपापल्या मौल्यवान् वस्तूंचे रक्षण होऊन त्याचा वेळोवेळी उपयोग व्हावा म्हणून अनेकानी अनेक तऱ्हेच्या व्यवस्थेची योजना केलेली होती, पण मी तशी काहीच योजना केलेली नाही हे पाहून मी अगदी भिकारी आहे असेच सर्वजण समजले अहो ! भिकाऱ्याजवळहि एखादी मौल्यवान् वस्तु असते, आणि ती तो प्राणापलीकडे नेहमी आपल्याजवळ ठेवून जपत असतो मग मी भिकाऱ्याहून भिकारीच ना ?—देवाने भिकाऱ्यालाहि काही तरी दिले आहे मला त्यान काहीच का दिले नाही ?—मला त्याने काय दिले आणि काय नाही ते मी कसे सागू ? त्यान मला जे जे दिले ते सर्वच्या सर्व मौल्यवान् ! मग मी कोणत्या वस्तून कोणती वस्तु लपवू ? कोणती वस्तु कोठे ठेवू ? म्हणून मी म्हणतो, हे प्रभो ! हा अमूल्य ठेवा तूच दिलास आणि तूच त्याचे जतन कर !

## २१९

पूर्वीच्या अतिशयोक्त भव्य गौरवगाथानी आणि भविष्यातल्या कल्पनारम्य विजयश्रीच्या आशा-पाशानी जखडलेले असून त्यात यत्किंचितहि व्यर्थतेचा आभास न होणाऱ्या जीवाना आपण आपणाबाहेरच सदैव असतो याचे भानहि नसते. त्यामुळे मी माझ्यासाठी जन्मलो, माझ्यासाठीच मरेन. पण कल्पनासृष्टीच दृष्टीत भरल्यामुळे मी माझ्यासाठीं जगत नसून कल्पनेसाठीच जगत असतो याची यत्किंचितहि कल्पना येत नाही. ती कल्पना त्याना कोण देणार ? कल्पनादेवीजवळ अकल्पनीय शक्ति आहे खरी तथापि एवढीच कल्पना ती जीवाना देऊ शकत नाही. कारण त्यामुळे तिचा मुक्तसचार कुठित होणार तेव्हा त्या कल्पनेला कुठित करून हे माझ्या जीवा ! तू निःशकपणे प्रत्यक्षात उतर म्हणजे तुला कल्पनेपलीकडची वस्तुनिष्ठ आत्मनिष्ठा प्राप्त होईल !

२२०

तो कोठेहि एक पळहि थाबत नाही परतु त्याच्या ओठातून निघणाऱ्या मुरलीच्या मधुर निनादाने तो जणू सदैव आमच्यापाशींच राहतो असा आभास निर्माण होतो मुरली वाजवीत वाजवीत फिरत असता त्याचा कोठेहि मुक्काम नाहीं त्याचे कोठेहि कोणतेहि काम नाही आम्ही मात्र त्याचा सुस्वर स्वर ऐकून आमचे काम सोडून सर्वांगाचे कान करून त्याचे गायन ऐकतो. तो दूर दूर जाऊ लागल्यावर आम्हीहि त्याच्याकडे ओढले जाऊन आमचा मुक्काम बदलतो तो बदलल्यावर आम्ही भानावर येतो बेभान करून पुन्हा भानावर आणण्याची त्याची ही कला खरोखर दुसऱ्या कोणालाहि साधणार नाही बेभान होण्यात आनद आणि भानावर येण्यातहि आनद! त्याच्या मुरलीच्या गायनात अशी मोठी खुबी तो भरून देतो रस्त्यावर लोक जमा होतात आणि त्याच्याकडे बोट दाखवून तोच हा मोहन मुरलीवाला असे म्हणून त्याला अरे! थाब! जरा थाब! आम्हाला स्वस्थपणे तुझी मुरली ऐकव असे म्हणतात तू कोठून आलास? कोठे जातोस? तुझा मुक्काम कोठे असतो? आम्हाला साग म्हणजे स्वस्थपणे तुझी मुरली ऐकायला आम्ही तेथे येऊ असे ते म्हणतात पण ऐकतो कोण! त्याच्या गायनातच त्याचे कान गुतलेले असतात! तेथे दुसरे काही ऐकूच येत नाही तो लोकाना पाहात नाही लोकाना जाणत नाही त्याची सर्व अतर्वृत्ति त्या मोहन-मुरलींत मुरली अशा त्या महान् दशेला तो पोचलेला असतो. तेथूनच तो आला तेथेच तो जात असतो आणि तेथेच त्याचा मुक्काम! हे माझ्या मना! त्या मुक्कामावर जाण्याची तयारी कर. तेथे तुला तो मोहन मुरलीवाला आणि त्याचे मोहन मुरलीगायन पूर्ण समरसलेले ऐकावयाला मिळेल!

## २२१

ज्या ज्या वेळेला जे जे अवश्य ते ते अवश्य मिळेल. एकदम विनजरुरीचे काहीच मिळणार नाही. ते तसे मिळविण्याचा प्रयत्न केल्यास अप्रसन्नताच प्राप्त होईल आणि व्यर्थ प्रयत्नाचा भार डोक्यावर बसेल. या तुझ्या पायाशुद्ध बुद्धीची स्थिरता आमच्यामध्ये केव्हा निर्माण होईल म्हणून आम्ही अगदीं अधीर होऊन जातो पण तू बधिर होऊन आमची हाक ऐकत नाहीस. आंधळा होऊन आमची स्थिति पाहात नाहींस. जणूं हस्तहीन होऊन आमच्यासाठी काहीं करत नाहीस. अशा एकेरीवर येऊन आम्ही तुझ्याकडे सत्रस्त मुद्रेने पाहू लागलो तरी तुझ्या प्रसन्न मुद्रेत लेशमात्र फरक पडला नाही. त्यामुळे हे प्रभो ! आम्ही अपराधी आहो— अनत अपराधी आहो हे आम्हाला कळले. आणि आता हे प्रभो ! तुझ्या प्रसन्न मुद्रेनें प्रसन्नतेनेंच प्रसन्नता मिळविण्याची पायाशुद्ध स्थिरबुद्धि आम्हाला मिळो अशी आम्ही तुझी प्रार्थना करीत आहोंत !

सदोदित सौंदर्याच्या सुराची साथ करणाऱ्या गायकाच्या वीणेच्या तारा तुटल्यानतर त्याची अतर्व्यथा जागृत होऊन जडालाहि द्रवित करणारे त्याचे कारुण्यगीत ऐकू आले. त्याची सर्व जडता एकदम निखळून पडली, आणि तो आत्मनिरीक्षणाच्या प्रातात सचार करू लागला तेथे त्याला जीवनयुक्त वस्तु कोणतीच आढळली नाही गाढ अधार, ओसाड मैदाने, कोरडे समुद्र, कोरड्या नद्या, अस्ताव्यस्त पडलेले दगड आणि नुसतेच उघडे बोडके उचच उच डोगर, श्मशान-शाति, निःशब्द मूकता आणि ती शून्यता पाहून त्याला अतिशय खेद झाला. अतःकरणातल्या पूर्वीच्या जडतेचाच तो पसारा पडलेला आहे हे त्याला पूर्वी माहीत नव्हते आणि खुशाल तो वीणेच्या तारावर सगीताच्या आलापात मग्न होता पण आता आत काय आहे हे त्याला कळले तारा तुटून तो जागृत झाला आता तो गायक वीणा सोडून हृदयाच्या वीणेवर तुझ्या स्तवनाच्या झकारात तुझी आळवणी करू लागला केवळ मनाचे रजन करणारे आणि धनसचयाचे साधन असे ते वीणागायन सोडून आता त्याचा तुझ्या ठिकाणी लय लागला आहे त्याचे गायन ऐकून मोठमोठे तज्ज्ञहि आश्चर्यचकित झाले! हे प्रभो! याचे कारण तुझ्या स्तवनातली माधुरीच नव्हे काय?

## २२३

एका ठरीव कार्यक्रमांत, एका ठरीव साच्यात सतत राहण्याची सवय लागल्यामुळे तुझें ठरीव कार्यक्रमाच्या बाहेरचे सहज आणि दिव्य कार्य आमच्या लक्षात येत नाही आणि आम्ही गोंधळून जातो. आज एक आणि उद्या दुसरे, आणि परवा तिसरेच काही– अशा तुझ्या लहरींना अतच नाही असे आम्हाला वाटते. तरी पण तुझ्या अनंत लहरींमधले नवचैतन्य अर्थशून्य भासूनहि आम्हाला तुझ्याकडे ओढून घेत असते या ओढीमुळे हे प्रभो ! या घोर संसारसमुद्रात बुडत असणाऱ्या आणि बुडत आहो हेहि न कळणाऱ्या आम्हा जड-जीवांना ओढून घेण्यासाठीच तुझ्या लहरी प्रवृत्त होत असतात हे आमच्या लक्षात येऊन आता आमचे सर्व ठरीव कार्यक्रम सोडून तुझी एखादी लहर आम्हाला तुझ्याकडे ओढून नेण्याला येईल काय ?– याचीच आम्ही वाट पाहात आहोत !

## २२४

कोळ्याने पुष्कळ दिवस विणत राहून मोठ्या श्रमाने जाळे बनवून ते मासे पकडण्यासाठी समुद्रात टाकले आता त्यात कोणते मासे पकडले जातील आणि कोणते पकडले जाणार नाहीत हे कोण सांगणार ? पण कोणतेहि मासे पकडले गेले आणि असंख्य मासे पकडले गेले नाहीत तरी या समुद्राच्या जाळ्यात ते कायमचे पकडले गेलेलेच आहेत ! हे समुद्राचे जाळे कोणता कोळी केव्हा ओढील आणि त्यातल्या माशाचे काय होईल ? या विचारात शून्यपणे मी समुद्राकडे पाहात असताना अंतःकरणातल्या समुद्रजालात तूहि पकडला गेलेला नाहीस ना ? हा आतून आवाज ऐकू आला आणि लगेच हात जोडून मी प्रभूला विनविले की, हे माझें जाळे तू तोड किंवा तोडूं नकोस मी तुझ्याकडे येण्याला केव्हाहि स्वतंत्र राहिलो म्हणजे झाले. मग तू मला कोणत्याहि स्थितीत ठेवलेस तरी माझी तक्रार नाही !

## २२५

वरच्या वक्रतेच्या लाडक्या मखमली आवरणाने डोलदार दिसणारी स्पर्शमाधुरी अनेकांच्या आकर्षणाच्या नित्यत्वाने शोभायमान झालेली असो ती खरोखर त्याज्यच आहे तिच्या अंतर्गत प्रधानतेची लखलखणारी तीव्रता सर्वस्पर्शी परंतु सर्व आकर्षणाला पूर्ण अलग करून आमच्या सर्व शत्रूंचे निर्मूलन करणारी आहे. हे कोणाला माहीत आहे काय ?— माहीत नसेल तर क्षणात तिचा आविष्कार करून पाहा. म्हणजे कळेल की आपण केवढ्या भ्रमात होतो ! हे प्रभो ! तुझ्या भक्तांना निदान साधनेच्या भ्रमात तरी टाकूं नकोस !

## २२६

तुझ्या गुणांच्या वेगामुळे तुझ्या सेवकत्वाला बाधा न येता उलट सेवकत्वाचा वेग वर्धमान होत राहतो आणि कितीहि खच्चून भरलेला कार्यभार असो, त्याने श्रमून खाली बसण्याची कल्पनाहि तुझ्या ठिकाणी स्पर्श करू शकत नाही तत्परतेचे तात्पर्य रोमरोमात भरून स्वामीला कामाचीच कमतरता झाल्यामुळे लज्जित करून तू सर्वांचा स्वामी असून सेवेची अगम्य गूढ उकलून स्वामित्व सेवकत्वाने कसे परिपूर्ण झालेले आहे हे दाखवून देतोस. त्यामुळे आमच्यापुढे प्रश्न पडतो की, तुझे दास झाल्यावर आम्ही क्षणभर तुझ्या सेवेत टिकू काय ? नाहीच पण म्हणून तुझे दासत्व सोडूं तरी कसे ? हे प्रभो ! या आपत्तीतून तू आमचे रक्षण कर आणि आम्हाला निभावून ने.

२२७

लाभाला सीमा असली तरी लोभाला सीमा नाही म्हणूनच तुझा आमच्यावर असीम लोभ जडला आहे ! इतकेच काय पण तुझ्या ठिकाणीं सीमाच नसल्यामुळेहि तुझा निःसीम लोभ नेहमी आमच्याकडे कृपादृष्टीने पहात असतो पण आम्ही मात्र तुझ्यावर मुळीच लोभ न ठेवता दुसऱ्याच वस्तूच्या असीम लोभात पडलो आहोत हे प्रभो ! आता तूच त्या त्या वस्तु बनून आम्हाला तुझ्या असीम लोभाचा लाभ करून दे !

२२८

मनोरथाच्या मनोहर स्वप्नातून जाग आली तरी ती येऊ नये असे वाटून आम्ही पुनःपुन्हा आमच्या मृदुशय्येचाच आश्रय घेतो पण ते मार्दव आता कण्टकाच्या रूपाने आम्हाला क्षणभरहि तेथे टिकूं देत नाही त्या कटकामध्ये प्रत्यक्षामध्ये मनोहर स्वप्नाची उभारणी करण्याची प्रेरणा तूच भरून दिल्यामुळे आम्ही उठून उभे राहतो. आणि मिटलेल्या डोळ्यातली मनोहर स्वप्ने उघड्या डोळ्यानी सर्वत्र रंगवण्यासाठी प्रयत्न करू लागतो त्या प्रयत्नात आम्हाला यश कोठून मिळणार ? हे देवदेवा ! माझ्याकडून त्या स्वप्नाचा चोळामोळा होऊं नये म्हणून तूंच आम्हांला हाताशी धरून त्याची प्रत्यक्षात उभारणी कर !

२२९

आपले अंतःकरण नेहमी उघडे असल्यामुळे आपल्याकडून गरज असो नसो कोणी कोणत्याहि वेळी कितीहि वस्तु नेल्या तरी आपली कधीहि ना नसते. इतकेच काय पण पुन्हा आपण तसेच्या तसेच कसे राहू शकता, आपल्या ठिकाणी ही अक्षय शक्ति कोठून आली याचा आम्ही अचंबा करतो आमची एखादी वस्तु कोणी नेली आणि परत आणून दिली नाही तर आम्हाला चैन पडत नाही आणि आपण अनेक लोक अनेक वस्तु सतत नेत राहतात याच आनंदात निमग्न असता हे गूढ आम्हाला उकलत नाही आमच्याकडे अक्षयता नाही म्हणून आम्हाला वस्तूंची उणीव भासते हे खरे का ? याचा जो जो विचार करतो तो तो तत्संबंधी सत्याचा एकेक अंश गळून कदाचित् त्यात आंशिक सत्य असेल असे वाटू लागते पण ते आंशिक सत्यहि शेवटी गळून जाते आणि आमच्या अंतःकरणाचे दारिद्र्य आमच्यापुढे उभे राहून आम्हाला पश्चात्ताप होतो हे प्रभो ! आपणाकडे कोणी काहीहि मागोत आमचे अंतर्दारिद्र्य दूर करा एवढेच आमचे मागणे आहे

२३०

विजयी वीराच्या मिरवणुकीच्या गलबल्यात मी पाहू लागलो तर तुझा कोठेच पत्ता लागेना शेवटी तुझ्या करकमलांनी पराजित जीवाच्या जखमांचे निवारण करण्याचे काम आरंभिलेले मी पाहिले तेव्हा तुझ्या पदकमलावर मी साष्टांग नमस्कार घातला आणि तुझ्या हृदय-कमलाची मला ओळख पटली !

## २३१

मी तुझ्या राजरस्त्यावर उभा राहून अनेक वाहनातून भरधाव जाणाऱ्या अनेकाना मला बसवून घेता का ?– म्हणून हात जोडून विनविले परतु कोणी नुसते माझ्याकडे पाहिलेसुद्धा नाही तेव्हा मी तू दिलेल्या पायानीच पुढे जाऊ लागलो तो लवकरच तूहि आपल्या पायानी मजकडे येऊन मला भेटलास ! आणि ते वेगवान वाहनात बसलेले लोक तसेच एकसारखे धावाधाव करीत राहिले ! तेव्हा तू दिलेले सत्य साधन न वापरणाऱ्या दुर्बुद्धीबद्दल मी अतःकरणपूर्वक तुझी क्षमा मागितली आणि तूहि कृपाळू होऊन मला आपल्या अतःकरणात जागा दिलीस ! हे तुझे उपकार वारवार आठवून माझे हृदय भरून येत आहे !

## २३२

वाट पाहून पाहून निराश झाल्यानंतर आशेचे अकुर सुकून जाऊ नयेत इतक्यापुरतीच तुझी कृपा मधून मधून माझ्या खिडकीतून डोकावून पहात आहे असा मला भास होऊं लागला त्या भासाचा त्रास होऊं नये म्हणून मी माझी दारे आणि खिडक्या बद करून टाकल्या, तो तुझ्या हास्याचा भास होऊ लागला तेव्हा तिकडेहि मी दुर्लक्ष केले तेव्हा प्रत्यक्ष तुझ्या पावलाचा आवाज ऐकू येऊन दार ठोठावले गेले मी दार उघडून पाहतो तो एक याचक हात जोडून 'मजवर कृपा करा' म्हणून मला विनवू लागला तेव्हा मी ओळखले की, मी कृपायाचक असल्यामुळे तूहि कृपायाचक बनून मला फसवू पाहात आहेस ! मी उत्तर दिले, 'अहो ! महाराज ! माझी तुमच्यावर पूर्ण कृपा आहे आता तुमचीच कृपा हवी आहे !' त्या सख्य-भक्तीच्या सुखसवादाने सुखावून तुझ्या अ नदाची कळी खुलून गेली आणि हे प्रभो ! माझी अपेक्षित कृपा मला तत्काल प्राप्त झाली !

## २३३

माझ्या असंख्य चुकांचा कबुलीजबाब देऊन क्षमा मागण्यासाठीं पश्चात्तापाने हिरमुसला होऊन मी तुझ्या दरबारात प्रवेश करतो न करतो तोंच त्या सर्व चुका कोठल्या कोठे निघून गेल्या त्याचा पत्ताच नाही. मग मी तुझ्या मुखाकडे नुसता टक लावून पाहूं लागलो तो तुझे मुख मद मंद हास्याच्या लहरींनी मधुराहून मधुर बनून माझ्याकडे पाहात असताना जशा माझ्या चुका नष्ट झाल्या तसा मीहि पण नष्ट होऊन जात आहे अशी स्थिति प्राप्त झाली ! हे प्रभो ! ज्या माझ्याकडून अनंत चुका होत असतात तो मीच नष्ट करण्याची शिक्षा मला तूं देत आहेस काय ? असे विचारण्याचे धाडस मी कसे करूं ? विचारण्यापुरता ' मी 'चा विचारच शिल्लक राहिला नाही ! आणि मला तू आपल्यात मिळवून घेतलेस !

## २३४

शेवटी मला कारागृहात जावे लागणार काय ? म्हणून मी भीत असताना तो क्षण एकदाचा येऊन ठेपला कारागृहाच्या दारातून मी आत आलो. कारागृहाचे दार कायमचे बंद झाले, आणि आत आल्याबरोबर बाहेरच्या कारागृहातली बद्धता जाऊन मी या येथे केवळ मुक्त झालो आहे असा मला अनुभव झाला बहिर्मुखतेच्या कारागृहात असून मला त्याचे भान नव्हते याबद्दल मला आश्चर्य वाटले मी आता अंतर्मुखतेत निमग्न झालो, ही बंदिशाला मला प्रासादतुल्य झाली ! हा माझा आत्मराजा आता येथे सुखासमाधानात विराजमान् झालेला आहे ! माझा हेवा करणाराहि कोणी नाही. कारण ते सर्व बहिर्मुखतेच्या कारागृहात अडकलेले आहेत !

## २३५

माझे जे काही होते, आहे आणि असेल ते सर्व मी तुझेच मानीत आलो असल्यामुळे माझ्यापाशी तुला देण्याला काही राहो न राहो मला यत्किंचितहि विषाद वाटणार नाही. आता मलाच तू स्वीकारून माझे सर्व देणे-घेणे पूर्ण कर कोणतीहि बाकी ठेवूं नकोस. देण्याघेण्याचा ललाटलेख पूर्णपणे पुसून टाक. मला केवळ कोरा कागद कर म्हणजे त्यावर मंगलतेने भरलेल्या तुझ्या मधुर नामाची स्तुतिस्तोत्रें लिहिली जाण्याला मी योग्य ठरेन !

## २३६

तुझे अभिप्राय आणि सकेत ठिकठिकाणी दडलेले आहेत. पण ते जोपर्यंत मला उलगडत नाहीत तोपर्यंत मला कशाचाही उपयोग होत नाही. हे तर काय पण माझ्या ठिकाणी तुझा कोणता अभिप्राय आणि सकेत तू ठेवला आहेस हेहि मला तूं कळूं दिले नसल्यामुळे मला माझाहि काही उपयोग नाही असे वाटून माझा कोणी उपयोग करील काय असे दीनवाणीने मला म्हणावे लागेल,—तेव्हा जो काही अभिप्राय आणि सकेत माझ्या ठिकाणी ठेवलेला असशील तदनुसार तूंच माझा उपयोग करून घे. मजकडून तूंच तुझ्या अमर जीवनाचा गूढ धर्मग्रंथ लिहून घे !

## २३७

उमेदीच्या उल्हासात वाहवत न जाता प्रतिकाराची चमक दाखवून एक मार्गाने कर्तृत्वाला मर्यादा घालून जे साधे जीवन आरण्यक जीवनाशी मिळून गेलें, आणि क्षीणतेची पर्वा न करता, पूर्वपरपरा न मोडता ज्याने नवसस्काराचे स्वागत केलें, त्याचे कौतुक कोणी न करो पण तुला त्याची कदर असल्याचे पाहून हे प्रभो ! वैशिष्ट्य सोडून साधेपणातलें तुझे विभूतिमत्त्व पाहण्याची दिव्य दृष्टि आम्हाला मिळाली.

२३८

दोन टोके सोडून आमच्या जीवनाचा लबक मध्यस्थ भूमिकेत येत नाही असे नाही पण तो क्षणभरच. तेथे तो टिकून रहात नाही टिकून राहील तर तो गतिशून्य होईल ही आमची व्यथा-कथा हे प्रभो ! आम्ही कोणाला ऐकवणार ? आमचे जीवन सदोदित मध्यस्थ आणि गतियुक्त कसे होईल हे तुझ्याशिवाय कोण सांगू शकेल ? कारण हा जीवनाचा लबक तूच सुरू करून दिला आहेस

२३९

प्रत्येक वस्तु एकदम जीर्ण होत नाही हळूहळू क्रमाक्रमाने जीर्ण होते. त्यामुळे हे प्रभो ! जीर्णतेवर नवीनतेचा इलाज शोधण्याला तू आम्हाला मधी देतोस ही तुझी केवढी कृपा !

२४०

घणाचे कठोर घाव घालूनहि कठोर दगडात तुझी करुणामय मूर्ति आणि तिच्याभोवती कोमल पुष्पफळाची नक्षी कारागिराने कुशलतेने निर्माण केली तिच्यामुळे तुझ्या कठोरतेत तुझे कुशल करुणामय कारागिरीचे काम कसे चालले असेल याचा पाठच आम्हाला मिळाला हे खरे, पण तू सर्व रूपानी कोणकोणते बोधामृत देतोस हे कळण्याची पात्रता आमच्यात नसल्याने सर्वत्र पसरलेले तुझे अमृत– त्याचा एक बिंदूहि आम्हाला प्राप्त होत नाही. आम्ही अमृतात राहूनहि मृतासारखेच जगतो. तिकडे तुझे दुर्लक्ष का होत आहे ? तुझ्या करुणेची धारा आमच्याकडे केव्हा वळेल ?

२४१

सांप्रदायिकता, विद्वत्ता, धनिकता, आणि सत्ता यांनी सतत तुझी उपेक्षा केली तरी सर्वसामान्य साधेपणा तुझी उपेक्षा तर करीत नाहीच पण आतुरतेने वाट पहात असतो तुझ्या स्वागताची तयारी करीत असतो म्हणून हे माझ्या जीवा ! कोणत्याहि असामान्यतेच्या मोहाला बळी पडू नकोस ती असामान्यता एक मोठे भ्रमजाल असून त्यात जो अडकला तो सुरक्षितपणे परत येऊ शकत नाही तेव्हा या उपेक्षा करणाऱ्याची तू उपेक्षा करून सामान्यात मिसळून जा त्याच्यातल्या प्रभुदर्शनाने तुला जे समाधान होईल ते विशिष्टाच्या शिष्टत्वाखाली दडलेल्या अशिष्टतेत कोठून होणार ? तरी पण त्यांना आपल्यात सामावून सामान्यतेत आणण्याची दृष्टीहि तू सोडू नकोस !

२४२

रसिकतेनेच तनमनधन रंगलेले, गुणगौरवानेच सर्वांशी संबद्ध, गोरगरीबांच्या सेवाकार्याचा हव्यास, उच्चतेच्या ध्येयासाठी देहदंडहि पत्करून धावून जाणारे साहस, सर्वसामान्य जनाप्रमाणेच चरितार्थवृत्ति, या सर्वांनी विभूषित झालेला अनहंकारी जीवन-साक्षात्कार अनंतात निवास करण्याच्या स्पर्धेत जेव्हा अग्रेसर होतो तेव्हा त्या प्रभूचीच ती कृपा हे आमच्या लक्षात येते खरोखर तिला ओळखण्यासाठीच त्याचा आविष्कार आणि त्याचे अंतर्धान !

२४३

वाणी ही मनुष्यत्वाची देणगी आहे तीहूनहि मधुर वाणी ही देवत्वाची देणगी, आणि सार-वाणी ही साक्षात् परमेश्वराचीच देणगी ! ह्या तीन्ही देणग्या जिला मिळाल्या ती संतवाणी माझे कर्णभूषण, माझें कंठाभरण होईल, आणि तिच्याच मननाने माझें मन विभूषित होईल. तेव्हाच हे प्रभो ! मी तुझ्या स्तवनाला पात्र होईन !

२४४

वारंवार बुडी मारून मारून श्वास रुद्ध झाला कित्येक वेळा नाका-तोडात पाणी शिरून प्राण जाण्याची वेळ आली, तळाशी असलेल्या प्राण्यानी चावून चावून जीव घाबरा केला, वर ओढून घेणाऱ्याची दोरीहि मध्येच तुटून जाते काय या शकेने मन व्याकुळ झाले तरीहि मुक्त संशोधका ! कधीच निराश न होता तू आपला प्रयत्न सोडला नाहीस या अफाट ससारसमुद्रात तू हेच सशोधन आपले जीवितकार्य मानलेस खरोखर तू धन्य आहेस ! तू गोळा केलेल्या मुक्तसचयाची माळा तुझ्याच गळ्यात शोभेल पण नाही, तू ती माळा प्रभूच्याच गळ्यात घालून त्याच्यापुढे हात जोडलेस ! हे भक्त-दृश्य पाहून आम्हीहि धन्य झालो तुझ्या थोरवीचे आम्ही काय वर्णन करणार ?

२४५

मजकडून काही बोध मिळेल म्हणून तुम्ही मला प्रश्न विचारू नका. मजकडे पाहून तुम्हाला जे काही मिळेल ते तुम्ही ग्रहण करा. परतु लक्षात ठेवा, तुम्ही ते जे काही ग्रहण कराल ते तुमचे मजवर आरोपणच असेल, कारण तुम्हीहि तुमच्यावरचे आरोपणच आहात !

२४६

आत अतिशय स्थिर असून अतिशय सूक्ष्म आणि गतिमान प्रवाहाच्या गुतागुतीच्या शुद्धाशुद्ध प्रतिकार स्वीकारात्मक कार्यप्रणालिकावर सुंदरतेच्या अवगुंठनाच्या भारवत्तेने कातिमय आवरणाची प्रभा पसरून जीवाची तू किती काळजी घेतोस! पण त्या काळजीमुळेच आम्ही निष्काळजी बनतो. इतकेच काय पण तुझा मूक उद्देश विसरून तुझ्या योजनेला आम्ही विलासाचे स्थान बनवितो, आणि पजरबद्ध पक्ष्याची गति आम्हाला मिळते हे प्रभो! आम्हाला तू गगनविहारी कर! आमच्या पखानी तुझ्या हृदयाकाशात आम्हाला उडू दे!

२४७

तुझ्या बगीच्यात नवी नवी फुले, तुझ्या सरोवरात नवी नवी कमळे, तुझ्या वृक्षावर नवी नवी फळे, तुझ्या शेतात नवी नवी मोत्याची कणसे, तुझ्या भूमीवर नवीन नवीन झरे, तुझ्या नद्यात नित्य नवीन वाहते पाणी, तुझ्या पक्ष्याच्या कठात नव्या उत्साहाची गाणी, तुझ्या आकाशात नवीन चद्रमा, नवीन सूर्य, नवे तारे, नवे वारे, तुझ्या जगात सगळे अगदी नवे कोरे, टवटवीत, प्रसन्न, आनदी! मग आम्हालाच का अप्रसन्नता? मग आम्हालाच का नवीनपणा नाही? का आमच्या मनात तुझ्या सर्व सृष्टीची नवीनतेच्या उल्लासाची स्फूर्ति स्फुरत नाही? आमच्या प्रश्नाला तूं उत्तर न देता उत्तर देतोस की, लुटा ही सगळी नाविन्याची, उल्लासाची लयलूट! कोणी मनाई का केली आहे? पण देवा! ती घेता येत नाही. आम्ही दुर्बल बालके आहोत. आम्हाला स्वतःच्या हातानी खाता येत नाही तूच आम्हाला भरव! तूच आम्हाला शिकव! आम्हाला रडवे आणि खिन्न राहू देऊ नकोस!

२४८

तुझ्या कृपेने भिन्न भिन्न दृष्टिकोणानी जेव्हा अतिशयतेनें गर्दी करून सोडली तेव्हा नकळत त्याच्यातून वाट काढणारी पूर्णता उदयाला आली. तिच्या सौंदर्याने वक्रता सरळ बनली, भिन्नतेला माधुर्य आले, दृष्टीत प्रेमवृष्टीची सृष्टि खुलू लागली अनेकत्वाच्या भ्रमाला एकाच मधुर चिंतनात गोवून दिले आणि मधुसंचय करणाऱ्या मधुमक्षिकाप्रमाणे सर्वत्र गुणसंचयाचाच उद्योग सुरू झाला हे देवा! तो सर्व गुणसंचय तुझ्याच ठिकाणी पूर्णता पावावा आणि आमचा उद्योग तुझ्याच पायाशी योगस्वरूप बनावा, एवढीच शेवटची विनवणी आहे!

२४९

वस्त्रे नसूनहि तू सुशोभित आहेस, भूषणे नसूनहि तू विभूषित आहेस, शस्त्रे नसूनहि तू सर्वसमर्थ आहेस, पात्रे नसूनहि तुझ्याजवळ सर्व पात्रता आहे, घर नसूनहि तूं राजप्रासादात राहतोस. असा तू सर्व-साधनहीन असून सर्व साधनसंपन्न आहेस! आमची अगदी याच्या उलट स्थिति आहे. आमची वस्त्रें आम्हाला विद्रूप करतात, आमची भूषणे दूषणे ठरतात, आमची शस्त्रे पूर्ण असमर्थ ठरून आमच्यावरच उलटतात, आमची पात्रे आमच्या अपात्रतेची दर्शक बनतात, आमचे राजप्रासादहि नेहमी आमचे दैन्यप्रदर्शन करीत असतात, आमची सर्व साधनसंपन्नता सर्व साधनहीनतेनेच भरलेली असते. तुझ्यात आणि आमच्यात अशी विलक्षण भिन्नता आम्ही तुझ्याशी आणि तू आमच्याशी अभिन्न नाहीस म्हणूनच आलेली आहे ना? तर आम्हाला वस्त्रे, भूषणे, पात्रे, शस्त्रें, घरे-दारे, साधने यात का गुतवून ठेवतोस? आम्ही गुंतून राहतो म्हणून? हे प्रभो! इतकी तुटकता न ठेवता तूंच आम्हांला आपणात मिळून घे!

२५०

तुझ्या आघाताने घात न होता अनुपयुक्त बहिरावरणाचे पृथक्करण होऊन शुभ्र पुष्पाच्या पाकळ्याप्रमाणे अतरावरणासकट अनेक मनोहर शोभाच्या सपुटाच्या विखुरलेल्या रत्नाचा खच पडून तुझ्या उच्च सरळतेचे सार्थक झाल्याचा साक्षात्कार होतो शुभ्र चादण्यामध्ये कालवून त्या रत्नाचे सेवन करणारे राजहस जरी आम्ही नसलो तरी त्या लोभनीय दृश्याने आम्ही स्वतःला धन्य मानतो ! आणि हे प्रभो ! तुझ्या या कार्यातल्या अगदी सामान्य मानल्या गेलेल्याच्यामध्ये तरी आमची गणना होईल अशी आशा करतो !

२५१

तुझी अतर्ग्राही पक्की भूमिका सर्वानाच आपापली शुद्धता करण्यास आमत्रण देत असते स्थूलतेची सूक्ष्मता, सूक्ष्मतेची समरसता, पृथक्करणाची विविधता, विविधतेतून सार, अशा त्या शुद्धतेच्या किती तरी भिन्न भिन्न छटा असतात त्या सर्वाना समावेशून त्याची अमोल कार्यसिद्धी करून देऊन पुन्हा तू अनासक्तीने रिकामा राहतोस ! हे प्रभो ! त्या रिकामपणात मलाहि येता येईल ना ? सर्वांचे झाल्यावर मलाहि त्या तीर्थात स्नान करता येईल ना ?

२५२

दूरतेतही तीक्ष्णता झळकत राहावी आणि निःसंगतेने स्थूलतेची सर्व जडता निष्प्राण करावी आणि त्या विजयाचे सुशोभित कलश आपल्याच उच्चतेच्या आधारावर अनंत अवकाशात दुरून दिसत रहावेत हा तुझा विशेष आम्ही दुरून पाहिला तेव्हांच तू तत्काळ सर्वसामान्याना मान्य झालास तुझी ही लोकोत्तरता आमच्यापुढे असताना आम्हाला भय कसले ? हे प्रभो ! तू केवळ निर्भयतेची पताका आहेस.

## २५३

नको नको कलिके ! तू विकसू नकोस ! तुझ्या अर्धस्फुट अवस्थेत अनंत विकासाचा अमर संदेश भरलेला आहे ! तो तसाच राहू दे ! तुला अर्धस्फुटतेची समाधी लागू दे ! कोणत्याहि परिणामाची पर्वा न करणारी तू प्रभूची दिव्य दूतिका हो ! तू आमच्या सर्वांच्या विकासासाठी त्या परात्पर प्रभूची प्रार्थना हो ! हीच तुला आमची प्रार्थना आहे !

## २५४

अवश्य साधन म्हणून आमच्यासाठी जे अवजार तू आम्हाला दिलेस त्या अवजाराचा शस्त्रासारखा एकमेकावर प्रहार करण्यासाठीं आम्ही उपयोग करू लागलो त्यामुळे आम्हा सर्वांना भयभीत अवस्थेत रहावे लागत आहे त्याशिवाय ते अवजारहि केव्हा तुटून जाईल त्याचा नेम नाही. या भीतीनेहि आमची मने ग्रस्त झालेली आहेत. ते अवजार एकमेकाच्या उपयोगात आम्ही आणू आणि त्याच्या अकस्मात तुटण्याचे भयहि आमचे जाईल याचा तुझ्या शरणागतीशिवाय कोणताच उपाय नाही. पण सगळ्याना हे कसे समजेल ?— निदान आता माझ्या सारख्याला तरी हे प्रभो ! तुझ्या कृपेने हे दोन्ही तऱ्हेचे भय वाटेनासे झाले !

## २५५

कोठे प्रभुकृपेचा सार्वत्रिक आणि विपुल आविष्कार आणि कोठे आमच्या तुटपुंज्या डागडुजीचे उपाय ! आम्ही ती प्रभुकृपा सोडून या अज्ञतेच्या खटाटोपात का पडावे ? आमचा स्वभावच असा सकुचित बनला तो बदलल्याशिवाय प्रभूची कृपा कोठून प्राप्त होणार ? तो आमचा सकुचित स्वभाव बदलण्यासाठीच त्या परात्पर प्रभूने प्रलययोजना केली आहे. तिने आमची मने व्यापक बनोत ! आणि आम्ही अधिक सकुचित होऊन आमचाच प्रलय न होवो !

२५६

ती आप्तत्वाची निरलसता स्वामीचे निरीक्षण सर्वत्र पोचवून आत आणि बाहेर एक कायमची नियंत्रणाची यंत्रणा बनली आणि स्वामीला सदोदित विचार सहायाला आधार मिळत गेला. कोठेहि कोणतेहि महत्त्व स्वामीने तिच्याच करवी प्रस्थापित करून निग्रहानुग्रहाच्या जोराने तिच्याच विश्वासावर ममतेचे सूत्रचालन केले! नरनारायणाच्या जोडी-प्रमाणे आज ते स्वामित्व कोठे आहे? आणि ती आप्तत्वाची निरलसता कोठे आहे?— त्याचे प्रत्यक्ष दर्शन कोठेहि न होवो नरनारायणाची ती जोडी आमच्या हृदयात आहेच आहे!

२५७

सौम्यत्वाची आणि कोमलतेची सीमा एकनिष्ठेत दीर्घकाल राहिली याचे सर्वांना आश्चर्य वाटणे स्वाभाविक आहे कारण लौकिकात कोठे तसे दिसत नाही परंतु त्या सीमेने शेवटी असीमाचा ध्यास घेऊन स्वतंत्र वैभवाचा आविष्कार करून निवृत्तीचीही कड गाठली. सत्पुरुषांना आमंत्रित करून आणि त्यांच्याकडे जाऊन त्या आनंदात आणि पूर्वस्मृतीच्या प्रेमनिरीक्षणात तिला धन्यता वाटली. आणि तिने आपणाला आनंतात विलीन केले. त्यामुळे ती आता एकदेशी न राहता केवळ आमच्या स्मृतिरूपातच नव्हे तर आमच्या स्वस्वरूपातच मिसळून गेली आहे हे प्रभो! ती तेथेच कायमची राहो!

२५८

सार्वकालिक कुशाग्रता, कामाच्या दामाची पर्वा नसलेली सेवावृत्ति, मानाचा लेशहि नाही असा अनुग्रह ज्याच्या घराच्या सोप्यात केवळ घोगडीवर बसत, उठत पहुडत असतो ते योग्याचे अपूर्व निवासस्थान मला कोणी दाखवील काय? म्हणून वाट विचारत विचारत अरण्यातून साधक आला न आला तोच या सर्वांनी त्याचे स्वागत केले. आणि त्याच्या सामानाचा भार त्याच्या हातातून उतरून घेतला. हे माझ्या मना! तूहि सर्व भार तेथेच टाकून दे म्हणजे अनायासे योगसाधना सिद्ध होईल!

२५९

परकीय भार वाहून आलेल्या क्षीणतेत ही मनाची शांति अढळ राखून, निरपेक्षतेला भूषवून अल्पावधीतच जिने सर्व प्रपंच निःसार ठरविला, त्या कलिकेत तुझ्याच निवासाचा सुवास असणार यात संशय नाही. पण ती कलिका विकासाच्या पूर्वीच खुडली गेल्यामुळे तुझ्या अनंत-धामातच तिचा नकळत आनंद-विकास होत राहील हीच श्रद्धा शेवटीं आमच्यापाशी उरली. हे प्रभो! ती आमची श्रद्धाहि अनंत आनंद विकासाला आपलेसे करो!

२६०

उपक्रमात धाकधूक आणि परतताना लागलेली ओढ मिळून हेलावणारा उत्थान-पतनाचा इतिहास आणि त्याची सतत चाललेली खळखळ तुझ्या विशालतेत समावून गेल्यामुळे आम्हाला विशिष्टतेच्या अडथळ्याची सकुचितता कोठेच आढळत नाही, आणि आमच्या आनदाची तारवे हाकारीत आम्ही दूरदूरच्या सफरी करू शकतो. तेथे आणि येथे आनदाची लयलूट होते, आणि आमच्या आणलेल्या प्रत्येक वस्तूमध्ये सर्वांची उत्सुकता केंद्रीभूत होऊन अनायासे तुझें सर्व रूप आम्हाला आमच्या घरीच आलेले दिसते आमच्या घरचा तुझा हा निवास सर्वांचाच निवास असल्यामुळे आमचे घर हे विश्वाने विश्वासाठी बनविलेले विश्व-निकेतन बनते ! हे प्रभो ! केवढी ही तुझी कृपा !

२६१

तिच्या चचलतेची भरारी सगळीकडच्या लपलेल्या पोपणाला थोडे थोडे करून एकत्रित करून स्वतःचा तोल सभाळून स्वतःचे स्वावलबन सिद्ध करीत आपल्या उद्योगाबरोबर विशालतेतील विहाराचीहि भूमिका मोठ्या आकर्षक तऱ्हेने पार पाडते. आणि जेव्हा ती ध्यानाला बसते तेव्हाहि ध्यानाकाशातले तिचे परमोच्च उड्डाण ती स्वतः दिसेनाशी होईल तोपर्यंत आम्ही पाहू शकतो. तिचे ध्यान आमच्या ध्यानातच येत नाही एका क्षुल्लक वाटणाऱ्या जीवाकडून प्रकट होणारा हा तुझा कर्मयोग आणि ध्यानयोग आम्हाला अल्पाशाने तरी हे प्रभो ! तूं देशील का ? आणि तद्वारा भक्तियोगात आमचा प्रवेश होईल का ?

२६२

व्यवहारात वापरून वापरून तुझी राजमुद्रा आणि राजमूल्य अगदी घासून जावे आणि तुझ्या प्रतीकाची दुरवस्था व्हावी, ही खरोखर आमची चूक आहे ! सर्व व्यवहार त्वन्मय झाल्यास या आभासिक प्रतीकाची आम्हाला मुळीच गरज नाही. आम्ही आमच्या मनात तुझी स्थापना केल्यावर प्रतीकाच्या क्षीणतेची आपत्ति आमच्यावर कधीहि येणार नाही. आणि हे प्रभो ! मग आमच्या मनात तुझीच सारी अमाप संपत्ति भरून राहील !

२६३

तुला केवळ अल्पशा जीवनाच्या बिंदूचा आधार मिळून तू त्यातून अमृतासिंधूच आमच्यापुढे आणलास ! हे तुझे सामर्थ्य तू कोठून मिळवलेस ? तूं अल्पातून महानतेच्या फळांनी अगदी लगडून गेलास ! ही शक्ति तुला कोठून मिळाली ? जरासे पोषण दिले, लगेच रत्नाच्या राशीच्या राशी तू आमच्यापुढे ओतल्यास ! या अकल्पनीय सामर्थ्याचे मूळ काय ? —देवा ! तुझ्या जीवभावात जर हे सामर्थ्य तर तुझ्या शिवस्वरूपाची कल्पना तरी कशी करणार ? खरोखर त्या कल्पनेची जरूरहि नाही केवढयाहि सामर्थ्यापुढे दिङ्मूढ होण्याने काय होणार ? आम्हाला खरोखर तुझा तो सामर्थ्यवान जीवभाव टाकून तुझ्या शिवस्वरूपात भक्तिभावाने लीन होणेच योग्य आहे !

२६४

गाडी जसजशी मुक्कामाच्या जवळ जाऊ लागली तसतसे आम्ही अधीर होऊन गेलो. आता घर केव्हा येईल ? आई ! भूक लागली घरीं जाऊन गुरगुट्या भात केव्हा करून देशील ? आमची समजूत घालता घालता त्या माउलीला किती श्रम पडत होते ! " अरे ! तो पोपट पाहा कसा उडतो आहे ! त्याची चोच दिसली तुला ? कशी लाल लाल तोंडल्या-सारखी आहे ! " असे म्हणून ती आमचे चित्त दुसरीकडे वेधण्याचा प्रयत्न करी आणि त्यात तिला थोडेबहुत यशहि येई पण आमचे पालुपद पुन्हा सुरू होई, " आई ! घर केव्हा येईल ? "— हे माझ्या जीवा ! तुझें खरे निजधाम तू विसरलास. तेथे जाण्यासाठी असा अधीर का होत नाहीस ? का नाहीं विचारत— आई ! घर केव्हा येईल ?

२६५

गतीच्या श्रेष्ठतेमुळे उद्योगाच्या अनेक क्षेत्रात सारखी उलाढाल करीत राहून ती समग्रतेला व्यग्रतेत टाकू पाहते. महत्त्वाला मागे टाकून आपण पुढे धावते. सगळी समजूत आणि सगळी शांति बाजूला सारून एकच हलकल्लोळ उडवून देते. तिच्यापुढे मोठेमोठे वृक्ष उन्मळून पडतात, जिकडे तिकडे धुळीचे लोट उसळतात, पर्वताची सरोवरे, सरोवराचे पर्वत बनतात ! हे सर्व चमत्कार केवळ तिच्या भृकुटिभंगामुळे घडू लागतात. तिला स्वतःला उसंत नाही आणि कोणालाहि चैन पडूं देत नाही ती निद्रेतहि उपस्थित राहून चित्तात विक्षोभाचे स्फोट निर्माण करते. तुझ्या चैतन्याच्या केवळ छायेचे हें चरित्र आहे, तर तुझ्या प्रत्यक्ष चित्कलेत केवढें सामर्थ्य असेल ? हे सर्वसमर्थ प्रभो ! आम्ही तुझ्या सामर्थ्यावर लुब्ध होणार नाही. पण तुझ्या सेवेचे सामर्थ्य तेवढें आमच्या ठिकाणी राहो ही इच्छा मात्र कधी सोडणार नाही !

२६६

आमच्यासकट सर्व विश्वाचे विलयन करीत, आनंदाच्या आभासाचे आच्छादन करून, कालस्थलाची शुद्धहि नुरवून, सर्व समजून जाणून-बुजून शून्यतेमध्ये मिसळून आमच्या उपयुक्त वस्तूंची हेळसांड करीत हानिलाभ करणाऱ्या सर्व परिस्थितीला दुर्लक्षून तू काळ्या छायेची न दिसणारी काळी काळी मूर्ति कोण आहेस ?— ती या प्रश्नाचे उत्तर कधीच देत नाही ती उलट प्रश्नावरहि विरजण घालून त्याला कोठल्या-कोठे कपाटात बंद करून टाकते. तिच्यापासून दूर राहण्याचा जो जो विचार करू लागावे तो तो ती विचारालाच दूर करते आणि आम्हाला विकल करून तेंव्हाच जमीनदोस्त करते. इतकेच काय पण तिची थोडीशी जरी कृपा झाली तरी त्या कृपेने आमची समजूत भ्रांतीमध्ये परिवर्तित होऊन ती आमचे सर्वस्व हरण करून आमच्यात मिसळून जाते. हे प्रभो ! तुझ्याच अधिष्ठानावर या आवरणशक्तीचा आमच्यावर एवढा पगडा बसला आहे, तो तू घालव, आणि तुझ्या दिव्य सत्त्वप्रकाशात आम्हाला जागृत कर !

२६७

साम्ययोगाची मनोहर नौका अथाग आनंदसमुद्रात सुखदुःखाच्या पलीकडे जाऊं लागते तेव्हा तिच्या कृपेच्या ऋणाने भारावून जाऊन चित्त निःस्पंद बनते. त्या स्थितीत क्वचित वल्ह्याचा आवाज ऐकू आलाच तर वीज चमकावी त्याप्रमाणे फेसाळलेल्या लाटामध्ये चित्त समग्रपणे एकाग्र होऊन जाते आणि पुन्हा नावेचा तो शांत प्रवास सुरू होतो. नावेला गति असून त्या गतीचा आभासहि नाही असे भासते. शिडामध्ये वायूचा संचार असून ते न फडफडता आम्हाला आच्छादित करीत आम्ही पुढे जात आहोत ही कल्पनाहि मावळते. पौर्णिमेच्या शुभ्र चंद्रप्रकाशात त्या नावेतला तो आमचा विहार फार फार आकर्षक खरा, पण हे प्रभो ! तुझ्या कृपेने त्या आकर्षणातून सुटून आम्ही निश्चितपणे परतीरावर तुझ्याकडे येऊ ! तुला भेटूच भेटू !

२६८

जीर्णताहि तुझ्या सेवेमध्ये आड येऊ शकत नाही अगदीं नियमितपणे हीनातली हीन सेवा करण्याला तू तयार असतोस, आणि सर्वांच्या शेवटी जे राहिले त्यावरहि तुझे समाधान असते तुझ्या सेवा परंपरेचे स्मारक कोण उभारणार ? पण परम आश्चर्य ! ते उभारण्याचा प्रयत्न केला गेला लहानसाच प्रयत्न तो पण त्यामुळे ती सेवापरंपरा खंडित झाली. मूक नम्र एकनिष्ठ सेवेचे प्रदर्शन ! कोण ही विडंबना ! त्या विडंबनेने तुला किती दुःख झाले ! ते दुःख म्हणजे हरवलेल्या आपल्या निजवस्तूचें दुःख. त्या दुःखावर काही इलाज आहे काय ? आहे आम्हीहि मूक, नम्र, एकनिष्ठ सेवक बनून त्या परात्पर प्रभूला आळवावे हाच तो इलाज ती सेवापरंपरा अखंडित ठेवणे हाच तो इलाज.

२६९

सृष्टीमधल्या न्यायपरपरेतले न्यायाचे काम हे तुझ्या ठिकाणीं ओघानेच आलेले खरे, पण त्याहीपेक्षा तुझ्या न्यायी स्वभावात दया आणि कारुण्य, आणि त्याहूनही स्नेहाची आणि लीला-विनोदाची रसिकताच अधिक असल्यामुळे तुला कोठेहि प्रेममान्यतेचे अग्रस्थान मिळते आणि त्या स्थानावरून तू न्यायापेक्षा आनदाचाच आविष्कार करीत राहतोस. हे आमच्या ध्यानातहि येत नाही परतु जेव्हा एखादे सकट पुढे येते तेव्हा त्याला तूं अशा काही सहजतेने आणि युक्तीने दूर करतोस की त्यामुळे आम्ही थक्क होऊन जातो तेव्हाच हे देवा ! हे प्रभो ! आम्ही तुझ्या आतरिक जादूने भारले जातो, आणि तुझे सत्यस्वरूप आमच्या ध्यानात येते !

२७०

तुझ्या पराक्रमाला ज्ञानमुद्रेने जे गाभीर्य प्राप्त झाले आहे ते तुझ्या लहानशा मूर्तींत आम्हाला कोठून प्रतीत होणार ? परतु ज्या वेळी तुझ्या आत्मनिवेदनाच्या दिव्य कथा आमच्या कानी येतात, तेव्हा तुझ्या लहान मूर्तीमधली महानता आमच्या डोळ्यापुढें उभी राहते आणि आमचे हात तुझ्यापुढे आपोआप जुळून जातात. मग आमचे मन आमचे राहात नाही. ते तुलाच अर्पित झालेले असते. हे प्रभो ! ते सदोदित तसेच राहील हें आश्वासन आम्हाला देशील ना ?

२७१

मानव्याची करुणा जडजीवांवरहि पसरणारी तुझी ती नेहमीची उदार आणि राजस ठेवण डौलदारपणाने आमच्याकडे येते आणि आम्हा लहानाचे कौतुक करून आमच्या डोक्यावर प्रेमाने हात ठेवते तेव्हा आम्ही आनदून जातों आमच्या आनंदाचा तो बहर, त्यांत सकोचाचे मिश्रण झाल्यामुळे त्याची लज्जत कोणालाही कळण्याजोगी नसते. पुन्हा आपल्या हातात या सहज विश्वविहाराच्या अनुग्रहाचा ठेवा जेव्हा तूं डुलत डुलत सर्वाच्या ज्ञानासाठी ठळक स्वरूपात पुढे करतोस तेव्हां तुझ्या बादशाही ऐटीने आम्ही अगदी चकित होऊन जातो आणि तुला नमन न करताच तो ठेवा हातात घेऊन तुझ्या अतर्धानात ध्यानमग्न होतो ! हे देवा ! आमच्या अविनयाबद्दल तू क्षमा कर ! सकोचामुळे आमचे नमन राहिले हे तू जाणतोस ना ?

२७२

एकाच सफाईदार हाताने विश्वमाङ्गल्याच्या मृदुमधुर सौंदर्याची शोभा आविष्कृत करण्याची तुझी रोजची रीति पाहून आम्ही तिच्या अनुकरणात दग झालो होतो आमच्या कृतीमध्ये रंगून दृष्टि अगदी तेथेच खिळल्यामुळे आम्हाला आमच्या कृतीमध्ये लेशमात्रहि उणीव भासत नव्हती पण तूं हळूच मागून आलास आणि सदोष कृतीला पाहून वेळीच ती सुधारण्यासाठी आम्हाला एकदम जोराने धक्का दिलास तेव्हा आम्हाला किती वाईट वाटले ! ज्या हाताने सहज हळुवार सौंदर्यचित्रें रगवावी तोच का आमच्यावर आघात करणारा हा हात ? असे आम्हाला वाटले. आम्ही काहीच बोललो नाही हिरमुसले होऊन बसलो तर काही दिवसानी पाहिले तर खरोखर आमची कृती सदोष होती हें आमच्या लक्षांत आले. आणि पुन्हा त्या कठोर हातातली मृदुता आमच्या प्रत्ययाला आली. देवा ! तुझें स्वरूप असे द्विविध किवा बहुविध त्याचा उद्देशही आमच्या बहुविध दोषाचे निवारण करण्याचाच असतो. हे निश्चित सत्य ज्या धक्क्यामुळे प्रतीतीला आल तो धक्का देण्याला तूं यापुढेहि मागेंपुढें पाहू नकोस, हीच आमची तुला विनति आहे.

## २७३

तो प्रसग मोठा विलक्षण होता. झाडे लावली. त्याना पाणी दिले. खत घातले रात्रंदिवस रक्षणाची काळजी वाहिली झाडाना सुदर आणि मधुर फळे आली. तोच ती नकळत तोडून घेण्याचे काम ज्यानी आरंभिले तेव्हा त्या सध्याकाळच्या कातरवेळी मातृवात्सल्य पुढे आले आणि ती फळे स्वतः खाण्यासाठी नव्हे तर ती सर्वाना वाटण्यासाठी त्याने तोडणाऱ्याचे हात धरले. तोडणाऱ्याच्या हातात फळे कापण्यासाठी तीक्ष्ण हत्यारे होती पण वार करण्याची त्याची हिम्मत झाली नाही. कारण तो वार म्हणजे त्याच्या स्वतःवरचाच वार ठरता त्याचे हात ढिले पडले आणि तोडणारे तसेच परत गेले पण त्या मातृवात्सल्याने त्याना ही काही फळे इतराच्याप्रमाणे प्रेमाची भेट म्हणून पाठविली. त्याना काय वाटले कोण जाणे ! पण देवा ! आम्हाला कळले की तुझे मातृवात्सल्य निःशंकपणे आणि निःशस्त्रपणे न्याय प्रस्थापित करील

## २७४

द्रव्यहीन ऋणामध्ये फेड आणि वसुलीच्या भानगडीची शक्यता नसल्यामुळे आणि अपेक्षेचा लवलेशहि नसल्यामुळे आई, बाप, गुरू, मित्र, सत, समाज आणि परमेश्वराचे ऋण आमच्या शिरावरचा सर्व अन्य भार करणारे ठरते त्यामुळे तेच एक ऋण स्वीकारून तुझ्यापुढे पै-पैसा न ठेवता मी स्वतःलाच ठेवले आहे माझ्या द्रव्यहीनतेबद्दल तुला द्रव याव असे मला मुळीच वाटत नाही माझ्या साधनहीनतेबाबतच तुझ्या करुणेची अपेक्षा आहे हे देवा ! सर्व बाबीत विपन्न असो, पण मला तू साधन-सपन्न कर.—जेणेकरून मला तुझी प्राप्ति होईल !

२७५

मला सागण्यात येते की, "बाबा रे! तो रस्ता मोठा कठीण आहे. तेथे जाऊन फशी पडण्यापेक्षा आमचा हा संसाराचा धोपट मार्ग, आस्तेकदम मार्गच धर हा ससार सोडून त्या प्रभूकडे जाण्याची कल्पना फार मनोहर असली तरी तीमध्ये सुख नाही ससार करीत करीतच प्रभूला प्राप्त करणे का शक्य नसावे? प्रभूला ससाराचे एवढे भय का वाटावे? तो आम्हाला आमच्या ससारातच का प्राप्त होणार नाही?" मी म्हणतो, "ससारात प्रभु प्राप्त होईल, न होईल ते प्रभूचे पाहणे आहे माझे पाहणे इतकेच आहे की मला संसार प्रिय आहे की ईश्वर प्रिय आहे. ईश्वर जर प्रिय असेल तर ससारात राहून चालणार नाही इतकेच काय, पण ससाराचा नुसता विचारहि चालणार नाही प्रभुप्राप्तीचा मार्ग कठीण असण्याचे कारण काय? त्याचे भय कशाचे? तो तर अभयाचा मार्ग आहे! प्रभूला ससाराचे भय नसेल पण मला ते भय आहे तेव्हा मला तो अभयाचा मार्गच स्वीकारला पाहिजे!"

२७६

तू निराधारच असा तुझा वेप ! पण तू अनेकाचा आधार बनून त्याच्यासाठी लागणाऱ्या अनेक वस्तूसाठी सगळीकडे नित्य संचार करतोस. त्या वस्तूचा भार स्वतः वाहतोस. त्याचा संग्रह करून, त्याना सरक्षून, त्याना सस्कारून, उत्तमोत्तम रूपाने त्या तूं सर्वाच्या पुढे ठेवतोस, आणि सर्वाना सतोष होताना पाहून तुलाहि सतोष होतो. इतके आप्तत्व असून परकीयतेने आरोपण करण्यालाहि मागेपुढे न पाहणाऱ्याना विनोदवचनानी रिझवण्यातहि तूं उणा पडत नाहीस तुझे हे सर्व केवळ एक नाटक असून तू ते नाटक आहे असे कोणालाहि भासू देत नाहीस, हे केवढे आश्चर्य !— या अनाथ नाटकवेषाने सर्वाना सनाथ बनविण्याचा तुझा उद्योग तू सतत चालू ठेवतोस हे उचितच आहे परतु त्यातून मला तू का वगळले आहेस ? मलाहि तुझ्या आश्रयाची गोडी केव्हा चाखविशील !

२७७

तू कोणत्या रूपाने मजकडे येशील याचा नेम नाही. असे ऐकून मी प्रत्येकाला तुझ्याविषयीच्या सशयाने पाहूं लागलों, पण माझ्या डोळ्यातल्या सशयाच्या छटेने प्रत्येक जण मजपासून दूर होऊ लागला! परमेश्वरा! ही काय आपत्ति तू मजवर आणलीस? अरे प्रत्येकाला आता असे वाटू लागले आहे की, प्रत्येकाकडे मी काही तरी भलताच सशय धरून पाहात असतो. तो सशय परमेश्वरविषयक आणि अतिशय मगल आहे हे त्याना कसे कळणार? आणि मी सागू तरी काय? तेव्हा आतून आवाज आला— अरे! देवाचे आगमन कोणत्या रूपान होईल याचा नेम नाही. ही गोष्ट तू सोडून दे. तू तो प्रत्येक रूपात आहे असा निश्चय करून वाग म्हणजे तो कोणत्याही रूपात आला तरी तुला, त्याला आणि लोकाना कोणतीच अडचण पडणार नाही. किती हे मोलाचे शब्द!

२७८

मूर्तिकाराने मन लावून अनेक मोहक मूर्ति बनवल्या. त्यामुळे प्रत्येक वेळी त्याचा आनद वाढत गेला त्या परम सतोषाच्या स्फूर्तीने त्याच्या मनात आले की, आपण त्या सर्वोत्तम परमेश्वराची सर्वोत्तम मूर्ति बनवावी परंतु त्यासाठी सगमरवरी दगड कोठे मिळेल ? तो शोधण्यातच वेळ घालविणे त्याला मुळीच रुचले नाही त्याला आता एक क्षणभरहि धीर धरवेना मग विचार करता करता त्याला विशुद्ध अन्तःकरणाच्या खोल खाणीत सर्वोत्तम सगमरवरी दगड आढळला तो घेऊन मूर्ति घडावी असे जो तो म्हणतो तोच त्याची सर्वोत्तम सर्वांगसुदर परमेश्वर-मूर्ति अगोदरच घडलेली त्याने पाहिली ती मूर्ति जरी कोणालाही दिसत नसली तरी ती मात्र सर्वांच्याकडे कृपादृष्टीने पाहात असते हे पाहून तो मूर्तिकारहि त्या मूर्तीमध्ये एकरूप होऊन गेला त्याच्या ठिकाणी ती मूर्ति सर्वांना प्रगट झाली हे प्रभो ! तुझी मूर्ति मी मूर्तिकार नसलो तरी अशीच माझ्या ठिकाणी प्रगटेल का ?

२७९

तो तुझा गुरुसबध दिसणारा नसला तरी तुझ्या रोमरोमात रमलेला असल्यामुळे तो नित्यनूतन अद्‌भुत चमत्काराची सृष्टि निर्माण करण्याची लीला चरित्रे ठिकठिकाणी रचीत असतो त्यामुळे आत्मिक प्रभावाचे प्राधान्य जीवनावर उमटून जीवाची सुप्त आत्मशक्ति प्रबल होते आणि ते आपले सर्व दैन्य झटकून ठिकठिकाणी शातिमय प्रचड परिवर्तनाच्या प्रक्रियेत उत्साहाने भाग घेण्यासाठी आपल्या सकुचिततेतून बाहेर येतात आणि त्याचा एक प्रेमाचा विशाल मेळावा बनतो. हे गुरुभक्ता ! तूं लहान असून त्या महान् मेळाव्याचे प्रतिनिधित्व करतोस मलाहि त्या मेळाव्यात सामील कर. माझी अपात्रता तुझ्या कृपेने नष्ट होईल याविषयी शंका कशाला ?

२८०

अनेक वेळा मी संधी मागितली, आणि ती वाया घालविली आता या वेळी संधीची बदी होईल या भीतीने मी तुजकडे संधी मागत आहे. ती वाया जाणार नाही कारण ती अखेरची आहे माझी अखेर होईल पण संधीची अखेर होणार नाही. या निश्चयाची ती संधी असल्यामुळे ती देण्याबद्दल मी काकुळतीने तुझी विनवणी करीत आहे. नकार देण्याचा तुझा अधिकार नाकारता येत नाही. पण तुझा नित्यस्वभाव भावरूप असल्यामुळे अभावाचा हा प्रयोग तूं मजवर करणार नाहीस या विश्वासाचे आश्वासन मी पुरे मानतो

२८१

हे प्रिय मित्रा ! गोळा झालेले गूढ कुशलतेने उकलून त्याला विणून त्याची तू उपयुक्त शोभा बनवून मला भेट दिलीस. त्या भेटीचा आनद काय वर्णावा ! ती वस्तु उपयोगात आणावी अशी जरी तुझी इच्छा असली तरी तीमध्ये मी तुझ्या मित्रतेची मूर्तिच केंद्रित झालेली पाहतो आणि उपयोगाने त्या मूर्तीचा विनाश होईल हे स्पष्ट असल्यामुळे तिला आमरण जपून ठेवण्याची व्यवस्था मी केली आहे यात तुझ्या इच्छेचा अनादर नाही. कारण तिच्या नित्य-दर्शनाचा उपयोग मी करीत आहे अशा रीतीने तिला अनुपयुक्ततेतून आणि विस्मरणातून मी सोडविले आहे. तुझ्या प्रेमकलेचीहि माझ्या घरी झालेली परिणति पाहून तुला आनंद होईल. आणि या परिणतीच्या परिणततेने मला विश्वेश्वरदर्शन आणि विश्वेश्वरस्मरण या दोन गोष्टी शिकविल्या हे ऐकून तर तुला ब्रह्मानंदाचा लाभ होईल ! कारण आमरण जपून ठेवावयाचे तर ईश्वर-दर्शन आणि ईश्वरस्मरण !

२८२

वाटेल तो आकार दिला तरी तुझ्यात बदल होत नाही हें पाहून माझा आकारभ्रम ओसरून मी तुझ्या मूळ स्वरूपाकडे वळलो तेंव्हां लक्षात आले की माझेहि मूळ स्वरूप माझ्या आकाराचे नसून ते तुझ्याच स्वरूपाचे बनले आहे. परंतु मी विशिष्ट आकारात बांधला गेलों आहे, तसा तू कोणत्याहि आकारात बांधला गेलेला नसून असंख्य आकारात मोकळाच्या मोकळा राहिला आहेस. तू मला तुझ्या स्वरूपासारखें स्वरूप दिलेस हे उत्तमच झाले, पण हे सर्वोत्तमा! सर्वाकारामध्ये मुक्तपणे रमणाऱ्या तुला पाहून मीहि सर्वोत्तम सर्वाकार केंव्हा होईन?

२८३

वाइटाला चांगले करून जोडत जाण्याच्या तुझ्या कुशल नित्य-सरणीचा परिचय नसल्यामुळे आमच्यावर वाइटाचा आणि वाइटावर आमचा सतत प्रहार होत राहिला, इतकेच काय पण वाइटाच्या चिंतनाने आम्हीहि वाइटाच्या कोटीतच पडतो की काय ही चिंता निर्माण झाली. हे परमशुद्ध परमेश्वरा! तुझा धावा केल्यामुळे तुझी हातोटी आम्हाला थोडी थोडी प्राप्त होऊन आमचा बचाव होऊन वाइटाचा मागमूसहि उरणार नाही. याची अटकळ सहज आटोक्यात येईल.

२८४

कल्याण इतके प्रिय वाटावे की तितके प्रियहि प्रिय वाटूं नये. ही बुद्धि परमेश्वराशिवाय कोण देणार?

## २८५

सर्वांत समता, सर्वांत मैत्री, सर्वांत संतोष निर्माण करणारी समतुलेची कला तुला साधून गेलेली आहे. एखादे वेळी, अनेक वेळी, बहुतांशी अशा प्रकारें या गोष्टीची शक्यता चित्ताला मान्य होईल. पण या बाबतीतली तुझी निरपवादता पाहून विस्मय वाटतो. याचे खरे कारण तुझी अलौकिकताच आहे. ही लोकबाह्य अलौकिकता नव्हे. लोकहृदयात सतत आणि एकमेव स्थान मिळवणारी अंतर्गत प्रेमादराची ही अलौकिकता आहे. हृदयात हृद्यतेने प्रवेश करून हृदयपरिवर्तन करूनच ही गोष्ट घडूं शकते. त्यासाठी तू सर्वांचे हृदय बनला आहेस. हे दयामया! माझ्या हृदयातहि तूच आहेस, माझें हृदयहि तूच आहेस. ही प्रतीती मला केव्हा येईल? आणि सर्वांशी मैत्री, सर्वांशी साम्य, सर्वांत संतोष मी केव्हा पाहीन?

## २८६

एकाचे रूप तसेच कोठेहि नाही. एकाची गोडी दुसऱ्यात नाही. एकाचा गुण तसाच दुसरीकडे कोठेहि नाही. ही भिन्नता परस्परपूरक बनून सर्वांना सहकार्याने संबद्ध करण्यासाठीच त्याने निर्माण केली आहे. पण बहुतेक लोक त्यामुळे एकमेकांपासून तुटक आणि विरोधी होत गेले. अशा स्थितीत सर्वांसारख्या सर्व रूपांचा आणि सर्व गुणांनी मंडित असे त्याचे मूळ सूत्ररूप ध्यानात येईल तरच त्याची योजना सफळ होईल. यासाठी त्या प्रभूचे हे अंतःसूत्र तू आधी लक्षात घे आणि त्याच्या आधीन हो!

२८७

"या पेयामध्ये कोणता मसाला मिसळला आहे की ज्यामुळे ते इतके चटकदार झाले ? ते करण्याची कल्पना कोणाची ?" माझ्या मित्राच्या प्रश्नाला मला उत्तर देता आले नाही. कारण ते पेयहि मी चाखले नाही. ते करणाराहि मला माहीत नाही आणि त्यातल्या मसाल्यासंबंधीचीहि मला काहीच कल्पना नाही अवलिप्त रुचीमुळे त्या रुचीपेक्षाहि तिच्या मूल संशोधनाकडे वळणारी माझ्या मित्राची दृष्टि खरोखर मूलग्राही असल्यामुळे मी ते पेय न पिऊनहि त्या पेयाच्या प्याल्यातून अतिशय रुचकर मूलसंशोधनाची स्नेहदृष्टि मला मिळाली ! स्नेहाच्या स्वागतात नेहमीच परमेश्वरी बोधाची लयलूट होत असते. पण ती कळेल तेव्हा ! आणि कळेल त्याला !

२८८

स्वतःसंबंधीच्या अज्ञानामुळेच नव्हे तर स्वतःसंबंधीच्या व्यर्थ अस्मितेमुळे जीवनामध्ये स्वतःला समजून घेता घेताच आमचा बहुतेक काळ निघून जात आहे मग संबंधित सृष्टीला समजणे कोठून शक्य होणार ? आणि अजूनहि स्वतःला आम्ही वास्तविक समजलो आहोत किंवा नाही हाहि प्रश्न पूर्णपणे नसला तरी पुष्कळसा अनुत्तरितच असल्यामुळे संबंधित सृष्टीच्या द्वारें स्वतःलाच समजून घेण्याचे परस्वाधीन आणि मंदगतीने चालणारे कार्य आमच्यापुढे उभे राहिले आहे हे प्रभो ! ते तुझ्या आणि तुझ्या सृष्टीच्या ओळखीच्या सतत आड येत असल्यामुळे आम्ही जगात असून नसल्यासारखेच झालो आहोत. धड आम्ही आम्हाला ओळखत नाहीं आणि तुला व तुझ्या जगालाहि ओळखत नाही ही व्यर्थ अस्मिता जन्मभर आमच्या आड आली आहे आणि ती मरणापर्यंत टिकेल तर जन्ममृत्यूच्या पावलानी तुझ्याकडे येणे कसे शक्य होईल ? जन्ममृत्यु कधीहि व्यर्थ ठरता कामा नयेत, हें तुला पाहायला नको का ? कारण तूच त्याचा निर्माता आहेस.

२८९

आरोपणच जर करावयाचे तर विरोध निर्माण होईल. असे आरोपण का करावे? कोणी कोणावर आरोपण का करावे हा दुसरा प्रश्न आहे आपलेच आपल्या अंतःकरणावर एकसारखे आरोपण होत असते अंतःकरण आरोपणरहित नसतेच. त्यामुळे अंतःकरणाला स्वतःवर आणि दुसऱ्यावर काही ना काही आरोपण करण्याची सवय लागलेली असते गाढ झोपेंतसुद्धा गाढ तमोगुणाचे आवरण अंतःकरण आपल्यावर ओढून घेत असते हे जीवा! मांगल्याचे, उत्साहाचे, मैत्रीचे, कल्याणाचे आरोपण करण्याची तूं सवय लावून घे. ते आरोपण खरे नाही हा संशय तू सोडून दे आज ते खरे न वाटो पण खरी स्थिति अशी आहे की मांगल्य, उत्साह, मैत्री, कल्याण हेच अंतःकरणाचे स्वरूप आहे ते चोहीकडे पसरले पाहिजे मन बुद्धि अहंकार आणि चित्त हे अंतःकरणाचे पृथक्करण तूं सोडून दे तो शास्त्रार्थ आहे पृथक्करण म्हणजे शास्त्रार्थ, आणि मंगलार्थ म्हणजे परमार्थ हे तू लक्षात घे शास्त्रार्थ सोडून परमार्थ साध आणि स्वतः आरोपी बनू नकोस तसा दुसऱ्यावर आरोप करू नकोस. मांगल्य, उत्साह, मैत्री, कल्याण हे साधनारोपण अवश्य आहे कारण मूलतः ते आरोपणापलीकडचे आपले सर्वांचे शुद्ध स्वरूप आहे ते पृथक्करणहि नव्हे आणि एकत्रीकरणहि नव्हे.

२९०

स्फूर्तीची मूर्ति भूतकाळाच्या भुतातून किंवा साधनांच्या बंधनातून निर्माण होत नसल्यामुळेच एखाद्या सामान्य झऱ्यामध्येहि प्रभूचे ते अमर काव्य केंद्रीभूत होऊन धावू लागते. अगदी साध्या झाडाच्या पाना-पानातून सळसळणाऱ्या वायूमधून ते वाहूं लागते. सामान्य झोपड्या-मधूनहि ते डोकावू लागते. अबोध मुलाच्या बोबड्या बोलात त्याचे अनमोल शब्द ऐकू येऊ लागतात आणि फारशा साजसरजामाची जेथे जरुरी नाही त्या भिकाऱ्याच्या एकतारीमधून "प्रभु एक तारी, प्रभु एक तारी" हे त्याचे पालुपद ऐकू येऊ लागते. हे माझ्या जीवा! मोठमोठ्या कवीच्या कवनाना मागे टाकणारे हे परतत्त्वस्पर्शाने पावन झालेले काव्य तुझ्या जीवनात तू गुफून घेशील, याच एका आशेने मी ते तुझ्यापुढे मांडले आहे.

२९१

ज्याना विश्वसाम्राज्याच्या विजयाची स्वप्ने पडत असतात त्याची गोष्ट वेगळी आणि ज्याना स्वसरक्षणाचीच चिता लागलेली असते, त्याची गोष्ट वेगळी त्या दोन्ही गोष्टी टाळून ठिकठिकाणी हे प्रभो, तू आपल्या प्रेरणेकरवी आक्रमणाला परतवून लावणाऱ्या योजनेचे मजबूत दुर्ग बनविलेस. आणि केवळ शब्दशस्त्राच्या जरबेने अनेक स्वैराचार सुरू होण्याच्या आतच गर्भगळित झाले. त्या दुर्गम दुर्गात विश्वासाने भरलेल्या प्राणार्पणाची नेहमी तयारी असलेल्या निवडक लोकाचाच समावेश असल्यामुळे तेथे विश्वासघात, अवसानघात किंबहुना कोणताच घात होऊं शकत नाही आघाताला प्रत्याघात हीहि परप्रत्ययनेय बुद्धि तेथे नाही खरोखर ते दुर्ग म्हणजे भयानक संसारसमुद्रांतली महाद्वीपेच होत. तेथे संध्याकाळी जेव्हा दिवेलावणी होते तेव्हा त्या चमचमणाऱ्या दीपशोभेने आकाशातल्या तारकानाहि हेवा वाटू लागतो सगळा दैवी भाव तेथे अवतार धारण करतो आता सगळे झोपलेले आहेत म्हणून तेथे कोणी शिरेल ही शक्यताच नसते. कारण रात्रीबरोबर तारका आणि दिवेहि तेथे उत्तम पहारा करीत असतात मग दिवसाचे काय सागावयाचे ! माझ्या जीवा ! तुला तेथे प्रवेश मिळेल अशी तुझी योग्यता नसली तरी तुझ्या मनात ते स्थान सदोदित प्रवेशूं दे, एवढेंच माझें म्हणणे आहे

२९२

मी वर आणि इतर लोक खाली, मी खाली आणि इतर लोक वर, मी आणि इतर लोक समान, या तिहीना सोडून तो परात्पर प्रभु सर्वांच्याच वर असून आम्ही सर्व खाली उभे राहून त्याची प्रार्थना करीत आहोत, हीच भूमिका टिकणारी आणि सत्य असल्यामुळे माझ्या जीवा ! ती तूं कधीहि सोडूं नकोस !

२९३

रात्री हरवून दिवसा सापडण्याच्या नित्यक्रमामुळे वास्तविक हर्ष-शोकाचे काही कारण असू नये पण आम्हाला हरवण्यात आणि सापडण्यात दोहोमध्ये हर्षच हर्ष होत असतो याचे कारण रात्री आम्ही हरवलो तरी तो प्रभु त्यात सापडतो आणि दिवसा आम्ही सापडलो तरी तो प्रभु त्यात हरवत नाही सगळा उत्साह, सगळा आनद त्याचा असतो त्यात न्यूनाधिक होत नाही अशा रीतीने रात्री एकरूपतेने आणि दिवसा विविधतेने त्याला आळवीत आळवीत आमच्या सर्व दिवसरात्री सरून जातील आणि शेवटी विविधता आणि एकरूपतेच्या पलीकडची एकच-एक आळवणी उरेल त्या अमृताने आम्हाला केवढा सतोष होईल या कल्पनेनेहि आज आम्ही अगदी भारावून गेलो आहोत !

२९४

वास्तविक माझे आणि कोणाचेहि कितीहि वय असो सर्वांचा फक्त एकच दिवस आणि एकच रात्र आहे बाकीचे सर्व आले आणि गेले येतील आणि जातील त्यांची गणतीच नाही, ही दुनिया दोन दिवसाची आहे असे जे म्हणतात ते या दृष्टीने खरोखर चुकत आहेत. ही दुनिया, मी आणि इतर सर्व एकाच अहोरात्रात गुफलेला हार असून तो हार आणि विजय याच्या पलीकडच्या प्रभूच्या गळ्यात रुळत आहे ही सत्यस्थिति लक्षात आली की सगळा खेद मावळतो आणि अनित्यतेच्या नित्यतेने मन अगदी प्रसन्न होऊन जाते.

२९५

पावसाची एकच सर पण तिला कोठेहि सर नाही ! सगळी रुक्षता, सगळी उष्णता, सगळा कोमेजलेपणा तिने अगदी लीलेने आणि शातपणाने एकदम झुगारून दिला अरुणोदयानतरच्या प्रभात-कालाने नक्षत्र–तारकाना एकदम झुगारून द्यावे किवा समुद्राच्या प्रचड लाटेने वाळूच्या किनाऱ्याला ढकलून द्यावे, अथवा विद्युल्लतेच्या एकाच कडकडाटात रात्रीचा गाढ अधकार एकदम प्रकाशमय व्हावा, त्याप्रमाणे त्या सरीने मोत्याचे सर ओघळवून दारिद्र्यशकेला कोठल्या कोठे कोल-मडून पाडले आणि हजारो अत करणाना वैभवाच्या दिव्य दालनात प्रविष्ट केले हे प्रभो ! आमच्या निराश जीवनात तुझे असे अकल्पनीय सामर्थ्य केव्हा प्रगट होईल, आणि आमच्या जीवनाला अकस्मात कोणती कलाटणी मिळेल हे कोणीहि सागू शकत नाही पण कसेहि असो, आम्ही इतके निश्चित सागू शकतो की त्या परात्पर प्रभूचा जीवनाभिप्राय नेहमीच अगम्य आणि गूढ राहिला तरी निश्चितपणे तो कल्याणमगलाच्या दिव्य दालनात आम्हा सर्वाना प्रविष्ट करील !

२९६

माझ्या प्रिय मित्रानो ! आपणा सर्वाच्या दर्शनाचा लाभ झाल्या-मुळे मला अतिशय आनद होत आहे बाहेरच्या हजारो उणीवा येथे नसल्यामुळे आपली सर्वाची येथे एक दृढ आत्मीयता निर्माण झाली आहे आपणामध्ये माझ्यामध्ये उणीवा नाहीत असे नाही. पण बाहेरच्या उणीवाना दूर करण्यात त्या उणीवा कोठल्या कोठे नष्ट होतील, आणि सर्वत्र परमात्म्याची परिपूर्णता प्रगटेल ह्या भविष्यत् आनदाच्या आशेनेच मी आपणाकडे पाहात आहे. आणि खात्री असू द्या मी आपल्या कार्यात माझ्या उणीवाचा कोणताहि अडथळा आणू देणार नाही

२९७

ह्या ओढ्यात आम्ही ओढले जात आहोंत, आम्हांला वाचवा म्हणून आम्ही आक्रोश करीत नसून आम्हांला ही ओढ फार मानवली आहे आम्ही स्वतःहि आमची थोडीफार गति या ओढीमध्ये मिळवली आहे आम्हाला वाचविण्याचा प्रयत्न मुळीच करू नका म्हणून आमचा हा आरडाओरडा आहे ! पण तो तीरावरच्या लोकाना कळला नाही ते बिचारे करुणेने आम्हाला वाचविण्यासाठी धावून आले. आणि त्यानी जेव्हा पाहिले की ही प्रेमाची ओढ आहे. प्रेमाच्या ओढीला तोड नाही. मग तेहि आमच्याबरोबर ओढले गेले आता हे वाहात जाणारे सगळे आम्ही प्रेमाच्या अथाग आनंद-समुद्राला मिळालो आहोत. येथे बुडण्याचे कारणच नाही अथवा येथें बुडूनहि आम्ही तारले जात आहोत. हे ससारसमुद्रा ! तुझें कधीं कोठे अस्तित्व होते आहे किंवा असेल हें कोणालाहि येथे प्रतीत होत नाही. तेव्हा तूं सुकून जा किंवा आपल्या शोकाश्रूनी भरून जा आम्ही तुझी मुळीच पर्वा करीत नाही !

२९८

तू कोणाला कांहीहि आणि कितीहि दिलेस तरी प्रत्येक ठिकाणी काही ना काही उणीव ठेवतोस ती उणीव कोणालाहि बोचत नाही. त्यामुळे कालातराने ती वाढत वाढत आमचीं घरे म्हणजे उणीवांची एक मोठी वसाहतच बनते. आम्ही तेथें नाममात्र राहतो पण त्या तेथे त्याचेच मुख्य अस्तित्व बनते हे परिपूर्ण परमेश्वरा ! आम्हाला परिपूर्णता देऊ नकोस पण उणीवेची जाणीव तरी देत जा जेणेकरून तिच्या वाढीला आम्हाला आळा घालता येईल. आणि आमच्या घरात तिचे घर न राहता आम्ही तिचे बाहेर घर उन्हात बांधू. मग खुशाल तिने तेथे तळमळत रहावे अथवा निघून जावें !

२९९

हे माझ्या मना ! उच्चतेमध्येच उच्चता भरलेली आहे, हा भ्रम तूं सोडून दे. उच्चतेमध्ये उच्चता आहेच पण त्या परमोच्च प्रभूने सर्व विश्वात ती पसरून दिली आहे तू जिला उच्चता म्हणतोस ती तुला स्वतःला अनुलक्षून मानलेली सापेक्ष उच्चता आहे. परमेश्वराने निरपेक्ष उच्चतेला विश्वात पसरून त्याच्याहि पलीकडे तिला स्थान दिले आहे. त्यात सापेक्ष उच्चतेचीहि सहज योजना आहे स्वतःला किंवा कोणालाहि नीच मानण्याचा भ्रम सोडून तूं आपल्या सापेक्ष उच्चतेने त्या परमोच्च प्रभूच्या वैश्विक परमोच्चतेला स्पर्श कर तोच प्रभूचा पावन चरण-स्पर्श !

३००

स्वैरतेच्या सचाराला कोठेच सीमा नाही अशा स्थितीत तिला सावधानतेच्या दिव्य प्रेमाने वळवून उपयुक्ततेच्या घरी एकाच सुरक्षणात बाधून तीपासून अमृताचा लाभ करून देणारे विलक्षण आकर्षण जेव्हा केंद्रीभूत झालेले आम्ही पाहिले, तेव्हा त्यामुळे आम्हीच आम्हाला विसरलों. मग आमची कर्तव्ये त्या विस्मरणात बुडून जावीत यात काय आश्चर्य ? आमची सर्व कर्तव्ये त्या आकर्षणात कृतकृत्य झाली. खरोखर आम्ही ती कृष्णार्पण करून टाकली !

## ३०१

वक्रतेतले सहज सौंदर्य सरळतेच्या मधुर लकेरींनी चित्तावरच्या अनंत तरंगांना आपल्या रंगाने रंगवणारे ते मोहकतेचे माहेर मला आता फार दिवसांनी प्राप्त झाल्यामुळे माझ्या डोळ्यांना पाझर फुटला आहे. माझ्या आईची भेट होत आहे मंडळी म्हणाली, " भेट झाली ना ? आता रडण्याचे कारण काय ? आता आनंदी आनंद ! " पण नाही दीर्घकालच्या विरहव्यथेचे हे अश्रूंच्या द्वारे आत्मनिवेदन होत आहे ते सरल्याशिवाय स्फुंदून स्फुंदून कंठ मोकळा झाल्याशिवाय मी माझ्या आईशी एक शब्दहि बोलू शकत नाही त्या अवस्थेने ती जगन्माताहि विरघळून गेली. आणि माझी समजूत घालता घालता तिचीहि समजूत तिला घालता येत नव्हती अहो समजुतीनें समजूत कशी घेणार ? ती त्या जगन्मातेच्या प्रेमानेंच होईल !

## ३०२

प्रबळ प्रेमाचे माधुर्य विरोधाच्या विषमयतेवर सहजच वरचढ होऊन त्याला त्याचा विनाश तर दाखवून देतेच. पण त्याचाहि उपयोग करून घेता येईल या दृष्टीने त्याला एका कोपऱ्यात स्थान देण्याची ते तडजोडहि करून त्यातहि प्रेमाचा विजय करविते. शत्रूशी प्रेमाने वागणे हे मित्रांना रुचत नाही हे उघड आहे पण अशा रीतीने प्रेम वाढून ते वाढलेले प्रेम पुन्हा मित्रांना मिळेल हे मित्रांना अनुभवानेच कळूं शकते. अशा रीतीने शत्रु जरी पुरा मित्र झाला नाही तरी तो पुरा शत्रूहि रहात नाही आणि कधी काळी तो पुरा मित्रहि होण्याची शक्यता निर्माण होते. हा प्रबळ प्रेमाचा महिमा कोणी मान्य करो न करो सर्वशक्तिमान् प्रभु-प्रेमात तरी तो मान्य करावाच लागेल.

## ३०३

कोणतेहि आवरण कोणतेहि आरोपण हे भ्रमजाल दूर करण्यासाठी स्वच्छ जीवनाचे अवगाहन करून अनेक वृत्ति विशुद्ध होत असताना पुन्हा त्याना त्याच आवरणाचे आकर्षण होऊ नये म्हणून अतरात्मा सतत नजर ठेवीत असतो ही त्याची केवढी कृपा आहे! परतु त्या कृपेला न ओळखणारे त्या आवरणाचीच पुन्हा याचना करू लागतात अतरात्म्याची कृपा मग त्यापुढेहि जाऊन झाली तेवढी विशुद्धता ते आवरण दूर करील या दृष्टीने ते आवरणहि विशुद्ध करून त्याना ते ग्रहण करण्यात अडथळा आणीत नाही, आणि त्या आवरणातहि विशुद्धतेची चमक दाखविते माझ्या मना! तू केवळ विशुद्धता पहा त्या चमकेवर तृप्त होऊ नको!

## ३०४

ती केवळ एक दृष्टि आहे ते दिग्दर्शन आहे त्यालाच जडतेने धरून ठेवलेस तर हे जीवा! तू आधळाच होशील असे अध जन्माधाहून जन्माध होऊन डोळसपणाचा डौल मिरवीत आपल्याबरोबर अनेकाना अध बनवतात आणि अधाराने भरलेल्या जीवनशून्य कूपात पडून विनष्ट होतात. तू कधीहि त्याच्या नादी लागू नकोस.

## ३०५

बाहेरून गोडी आणण्यासाठी अनेक प्रकार करावे लागून पुन्हा त्यात सतत बदल करूनहि मुख्य वस्तूचे ग्रहण बाजूला राहून गौणतेचेच अधिक ग्रहण होते आणि अनेक प्रकारच्या विकृतीनी गोधळ उडून जातो गोधळलेल्या मनाला आतलीच गोडी स्थिर करील. हे जीवा! ती आतली गोडी उत्तरोत्तर आत जात जातच तुला लाभेल तिच्यासाठी बाहेरचा सर्व पसारा बंद कर

## ३०६

आम्ही आमच्यात आमचे थडगें बांधल्यामुळे जीवाच्या जीवनाचा उलगडा होत नाही. तो उलगडा व्हावा म्हणून देवाने दुनिया पसरून दिली आहे. तीमधून परस्पर पडताळ्याने आम्हाला आमचा अर्थ प्राप्त होईल. आम्ही सर्व सुट्टी अक्षरे आहोत. त्याचा परस्पर जुळणीनें अर्थ होऊ शकतो आणि त्यामधूनच जीवन ग्रथाचे महाकाव्य रचले जाऊ शकते. ते तसे प्रत्येकाला रचता न येवो निदान आमच्या जीवनातला प्रभूचा सदेश तरी हे जीवा! तूं समजून घे तेवढयानेहि जीवन सार्थक होईल

## ३०७

हे लाकुडतोड्या! आज तोडून आणलेली लाकडाची मोळी तुझ्या हाडाच्या मोळीवर जरी विराजमान करून तू ती विक्रीला काढली असलीस तरी उद्या तीच मोळी तुझ्या हाडाच्या मोळीला दग्ध करण्याला मागेंपुढे पाहणार नाही. याचे स्मरण जर तुला नसेल तर तुझ्याच कुऱ्हाडीने तू तुझेच पाय नकळत तोडत आहेस लाकडे तोडणे हे केवळ वरवरचं आहे, हे लक्षात घेऊन त्याबरोबर तूं यमाचा पाशहि तोडत जाशील तर किती बरे होईल!

## ३०८

सामर्थ्य नसतांना केलेले आमचे मनाचे अनेक चागले विचार पानें फुले फळे न येणाऱ्या केवळ उजाड वृक्षाप्रमाणे शुष्कतेचे प्रदर्शन करण्याला कारणीभूत होत असल्यामुळे सामर्थ्यप्राप्तीचा विचारच सद्विचाराचा पाठिराखा होऊ शकतो. हे आम्ही त्या सर्वसमर्थ प्रभूला विसरल्यामुळेच विसरतो. त्यामुळे सद्विचार वाया घालविण्याची आणि उत्तरोत्तर दुर्बळ बनण्याची ही स्थिति आमच्या अस्वास्थ्याला कारण होते. ती इतराच्या स्वास्थ्याचाहि अपहार करील. म्हणून हे जीवा! लवकरात लवकर सामर्थ्याची स्वस्थता प्राप्त करून घे!

३०९

माझी जन्ममृत्यूची भीति कोठल्या कोठे निघून गेली कारण माझ्याच ठिकाणी आता अगणित जन्ममृत्यु प्रत्यही होत आहेत. माझ्या अनभ्यस्त मनाला आता त्याचे पूर्वीसारखे भय तर वाटत नाहीच पण तुझ्या महान् उदार पायापाशी ते विरून जाताना मी पाहात आहे त्याच्या उभयविध चैतन्य-लीलेने माझें दुर्बल मन सबळ होऊन त्यात जन्ममृत्यूच्या पलीकडची महाभावाची धारणा दृढ होत चालली आहे अतःसुखाने मौन धारण केल्यानतरची ही धारणा मला कोठल्या अवस्थेत नेईल ते सागणे शक्य नाही कारण तिच्या अनत प्राताताल्या भूप्रदेशाचे मला किवा कोणालाहि ज्ञान नाही म्हणून मागे वळून न पाहता ती नेईल तिकडे जाणे एवढेच आता माझे कार्य उरले आहे

३१०

अतरगातली प्राप्ति, तिचे सुख आणि तदुद्भव जाणीव, बहिरगातले दृश्य, त्याचे नाविन्य आणि तदुद्भव वैशिष्ट्य हें सर्व ज्या भिन्न भिन्न भूमिकावर अवलबून राहते त्या सर्व भूमिकाना शोभवून परमेश्वर त्याचे अधिष्ठान बनतो त्यामुळे सर्व वस्तूंत त्याच्या खुणा उमटून पडतात. त्या खुणा म्हणजे अज्ञानाचा जीर्ण शेष राहिलेला तुटका लेख नव्हे तो पूर्वज्ञात तत्त्वाचा चेतन आविष्कार आहे खरोखर तो आम्हाला लिहून दिलेला आत्मिक अधिकाराचा ताम्रपटच यात शका नाही !

## ३११

मी जे मोठ्या प्रयत्नानें मिळविले ते सहज नाहीसे झाले याचे मला मोठे दु ख वाटले परंतु मला जे सहज प्राप्त झाले मला ते प्रथम महत्त्वाचे वाटले नाही. पण अनुभवाने तेच सर्वात महत्त्वाचे ठरले. आणि त्याचा विनाश ही भाषाहि अशक्य ठरली याचे आश्चर्य वाटणे अस्वाभाविक नाही परंतु हा फरक खरा आणि खोट्याचा फरक होता. पहिले बाह्य ध्यान खोटें होते आणि दुसरे अतर्ज्ञान खरे होते।

## ३१२

विसर्जन आणि ग्रहणाची विशिष्ट साम्यमर्यादा ओलाडल्यावर विकृति निर्माण न होणे अशक्यच असते परंतु तुझ्या ठिकाणी माझे अतिम विसर्जन आणि माझ्या ठिकाणी तुझें अतिम ग्रहण करण्याच्या ध्येयामागें लागल्यापासून विकृति माझ्यापासून दूर निघून जात आहे, आणि सौजन्याच्या सस्कृतीनें विनयपूर्वक सर्वांना आवाहन करून मजकडे एकत्रित केले आहे. त्या सर्वांना मी काय देणार ? मी तुझ्याच वैभवाचे चितन त्याच्यापुढें ठेवून सर्वांना ते गोड करून त्याचा स्वीकार व्हावा म्हणून विनवितो आणि पुन्हा तुझ्याच चितनात लीन होतो.

## ३१३

मी माझी दीनता कोणाला कळूं नये म्हणून का बरे जपत असतो ? देवा ! त्याचे कारण हेच की तुझी दीनता ठरेल ! मी जर तुझा म्हणवितो तर मी दीन असलो तरी लोकाना माझें दैन्य कसे दाखवीन ? तुझ्या थोरवीला जपत असताना माझ्या दैन्यानें मी गुदमरून गेलो तरी त्यात मला आनंद होईल कारण त्यात तुझ्या थोरवीला धक्का लागलेला नसेल.

३१४

तीच गोष्ट वारवार करून तिच्या दृढीकरणामुळे आपले चित्त तिच्या पूर्ण स्वाधीन होईल त्याप्रमाणे तीमुळे लोकाचेहि चित्त आपल्या स्वाधीन होईल हा अदाज जे करतात त्याचे चित्त त्या गोष्टीच्या कधीहि स्वाधीन होणार नाही. कारण ते त्या गोष्टीच्या गोडीमुळे ती गोष्ट वारंवार करीत नसून लोकाना आपणाकडे ओढण्याच्या बाह्य हेतूने ते ती गोष्ट वारवार करीत असतात ती वरपगी असते. वरपंगी गोष्टीना अनरग कधीहि वश होत नाही. कारण अनरग वशीकरणाला प्रभुप्रेमाशिवाय योग्य असा एकहि विषय नाही ते प्रभुप्रेम मिळवावयाचे सोडून अनग्गाला अनेक प्रलोभने दाखविल्याने ते चचल होईल. तेथे एकनिष्ठता कशी निर्माण होणार ? हे माझ्या जीवा ! हे जाणून घे ! आणि जाणून बुजून आत्मपरवचना करू नकोस !

३१५

तू आरभी प्रचड वेगाने अतस्तलाच्या खोलीचा आणि व्यापकतेचा ठाव घेतोस मध्यतरी बहिरगावर शोभेची गोड साखर पसरून देतोस. आणि शेवटी अतिशय जोराने वैपुल्याचा सचय भरून देतोस यात वास्तविक भविष्याची चिता न करता आम्ही तुझें वैभवशाली चिंतन करावे हा तुझा हेतु असतो पण आमच्याकडून तो पार पडत नाही आमची चिता सरत नाही आणि आमच्याकडून तुझ्या चितनाची सुरुवातहि होत नाही. हा आमचा दोष आम्ही कसा काढावा ? हीहि आमच्या चिंतेत भरच पडेल म्हणून दोष विसरून केवळ आमच्या गुणाचेच स्मरण करावे असे आम्ही म्हणतो हे प्रभो ! यामध्यें अहकाराचा सचार न होवो. लीनतेनेच तूं हें आमच्याकडून घडव. तरच काहीं तरणोपाय आहे.

३१६

आम्हांला वासनेतून, अहकारातून, क्लेशातून आणि मृत्यूंतून तारून नेणारी नाव आणि तिचा नावाडी हवा होता. चित्ताने तुझ्या नावाची नाव शोधली आणि तुला त्याने नावाडी केला. आता आम्ही या नावेंत बसलो आहोत तरीसुद्धा या चारी गोष्टी जर आम्हाला बुडवूं लागल्या तर तुझे चारी हात यातून आम्हाला काढून परतीरावर नेतील. या भरवशाचाच आम्हांला खरा आधार आहे.

३१७

काव्याची पहाट फुटून वर खाली आत बाहेर चोहीकडे रमणीय चरित्र–चारित्र्याचीं चित्रे चितारली जाऊ लागली ती कधीं परस्पराची अन्योन्यदर्शक भूमिका बनून स्वतःला लपवून दुसऱ्याना प्रगट करीत तर कधी पूर्णपणे लुप्त होऊन पुन्हा नाविन्याचे प्रगटीकरण करूं लागत त्याचे चित्रण करणाऱ्या हे विचित्र चित्रकारा ! मलाहि त्या चित्रात तू गोवून तुझ्या काव्याचे एक कडवे बनविले आहेस. त्याला माझी हरकत नाही पण माझे इतकेच म्हणणे आहे कीं ते कडवे कडवे ठेवूं नकोस त्यात तुझ्या प्रेमरसाची गोडी भरून दे !

## ३१८

एकावर एक आवरणे येतात आणि जातात. परतु त्यामुळे जीव दडपला जातो जुन्या आवरणाचा भार हलका होत जातो तितकेच थोडेसे बरे वाटते तोच नवे आवरण दाखल होते. ते नवे म्हणून थोडे बरे वाटते लगेच त्याची जुन्यात जमा होऊन त्याचा भार होऊ लागतो. या जुन्या-नव्या आवरणाना जीव कसा आवरणार ? ती शक्ति त्याच्यात असती तर काय पाहिजे होते ? ती आवरणेच जीवाकडे येणार नाहीत ही गोष्ट शक्य नाही कारण ती परतंत्र आहेत. सर्वस्वतत्र सर्वशक्तिमान् परमेश्वरी कृपाच या द्विविध अडचणीचे निवारण करू शकेल त्या कृपेला आम्ही केव्हा आणि कसे प्राप्त होऊ हाच आमच्यापुढे मुख्य प्रश्न आहे.

## ३१९

तुझ्या कृपाछत्राखाली नित्य निवास, विश्वकर्म्याच्या चित्कला-प्रांतातला योगक्षेम, सर्व प्रकारच्या अलिप्ततेचे नित्य ग्रहण देऊनहि तुझे स्मरण जर तू दिले नाहीस तर तू सर्व देऊनहि काहीच दिले नाहीस आणि आम्ही सर्व मिळवूनहि काहीच मिळविले नाहीं अशी स्थिति निर्माण होत असल्यामुळे तुझे आमच्यापासून चोरून ठेवलेले स्मरणहि आम्ही तुझ्यापासून चोरून घेण्याचे ठरविले आहे !

## ३२०

माझ्या सर्व उद्योगात तुझा योग हीच माझी आकाक्षा आहे. म्हणून माझ्या गाण्यात तुझे सूर, माझ्या चित्रात तुझे रग, माझ्या शेतीत तुझा माल, माझ्या वस्त्रात तुझें सूत, माझ्या अलकारात तुझे सोने तूं भरून दे. मग माझा कोणताहि उद्योग निष्फळ असूनहि त्यात मला पूर्ण साफल्याचे समाधान प्राप्त होईल. कारण त्या निष्फळतेतहि तुझा योग असणारच. निष्फळतेत असो की सफळतेत असो, तुझा योग हीच सफळता.

## ३२१

अगणातल्या माडवावरच्या वेलीवर नक्षत्रासारखी फुले फुलली असून त्याचा सुगध चोहीकडे दरवळून गेला आहे देवा! आमच्या मनाच्या वेलीवर तुझ्या वैभवशाली मननाची सुदर फुले केव्हा फुलतील? त्याच्या सुगधाचा लाभ आम्हाला केव्हा मिळेल? आणि ती आम्ही केव्हा तुझ्या चरणावर वाहूं?

## ३२२

जिनें सामान्यतेतून वैशिष्ट्यात, जवळून दूरतेत, आत्मीयतेतून परकीयतेत परिवर्तन झाले तरी स्वत्व न सोडता सर्वावर आपल्या तेजस्वितेचा प्रभाव पाडून आत्मवैभवाच्या वाटणीत सर्वांना भागीदार करण्यासाठी अखड तपस्येचा स्वीकार केला आणि सर्वत्र न्यायाचा उपक्रम करून, निर्बलावर आक्रमण करणाऱ्याना दूर केले अशी तुझ्या भक्तीची शक्ति क्वचितच कोठे आढळते तरी तिचाच सर्वाना आधार असल्यामुळे हे प्रभो! तीच आमच्या अतःकरणात अढळ कर.

## ३२३

गांभीर्यात मुरून गेलेली परम शाति, परोपकारात गढलेले गाढ सामर्थ्य, ज्ञानसाधनेत रमलेली बालवत् ऋजुता, सर्वांना आमत्रण देणारी सुव्यवस्था, सर्वाना सुखविणारे अनुपम सौदर्य, जेथे राहते तो अरण्यातला आश्रम खरोखर धन्य होय! कारण तेथे वारवार थोराच्या भेटीना आणि त्याच्या गुजगोष्टीना भरपूर वाव मिळतो. तेथे दुसरे कोणतेहि काम नसल्यामुळे याच भक्तिसुखाचा अव्यग आनंद घेत दिवस व्यतीत होतात आणि सर्वाना आपले जीवनपाथेय प्राप्त होते.

## ३२४

आज इथे तर उद्या तिथे, आज नगरात तर उद्या अरण्यात, आज दारिद्र्यात तर उद्या श्रीमतीत अशा परस्पर विभिन्न अवस्थाचा भेद करणारे प्रभूचे चिंतनवैभव ज्याना प्राप्त होते त्याची आतरस्थिति जे समजू शकतात आणि त्याच्या सेवेने पुनीत होण्याचा प्रयत्न करतात अशाच्या सख्येच्या अल्पतेवरून तूं त्याच्या वैभवाचे माप काढू नकोस. त्याची आतरस्थिति समजणारा एकहि नसला तरी त्याचे वैभव केवळ अनुपम आहे हे तू लक्षात ठेव आणि त्याना समजून घेण्याचा प्रयत्न कर।

## ३२५

विद्याविभवाच्या वातावरणात वर्षानुवर्षे व्यतीत करून तिच्या वितरण कार्याने ती सतत वाढवीत जाण्याच्या आयुष्यक्रमातली अखडता ज्यानी अनुभवली त्याची जेव्हा प्रपच आणि प्रापचिकाकडे नजर जाते तेव्हा तेथे सर्वत्र भरलेल्या क्षुद्रतेनें आणि त्यातच श्रेष्ठता मानण्याच्या व्यर्थतेने त्याचे मन त्याच्याविषयीच्या करुणेने भरून जावो। हे प्रभो। त्याना त्याच्याविषयी तिटकारा न वाटो। कारण तसे होईल तर प्रापचिकाना कोणाचा आसरा मिळेल?

## ३२६

आमच्या मनासारखेच जर सर्व होईल तर आमच्या मनाला आवर घालणारे कोणीच राहणार नाही. आमचे मन कधीहि तुझ्याकडे वळणार नाही। याच हेतूने आमच्या मनासारखे सर्व होत नाही ही तुझी आमच्यावर केवढी कृपा आहे त्यामुळे आमच्या मनासारखे झाले की तीहि तुझीच कृपा हें. आम्ही समजू शकतो। नाही तर तुझ्या कृपेचा आम्हाला पत्तासुद्धा लागला नसता. हे प्रभो। तुझ्या कृपेची ओळख करून देण्याची कृपा जशी तू केलीस तशीच प्रत्यक्ष तुझीहि ओळख होईल ही कृपा तूं केव्हा करशील?

## ३२७

आतबाहेर फेऱ्या करण्याच्या श्रमापासून वाचवून आतबाहेरचे सर्व लाभ उपस्थित करण्याच्या कामगिरीनें तुझा लहानसा आकार प्रतिबंधहि आहे आणि मोकळिकहि आहे. पुन्हा त्यात प्रतिबंधाचे वैषम्य नाही आणि मोकळीक म्हणून स्वैरता नाही. इच्छा असेल तर आवरण नाही तर अनावरण अशी त्याची ऐच्छिक युक्ति आहे त्यामुळे त्याची सर्वांना आवश्यकता आहे त्याच्या अभावाने आमची कोंडलेली स्थिति होईल म्हणून तो लहान असला तरी आम्ही त्याच्यापुढे नम्र होतो. आणि तो आम्हाला प्राणवान् बनवितो हे प्रभो ! त्यामुळेच त्यामधला बोध अनुपम ठरला आहे.

## ३२८

तुझी क्षुल्लकता पाहून तुला कोणीच महत्त्व देणार नाहीं. पण तुझ्या ठिकाणी जी अमूल्यता मुद्रित झाली आहे तिला पाहिल्याबरोबर सर्व लोक तुला जपून ठेवतात आणि तुझ्या अदर्शनात मोठी हानि झाली असे मानतात तुझा जगभर संचार होऊ शकतो. आणि सर्व जगातला आशय तुझ्यामुळे सर्वांना ज्ञात होण्याची शक्यता निर्माण झाल्यामुळे तू मूर्तिमंत अंतर्ज्ञान आहेस. त्यामुळे तुझे दर्शन केल्यावाचून आम्हाला आमची काय स्थिति आहे आम्ही कोठे आहोत हेहि कळू शकत नाही तू सर्व विश्वाचा मानदंड असून तुझ्या ठिकाणी अशी क्षुल्लकता का ? हा प्रश्न जेव्हा उपस्थित होतो तेव्हा सर्वसामान्यासाठी क्षुल्लकतेची ती एक अप्रत्यक्ष सोय आहे. तिच्यामागें महान् प्रत्यक्ष उभें आहे आणि त्याचा तें क्षुल्लक प्रतिनिधी आहे हे उत्तर मिळते, आणि त्या क्षुल्लकाच्या रूपाकडे दुर्लक्ष करून आम्हाला बोध मिळतो की बाबा रे ! रूप कसेहि असो त्यामागला गुण हेच परम सत्य आहे ! ते तू ओळख

## ३२९

पेला काठोकाठ भरला होता. तो मी आता पिणार इतक्यात माझा मित्र तेथे आला. आणि मी ते पेय दुसऱ्या पेल्यात ओतून माझ्या मित्राला त्यात सहभागी केला. लगेच आमच्या गोष्टी चालू झाल्या. त्या पेयाचा आणि आमच्या गोष्टीचा काही सबंध नसून ते पेय त्या गोष्टींत आणि त्या गोष्टी त्या पेयात जणू मिसळत होत्या. हास्याचे फवारे त्याबरोबर उसळत होते. माझी मैत्री माझ्या मित्रात आणि त्याची मैत्री माझ्यात ओतप्रोत होत होती. पेय सरले दोन्ही पेले रिकामे झाले. पण आमच्या मैत्रीचे मधुर पेय मुळीच सरले नाही. त्या मैत्रीचे पेले काठोकाठ तसेच भरलेले आहेत ! हे प्रभो ! असेच भक्तिप्रेमाचे काठोकाठ भरलेले पेले तू आमच्यासमोर ठेवशील का? जेणेकरून तू आणि आम्ही अगदी ओतप्रोत होऊन जाऊ !

## ३३०

निर्णयाच्या अनिश्चिततेमुळे अथवा निर्णयाच्या विपरीततेमुळे आणि सुहृज्जनाच्या अभावामुळे अथवा सुहृज्जनाच्या असमर्थतेमुळे जेव्हा घोर अन्याय उपस्थित होतो तेव्हा आपल्या निरपराधित्वाच्या बळावर मनुष्य जोरदार प्रतिकाराला सिद्ध होतो. पण आपण एकटे आहोत ही जाणीव त्याला एका बाजूने निर्बळ करू लागते. अशा बलनिर्बल अवस्थेत त्याची ओढाताण होऊन तो एकदम अंतर्मुख होतो तेथे त्याला तुझी अपार शक्ति प्राप्त होते आणि तो स्वतःचे निरपराधित्व सिद्ध करून हेच सिद्ध करतो की तुझी भक्ति हीच खरी ढाल असून विरुद्ध जगावर वार करण्यासाठी तुझ्या शक्तीची तलवार पूर्णपणे समर्थ आहे !

## ३३१

आधी हे की आधी ते, असा आधीविषयींचा वाद जेव्हा सुरू झाला तेव्हा त्यात भाग न घेता मी तुझी आराधना सुरू केली आणि आधीवाले सर्व मागें पडले तुझी आराधनाच सर्वांच्या आधी तीच मध्ये आणि तीच शेवटी अशी माझी खात्री झाली आधीच आधिव्याधिउपाधींनं ग्रासलेला मी या नवीन ' आधी "च्या विवादात कशाला पडू ? आधी तुझ्या आधीन होणे हेच माझे कर्तव्य नाही काय ?

## ३३२

समुद्रामधले सर्वच मोती मला मिळावे किंवा मिळणे शक्य आहे म्हणून मी समुद्राच्या तळाचा ठाव घेऊ पाहात नसून फक्त काही मोती मिळतील हीच माझी आकांक्षा आहे परंतु मला तुझ्या हृदयसमुद्रातले मोती मिळावे ही मुळीच इच्छा नसून केवळ तुझ्या हृदयप्रांतात कायमचे निमग्न व्हावे म्हणूनच माझी सगळी धडपड चाललेली आहे हे लक्षात घेऊन हे ! कृपासमुद्रा ! तूं मला आपल्या ठिकाणी समावून घे !

## ३३३

मुळात सरोवरात कितीहि लाटा असोत आणि कितीहि कचरा असो, तो शुद्ध करूनच आमच्या मनामध्ये ते जीवन तू भरून देतोस ही गोष्ट खरी परंतु आमच्या मनातहि खळबळ आणि अशुद्धता असल्या-मुळे आम्हाला ते शुद्ध करण्याला तुझी मदत हवी असते व्यक्तिगत सहाय्य कोणाकोणाला देऊ असे तूं म्हणू नकोस. कारण हे प्रभो ! ज्याना अशी तळमळ लागलेली असते असे फारच थोडे असल्यामुळे तुला व्यक्तिगत मदत देण्याला आणि आम्हाला व्यक्तिगत मदत घेण्याला मुळीच हरकत नाही !

## ३३४

माझ्या युक्तिवादाला तोड नाही असे जरी मला भासत असले तरी तू युक्तिवादाला कधीच वश होत नाहीस परतु भक्तिभावाला मात्र ताबडतोब वश होतोस हे कळल्यामुळे हे प्रभो ! माझा सर्व युक्तिवाद नाहीसा करून माझ्या ठिकाणी तुझ्याविषयी अल्पसा तरी भक्तिभाव निर्माण होऊ दे हीच मी प्रार्थना करीत असतो, ती तू केव्हा ऐकशील ?

## ३३५

अतर कापीत कापीत तो अगदी किनाऱ्याजवळ येऊन पोचला परतु अरेरे ! त्याचा पाय मगराने धरला त्याला कोण वाचवू शकेल ? त्याला वाचविण्याला गेलेल्यालाच त्याने वाचविले ! त्याला त्याने मिठी मारली नाही की त्याला आपल्याबरोबर आत ओढले नाही. धन्य त्याची ! तो वाचला असता तर आम्हांला हवाच होता तो आधीच आम्हा सर्वांना हवाहवासा झाला होता ! पण स्वतः न वाचून त्याने आमच्या हृदयग्रथात त्याचे अनासक्तीचे उदाहरण सुवर्णाक्षरानी लिहून ठेवले आहे. ते आम्ही वाचून त्याला आणि आम्हाला सतत वाचवावे हाच त्याच्या बुडण्यातला हेतु होता !

## ३३६

सुकाळाच्या उन्मत्ततेमुळे तुम्ही दुष्काळ ओढवून घेत असतां म्हणून दुष्काळातली नम्रता स्वीकारून एकमेकाना मदत करा. काट-कसरीने रहा. एकदम सर्व खर्चून टाकावयाचे अशी खर्चिक वृत्ति आणि ती ज्यामुळे येते ते दुर्गुण सोडून द्या हा प्रभूचा आवाज ऐकून आम्हाला आश्वासन मिळाले आणि आम्ही आकाशाकडे पाहून त्या प्रभूला हात जोडले.

## ३३७

त्याला आम्ही खाऊ पिऊ घालीत नसू आम्ही आमच्या इथे त्याला कोणताहि आसरा दिला नव्हता. पण तो मात्र रात्रंदिवस आमच्या आजूबाजूला राहून सतत पहारा करीत राही. इतकेच काय पण त्याला मुळीच समजत नसूनहि आमच्या दोन्ही वेळच्या उपासनेत हजर राहून आमच्या उपासनेचाहि तो पहारेकरी बनला होता. अरेरे ! त्या निरपेक्ष सेवामूर्तीवर विषप्रयोग केला गेला. तो तळमळत आपला देह सोडण्यासाठी आमच्या येथे आला आणि क्षणार्धात त्याचा प्राण गेला. त्याची आम्ही मातीची समाधि बांधली. पण त्याने आमच्या हृदयांत कायमची निरपेक्ष सेवेची समाधि निर्माण करून आपली अंतिम क्रियाहि आपली आपणच केली ! आणि तो प्रभूचा प्रेषित ठरला !

## ३३८

सच्चिदानंदाची आभासिक सत्त्व रज तमात्मक छायाहि आम्हाला असज्जडदुःखात टाकते आणि आभासालाच खरा मानून छायेलाच प्रकाश समजू लागतो. ही समजूत केवळ बौद्धिक नसून ती आमच्या रोमरोमांत भिनून गेलेली असल्यामुळे तिला तेथून काढण्यासाठीं अत्यंत कटु वैराग्याचा काढा सतत घेतल्यावांचून काय इलाज आहे ? त्या काढ्याची कटुता काढण्याला हे प्रभो ! आम्हाला तुझ्या भक्तीच्या गोडीशिवाय जगात कोठे दुसरी कोणतीहि वस्तु दिसत नसल्यामुळे आम्ही अगदी काकुळतीने तिचीच मागणी करीत आहोत.

३३९

साधने वापरणे जमत नसल्यामुळे त्याच्या वेड्यावाकड्या हालचालीतच सर्व वेळ घालविल्यामुळे सिद्धीचे अत्यल्प स्वरूपहि आमच्या आटोक्यात आले नाही. आता साधन सचालन प्रयोगांत गेलेल्या काळामुळे सिद्धिमपादनाला जवळ जवळ अवकाशच राहिला नाही. तो अवकाश आम्हाला कोण देणार ? काळ कोणासाठी थाबत नाही आणि कोणावरहि दया करीत नाही हे आम्हाला माहीत आहे. पण देवा ! तूं तर सर्वांसाठी वाट पाहणारा आणि सर्वांवर दया करणारा आहेस ना ? मग मी काळवेळ सोडून तुजकडे आशेने पाहण्याला काय हरकत आहे ?

३४०

एका पात्रातून दुसऱ्या पात्रात जेव्हां रसमीलन होते एका गात्रातून दुसऱ्या गात्रात जेव्हां चैतन्यसचलन होते तेव्हा त्या रसचैतन्याला निराळ्याच रसरगाचा साज चढू लागतो. अशा रीतीने सजत सजत सगळीकडे आपले रसचैतन्य रुजवीत रुजवीत जेव्हा तुझी नटराजमूर्ती नटू लागते तेव्हा पटूं लागते की तू आपल्यातच निमग्न नसून या मर्त्य जीवनात तुलाहि अमरत्वाची नवी नवी गोडी घ्यावीशी वाटत असते. त्यामुळेच एवढ्या विविधतेला तू वाव दिलास आणि त्यातून तू सतत फिरत राहतोस. तुझ्या वीणेच्या तारांवरची ही तुझी नादमाधुरी म्हणू की सर्व रसातल्या सुरस समेलनाची ही तुझी रसमाधुरी म्हणू, की वाऱ्याच्या झुळुकेमुळे फुलाफुलातून झळकणारी ही तुझी गधमाधुरी म्हणू, की बालकाच्या निर्व्याज हास्यलास्यातली ही तुझी रूपमाधुरी म्हणू ? मी म्हणू तरी काय ? आणि अशा रीतीने तुला गणूं तरी कसा ? हे देवा ! मी तुझें आकलन तरी कसे करू ? तुझ्या या अनत समेलनाच्या माधुरीत मला तूं बुडवून टाक आणि तुझ्या साधुरीतीचे सार्थक मला अनुभवूं दे !

## ३४१

वास्तविक तो राजदूत असून त्याला शत्रुदूत मानून सुरुवातीला त्याचा सर्व प्रकारे अपमान करून त्याची अवहेलना करण्याचा प्रयत्न केला तरी त्याचे राजतेज आणि राजदूताचे कार्य यत्किंचितहि हिरमुसले झाले नाही. त्याला जो आत्मराजाचा संदेश द्यावयाचा होता तो त्याने सुस्पष्टपणे सर्वांना ऐकवला आणि केवळ त्याच्या श्रवणानेच ते सर्व निस्तेज झाले. इतकेच काय पण त्या संदेशात कोणतीहि धाकधमकी नसून केवळ सत्याचे मधुर आविष्करण झालेले असून ते ऐकून त्याचे अंतःकरण त्याकडे आकृष्ट झाले. मग वरून वरून जरी त्यांनी शत्रुत्वाचा आव आणला तरी त्यांचें शत्रुत्व आतून निवळून तो तेथून परतला तेव्हाच वास्तविक आत्मराजाचा जय झाला होता आता त्यावर फक्त प्रत्यक्ष जयाचा शिक्का मारायचा राहिला होता ती कालक्रमातली कालांतराची गोष्ट होती. हे प्रभो ! कालक्रमातीत अशा तुझ्या राजदूताचे भाग्य सर्वांनाच कोठून लाभणार ? पण कोणाशीहि बोलताना मला त्याचे अल्प तरी अनुकरण करता येईल आणि त्यात तुझ्या प्रतिनिधित्वाचे अल्प तरी प्रतिबिंब पडेल एवढी माझी लहानशी इच्छा तूं पूर्ण करशील काय ?

## ३४२

मी भेट म्हणून अगदी साध्या चार वस्तु पाठविल्या असल्या तरी त्यात प्रेमाची पाखर घालणाऱ्या मधुर साखरेसारख्या टवटवीत सुगध-युक्त फलाच्या रससेवनाची योजना केली आहे. त्या माझ्या भेटीमधली एकहि वस्तू हरवली जाऊ नये म्हणून त्याना सावधानतेच्या काळजीमध्ये लपेटलेलें असून त्याच्या वाहकाला ती भेट वेळेवर पोचविण्याची ताकीद दिली आहे ज्या गुरुगृहात मी राहिलो होतो त्याना या भेटीने जणु त्याच्याकडे मीच आलों असे वाटेल आणि माझे गुरु स्वतः आनदाने तो एक प्रसाद म्हणून सर्वांना ती भेट वाटून देतील या कल्पनेने मलाहि केवढी प्रसन्नता प्राप्त झाली आहे ! हे प्रभो ! मला तू आजच्याप्रमाणे भेटीच्या वस्तूच्या द्वारे हीच प्रेरणा दे की—

प्रेम द्यावे, प्रेम घ्यावे, प्रेममय हें सर्व व्हावे.

३४३

हा प्रपंच एक कष्टदायक दीर्घ प्रवास असून यांत असलेले लोक ही एक उतारूंची उतारपेठ आहे अशा स्थितीत त्या उतारूमधल्या सद्गुरूला तूं अल्प परिचयाने आपलेसे केलेस आणि सतत त्या विद्येच्या अधिष्ठानाची व्यवस्था करीत राहिलास. त्यासाठी सर्व प्रकारचे मानापमानही सहन केलेस. त्यामुळे कृश परंतु गुरुदास्याने मनात अत्यंत परिपुष्ट असलेल्या तुझ्या विशाल हृदयाने विद्येची भव्य भवने घरबसल्या कळकळीच्या हृदय संदेशाने निर्माण केली. आणि याच कार्यासाठी आपले जीवित आहे ही जाणीव तुझ्या ठिकाणीं साकारली. तेव्हा तुझ्या उदाहरणाने विस्मित झालेल्या लोकांनी तुझे अनुकरण करण्याला सुरुवात केली आणि तुझा हा दिव्य वारसा सर्वांना प्राप्त झाला. या प्रपंचाच्या चिखलांत तुझ्या या कमलवननिर्मितीने अलिप्तता, पवित्रता आणि पावित्र्याचे पाठ आम्हांला सहज मिळू लागले. अशा या गुरुशुश्रूषेतून तूं आम्हांला साक्षात् परमेश्वरभक्तीत प्रविष्ट केलेस. तेव्हा हे शिष्योत्तमा ! तुला आम्ही गुरुहूनहि गुरु समजावे हें क्रमप्राप्तच नव्हे काय ?

## ३४४

अपराध दडनाच्या पापभीरू परपरेने पायाशुद्ध जीवनावर निरपेक्ष सेवेच्या विद्या प्रातात उत्तुंग व्यक्तित्वाची गुरुदीक्षा, कर्तृत्ववान सत्कार्य-कारी मैत्रीची आणि निष्ठावान सेवकाची जोड, अद्‌भुत प्रतिभेच्या मनोमदिरात ध्येयमूर्तींच्या सदेशावर नितान्त श्रद्धा, ही त्रयी जेथे सहज उपलब्ध आहे तेथे कळकळीच्या उत्कट वागीश्वरीचे ईश्वरी देणे का लाभणार नाही ? त्या देण्याचे लेणे बनावे, त्या लेण्यात उपासनेला दढपणाने चालविणाऱ्या सताच्या उत्स्फूर्त वचनाचे परिशीलन व्हावे अशी शतकाशतकात कचितच दिसणारी व्यवस्था सर्वापुढे माडणाऱ्या स्वसुखाविपयी यत्किचितहि अभिलापा नसणाऱ्या हे सज्जनावतरणा ! देवा ! तुला शतशः प्रणाम असोत !

## ३४५

माझ्या मित्रा ! तूं असा नेहमी मागें मागें का राहतोस ? तुझा मागोवा घेण्यासाठी तूं पुढे नको राहायला ? असे आमच्या अपरिपक्क मनाला वाटत असते पण तो पुढे झाल्याने त्याचे कार्य मागें राहील आणि कार्यशून्य असा तोहि काही काळ पुढे दिसला तरी तोहि पुढें राहणे पुढे शक्य होणार नाही त्यालाही जाणीव असल्यामुळे तो कोणालाहि पुढे जाऊ देतो, आणि सर्वांचा पाठिराखा बनतो. हे त्याचे समग्र जीवन आम्ही मागें वळून पाहतो तेव्हाच आमच्या लक्षात येते. मग आमचीहि पुढे पुढे करण्याची ओढ शमून जाते. आणि आम्ही त्याच्या मागें राहण्याच्या रहस्यात सामील होऊन त्याच्याबरोबर मनमुराद हसतो. आणि आमच्यात खेळीमेळीचे मित्रकार्य साकारले जाते ते पुढे पुढे करणाऱ्याना कोठून लाभणार ?

## ३४६

ठिकठिकाणी तुझी मनोहर स्मारके करून कालान्तराने ती विद्रूप होऊन त्याची पडझड व्हावी आणि शेवटी ती जमीनदोस्त होऊन विस्मृतीच्या खोल गर्तेत पुरली जाऊन स्मारकाची मारके बनावी ही दुर्दशा मनाला यत्किंचित्‌हि सहन होत नसल्यामुळे तुझें कोणतेहि स्मारक न करता मानव-मनामध्येच त्याची उभारणी व्हावी, त्यामुळे खिन्नता जाऊन प्रशात प्रसन्नतेची प्रभा प्रत्येक हालचालीत प्रगट होऊन तुझी मानवांच्या ठिकाणी हालती चालती स्मारके व्हावीत ही अभिलाषा कोणाला काल्पनिक आणि अतिदूरची वाटो, परतु जर ती सत्य असेल तर माझ्या मना ! एकदम ऊठ आणि तिच्याच सिद्धीच्या पाठीमागे लाग

## ३४७

कर्म माझे ! मी आता काय करू ?—हताश होऊन एकाने आपले शरीर निराशेने नदीत झोकून दिले पण नदीने त्याला अलगत उचलून धरले. त्या पाण्याच्या मृदु शीतल स्पर्शाने तो शात झाला. दरीत जर पडता तर त्याचा चेदामेदा झाला असता. पण नदीत तो तरला बुडला असता तर मेला असता हे खरे. पण निराशेच्या तीव्रतेत आपणाला तरता येते की नाही हे तरी कोठले भान त्याला ! पण तो तरता येते म्हणून तरला नाही. नदीच्या शात सुखस्पर्शाने तो तरला. त्याचे तरता येणे केवळ एक निमित्त. हे प्रभो ! तुझ्या सुखस्पर्शाने तूं आम्हाला तार. बुडू देऊं नकोस आम्ही तुझ्याच आशेने तुझ्या जीवनात आम्हाला फेकून दिले आहे.

## ३४८

गूढतेच्या गह्वरातून प्रकाशाच्या राजप्रासादातले तुझें आगमन जितके कौतुकास्पद तितकेच अलौकिक ठरून देशोदेशीच्या थोरामध्ये तुझ्या दर्शनाची अहमहमिका सुरू व्हावी परतु तूं मात्र केवळ अतर्दर्शनातच लीन रहावेस. यामुळे तुझी अतर्निष्ठा तर सिद्ध झालीच पण एकनिष्ठाहि प्रतीतीला आली त्या निष्ठेनेच तुझें सर्व जीवन भारले गेले. तेथे दुसरी कसलीहि अभिलाषा राहिली नाही तू मात्र त्या ध्येयमूर्तीची अतश्चेतना बनून सतत सर्वाना ती चेतना वाटीत विहार करू लागलास. त्याने कोणाकोणाला कसकसे आश्वासन मिळाले, त्याने युगयुगाची तृष्णा तू कशी शमविलीस, अगदी सामान्याना मान्यता देऊन त्याना क्षणार्धात आपल्यासारखे भक्त कसे बनविलेस, अनेकाचा भ्रम निरास करून सर्वत्यागाच्या अतर्धान भूमिकेने, सार्वकालिक प्रेममय वैश्विकरूप कसे प्रगटविलेस या तुझ्या सर्व गूढ लीलालालित्यापेक्षा हे करुणावतारा देवा! तुझे मूळ कारुण्यच माझ्या ठायी ठसव. म्हणजे त्या पवित्र गूढगाथेचे माझ्या ठिकाणी सतत मनन होत राहून मी केवळ तुझाच होऊन राहीन!

## ३४९

माझ्यावर आजपर्यंत प्रेम करून, मला वेळोवेळीं लहानमोठी सर्व तऱ्हेची मदत करून, माझ्या सुखदुःखात सहभागी होऊन, सर्वांनी मला सर्व प्रकारे ऋणी केले आहे. मी त्या ऋणातून मुक्त होऊ शकत नाही. मुक्त होऊ इच्छीत नाही ते ऋण वाढत गेले तरी मजवर त्याचा भार नाही. कोणीहि ते ऋण असे मानीत नाही. वास्तविक तो परस्पर-प्रेमाचा परिपाक आहे त्याला मी ऋण म्हटले ही चूक आहे. त्याबद्दल मी क्षमेला पात्र आहे. या प्रेमपरिपाकामुळेच मी या जीवनात निभावलो आहे. आणि यापुढे त्याचाच आसरा आहे. हा आसरा वास्तविक सर्वांच्या रूपाने हे सर्वात्मन्! तुझाच आश्रय आहे. याची मला प्रत्यक्ष प्रतीती तू केव्हा करून देशील?

## ३५०

सर्वांच्या उद्भवस्वरूपाने अविनाशी, सर्वांच्या समावेशनाने साम्यमय, सर्वांच्या अंतिम स्वरूपाने साफल्यमय, सर्वांहून वेगळा म्हणून सर्वोत्तम अशा तुझ्या चतुर्विध स्वरूपात तुझे सर्व रूप प्रतिबिंबित झाल्यामुळे, मी सर्वांची सर्वत्र सेवा करणे ओघप्राप्त होते ती सेवा नाविन्याला साम्य प्राप्त करून देऊन, साम्याला साफल्यात परिपक्व करून, परिपक्व साफल्याला निःसंगत्वात निश्चल करूनच होऊ शकेल. वास्तविक ती मी माझ्याच ठिकाणी केलेली माझीच सेवा ठरेल. अशा रीतीने हे देवा! तू माझीच माझ्याकडून सेवा करवितोस. आणि मातेहून माता बनून म्हणतोस, "तू माझी चिंता करू नकोस, बाळा! तू चांगला राहिलास, शहाणा झालास म्हणजे त्यात मला सर्व काही पावले!" केवढी तुझी थोरवी!

३५१

प्रचड पुरुषार्थ करून, तेथे लालित्याची लीलाहि खेळत रहावी आणि त्याच वेळी दोघाचेहि महाशून्यप्रशमात विलीनीकरण व्हावे ही अपेक्षा आमच्याकडून कोठून पार पडेल ? आम्ही एक गोष्टसुद्धा धड करू शकत नाही. ना धड पुरुषार्थ, ना लालित्य ना प्रशम अशी आमची अर्धवट स्थिति तुला माहीत नाही काय ? मग या त्रिविध पूर्णतेच्या मीलनाची आमच्या ठिकाणी तूं कशी अपेक्षा करतोस ? "भिऊ नका, मी सहाय्याला तयार आहे. तुमचे जें जे काही उणे पडेल ते मी पुरे करीन" असे जर म्हणशील तर देवा ! आम्हाला काही हरकत नाही. आम्ही तुझ्या अपेक्षेची उपेक्षा करणार नाही.

३५२

मी आत्मनिष्ठ राहीन तर माझेंच सर्व होईल माझ्यापासून सर्वांना लाभ होईल, माझ्याकडे सर्व आप्तत्वाने पाहतील, मला सर्व साधनाची प्राप्ति होईल आणि माझ्या निमित्ताने हे प्रभो ! तुझें कर्तृत्व उदयाला येऊन तुझ्या आनदमय लीलेचे अवतारकार्य सर्वत्र दिसू लागेल ही गोष्ट कोण नाकबूल करील ? पण मला आत्मनिष्ठता प्राप्त होणे ही पहिली गोष्ट मी कोठून आणू ? ती मलाच माझ्या ठिकाणी मिळाली पाहिजे ना ? हे परमेश्वरा ! त्याच शोधाचा बोध तू मला करवून देशील याच आशेने मी तुझ्याकडे आलो आहे. माझे सर्व काही तुझ्या हाती आहे !

३५३

बाह्य वृत्तीत प्रवेश करूनहि तिच्या स्वाधीन न होतां तिच्या गुणानी मंडित होऊन तीव्र तपस्येचे असिधारा व्रत तुझ्यावाचून कोणाला पचूं शकेल ? आणि त्यायोगाने म्हणावी ती पूर्वदिशा हे सामर्थ्यहि तुझ्या-वाचून कोणाजवळ असू शकेल ? गरुड पक्ष्याच्या भरारीप्रमाणे अतरा-काशातल्या अगदी वरच्या सीमेला भिडणाऱ्या एकात साधनेचे मुक्तद्वार तू सर्वांसाठी उघडे ठेवले आहेस. पूर्वकल्पनाचे सर्व सस्कार धुवून सर्व साम्याचे साम्य तुझ्या त्या राजमदिरात प्राप्त होऊ शकेल अशी तुझी व्यवस्था आहे. परतु हे योगेश्वरा ! देवा ! मला त्या राजमदिरात प्रवेश करण्याचे सामर्थ्य नाही माझ्या हृदयमंदिरातच तुझे आगमन होईल आणि सर्व साम्याच्या साम्याचे सार मला तुझ्या रूपात दिसेल. हीच एक मला आशा आहे

अरुणाला आणि दंवबिंदूना खुडून हे सकाळच्या सदेशा ! तूं आमच्या अगणात जो रत्नाक्षराचा सडा पाडतोस त्याचा उल्हासमय अर्थ आमच्या डोळ्यात कायमचा प्रतिबिंबित होतो. आमच्या डोळ्यात दंवबिंदूचे सर्व निळे आकाश आणि अरुणाची किंचित् लाली सदैव जी खुलल्लेली असते तीमध्ये एकरूप होत्साता तू आमच्या चित्तात प्रवेश करतोस आणि अधारात आणि खिन्नतेत चाचपणाऱ्या चित्ताला अरुणाचा सौम्य प्रकाश आणि दवबिंदूचा उत्साह तू वारवार वितरित करतोस तुला स्वतःला मर्त्य-लोक मुळीच मानवत नसून आमचे मर्त्य-जीवन स्वर्गमय करावे हाच तुझा आमच्याकडे येण्याचा हेतु असतो. तो हेतु आमच्या ठिकाणी उत्तरोत्तर आधिक्याने प्रगट व्हावा ही आमची आतरिक इच्छा आहे पण त्या परात्पर प्रभूला तूं आणि आम्ही अनर्बाह्य दोन्ही रीतींनी समर्पित होऊं तेव्हाच ती सफल होईल म्हणून तुला आणि आम्हाला आम्ही याच कार्यात योजू इच्छितो आमची खात्री आहे की तुला आमची इच्छा पूर्णपणे पसत पडेल !

## ३५५

स्वयवराच्या वेळी जमलेल्या अनेकांना पहात पहात शेवटी कोणीच पसत नाहीं असा प्रसंग आला तेव्हां माझ्या मनोवृत्तीने सर्वांना नकार दिला. त्यामुळे सर्वांची निराशा झाली, तरी माझी आशा उलट वाढली. कारण तूच अशा तऱ्हेने मला पारख करता येते की नाही याची पारख करून अदृश्य रूपाने उभा आहसे हे मी ओळखले. दिखावटी बाह्य सजावटीने सजलेल्या कोणालाच मी पसत करीत नाही हें पाहून हे निर्मळ सहजस्वरूप प्रभो ! तुला माझ्यापुढे प्रगट व्हावे लागेल. आणि माझी माळ तुझ्या गळ्यात पडेल याविषयीं मला शका राहिली नाही शेवाळ दूर सारल्यावर निर्मळ जीवनाचा लाभ होणारच ते शेवाळ मी दूर सारले आहे. आता तुझ्या निर्मळ जीवनप्रवाहाचे स्नान-पान मला घडेल आणि तुझ्या पदरात पडून मी पवित्र होईन याविषयी मी निःशक आहे.

## ३५६

मानव-मनाला स्तभित करणाऱ्या पुरातनाच्या जटिल गाभीर्यात आम्ही नव्यानी डोकावून पाहिले तेव्हा त्यातून काय घ्यायचे याचा आम्हाला उमज पडेना तरी तो उचच उच आकाशाला भिडणारा अनताचा निर्देश करणारा मनोरा पाहून आमची क्षुद्रता आम्हाला दिसू लागली आणि जेव्हा त्या पुरातनाच्या विजयस्तंभावर प्रकाश प्रस्थापित होऊन त्याचा झोत चोहीकडे टाकला जाऊ लागला तेव्हा जुने-नवे सगळे जाऊन तूंच एक सर्वत्र खेळताना दिसलास लगेच बालकाप्रमाणे आमचे मन प्रफुल्लित झाले ! आता आम्ही तुला विचारतो, आम्हालाहि तू तुझ्या खेळात घेशील का ? आम्हाला चागले खेळवशील ना ?— जर खेळवशील तर जुने सर्व सोने होईल. नवे सर्व हवे होईल ! तुला हे व्हायला हवे ना ?

## ३५७

आधळ्याची डोळसाहून डोळस मूर्ति मी माझ्या डोळ्यासमोर आणतो तेव्हा तो आधळा नसून तो अतर्ध्यानात निमग्न आहे असेच माझें मन मला सागते. मला डोळे असले तरी ते जे काहीं पाहतात त्या पाहण्यात कोणतीहि स्फूर्ति नसल्यामुळे माझ्याहून तोच सत्य पाहणारा आहे, याविषयी शंका राहात नाही अनित्याचे स्फूर्तिशून्य पाहणे आणि नित्य सत्याचे स्फूर्तिप्रद अतर्ध्यान करणे यांत वास्तविक तुलनाच होऊ शकत नाही. त्याची अतुलनीय अतर्दृष्टि त्याला कोठेहि न जाता जी जी प्राप्ति करून देत आहे ती प्राप्ति आम्हाला रात्रदिवस नाना तऱ्हेच्या उलाढाली करूनहि होत नाही हे तर आहेच. पण त्यामुळे आमची उत्तरोत्तर हानि होत आहे. या हानीतून आमचा बचाव तेव्हाच होईल जेव्हा हे प्रभो ! तू आम्हाला अध न करताहि त्याच्यासारखी अतर्दृष्टि देशील.

## ३५८

त्याची जोडी जेव्हा जोडलेली असेल तेव्हा प्रगतीला पार राहावयाचा नाही, आणि जेव्हा ते मोकळे असतील तेव्हा ध्यानीं-मनी नसलेल्या ध्यानाला ते आत्मीयता देत राहतील. हा त्याचा चरितार्थ आमच्या ध्यानात सहजपणे जरी न भरला तरी त्याच्या हालचालीतले पवित्र लालित्य जेव्हा मधुर निनादाचे रूप घेऊन आमच्या कर्णपथावर विहरू लागते तेव्हा आमच्या मनात त्याची दिव्यता कायमची ठसून जाते. त्यानी आपल्या निमित्ताने खरोखर देवदुर्लभ अशा मागल्याच्या मुक्ततेलाच आपली एकनिष्ठता वाहिली आहे यात शका नाहीं ते दोघे कोण ? सत्पुरुषाचे श्रम आणि विश्राम !

३५९

जागृतीलाहि जेव्हा निद्रा येते तेव्हा तिला जाणविणारा तुझा उत्तरोत्तर तीव्र होणारा स्वर प्रेमाच्या माधुर्यात मुरून तीव्रतेच्या दोषाचा लेशहि उरू देत नाही. आणि जागृतीला प्रभातकाळाल्या परम रमणीयतेतच गुतवून ठेवतो. मग ती दवबिंदूंनी न्हालेली जागृति उषःकालाच्या मधुर पेयाचे पान करून कोमल पक्ष्याच्या कलरवाने सतुष्ट होऊन पयः फेनधवल हसमडले क्रीडा करीत असलेल्या, मद-मद लहरीनी ज्यावर चादीची चादर पसरली आहे अशा शुभ्र सरोवरातली पवित्र कमळे खुड लागते. हे देवा! अशी जागृति तू रोज आम्हाला देत असून रोज आम्ही तिचा बिघाड करीत असतो. ही आमची दुर्गति तू केव्हा नष्ट करशील?

## ३६०

तुझ्या घराचा तो मागच्या दाराचा भाग असून आपल्या रमणीयतेने त्याने पुढच्या भागाला सहजच मागें टाकले आहे पुढे जी सतत थोरामोठ्याच्या वर्दळीतली देवघेव चालते आणि कोलाहल होतो त्याचा येथे अल्पहि स्पर्श नाही. येथे निर्मल जीवनाच्या प्राप्तीची सखोल सोपानपरंपरा माडून ठेवलेली आहे येथे परमोच्च विशालतेला स्पर्श करणाऱ्या ऋजुतेला उत्तम आश्रय मिळाला आहे साम्याचा सदेश ऐकविणारी अतिशय कडक पण मखमालीसारखी येथली गुळगुळीत भूमिका सर्वांची गति सुखप्रद करीत असते येथे पौर्णिमेच्या चद्रप्रकाशातल्या गुजगोष्टींना बहर येत असतो. उपासकाच्या ध्यानपूजा प्रदक्षिणेला आणि अर्भकाच्या बाललीलाना येथे भरपूर वाव मिळत असतो. तारकाच्या रूपाने रात्री आणि फळाफुलाच्या रूपाने दिवसा येथे सर्वांचा लोभ वाढतच राहतो. खरोखर देवा ! तुझ्या घरातले हे मागच्या दारचे दृश्य आम्हाला तुझ्या पुढच्या दारी येऊ देत नाही. आम्ही तुझ्याकडे या मागच्या दारानेच येऊ. तूं तुझ्या घराचे पुढचे दार थोरामोठ्यासाठीं खुशाल उघडे ठेव. आम्हा गरीबाना तुझ्याकडे येण्याला हें मागचे दारच बरे आहे !

## ३६१

आम्ही केवळ आमच्यावरून, आमच्या आजूबाजूच्या जगावरूनच तुझी कल्पना करतो. हा एकागीपणाचा आक्षेप आम्हाला या अर्थाने मान्य होत नाही, की, देवा, तुझी अतर्बाह्य सर्वांगी कल्पना आमच्याजवळ नाही हें तर स्पष्टच आहे पण वास्तविक आमच्याजवळ तुझी एकागीहि कल्पना नाही. ती एकागी का होईना अल्पाशाने तरी तुझी कल्पना आमच्यापाशी असावी अशी आमची इच्छा आहे. आम्ही या दृष्टीने खरोखर हे देवा! तुझ्या कल्पनेच्या पलीकडचे आहोत! आणि तू तर आमच्या कल्पनेपलीकडचा आहेसच अशी आपली दोघांची कल्पनातीत अवस्था झाल्यावर मग व्हायचे कसे? म्हणून देवा! आम्हाला तू कसेहि कर, एकागी केलेस तरी हरकत नाही. इतकेच की, वरपागी करू नकोस! हीच आमच्या अतरगीची आजची प्रार्थना आहे!

## ३६२

पुष्कळसा आवेग ओसरल्यानंतरचा प्रशमोपाय हा मदतनीस मित्र ठरून, आवेगाचे शत्रुत्व टळून, सघर्ष नाहीसा होतो. याचे कारण उपेक्षेच्या धैर्याची करुणा आम्हाला प्राप्त होत असते. ती कोण पाठविती हे जरी कळत नाही तरी ती त्याच दयामयाची प्रेरणा असते. हे जर आम्ही लवकरात लवकर ओळखले तर तिच्या पवित्र रसतरगिणीमध्ये नवजीवनाचा लाभ होऊन तीव्र आवेगाच्याहि या दृष्टीने आमच्यावर उपकार झाला असे ठरेल मग त्या दयामय प्रभूच्या उपकाराची गोष्टच काय सागावयाची!

## ३६३

बाहेर राहूनहि अंतर्दृष्टि ठेवणे, बहिर्दृष्टीपासून तिचे सतत रक्षण करणे आणि त्यामधले कसब हस्तगत करणे, अतिशय कठिण असून तू तो नित्याचा स्वभाव बनविलास, सर्वांचा आधारस्तंभ बनलास. स्वतःला सर्वांशी प्रेमरज्जूने बांधून घेतलेस, आणि एकाच प्रबळ क्षेपात आक्रमकाच्या हृदयात धक्का बसावा अशी शक्ति असून तू ल्हान बालकाच्या खेळातले खेळणे होण्यासहि मागेंपुढें पाहिले नाहीस त्यामुळे तुला न ओळखण्याचा भ्रम सर्वत्र सहजच फैलावून जाणे अस्वाभाविक नाही हे प्रभो! मला तो भ्रम कधीहि पडूं नये आणि तुझ्याविषयीच्या समान भावनेत माझें मन सदैव मुरून जावे!

## ३६४

भौतिक वस्तूच्या कोणत्याहि मापात अनुभव बसू शकत नाही. कारण भौतिक वस्तूला अनुभव नाही अनुभव हा भौतिक कोठून असणार? भौतिकतेचे पूर्ण विलयन होईल असा अनुभव आमच्यापाशी नाही. आमचा अनुभव हा स्वपरदुःखाला कारण होतो. तो केवळ स्वतःच्या दुःखाला कारण असता तरी हरकत नव्हती. पण एकदरींत तो सर्व दुःखाला कारण असल्यामुळे तुझ्यापायी हे देवा! सर्व दुःखे आणि भौतिकता परिवर्तन पावून केवळ चैतन्याने उजळून जातील त्या दिवसाची आम्ही वाट पाहात आहोत.

## ३६५

आमच्या शरीरात ज्या ज्या वस्तु आहेत त्या त्या तुझ्या स्वरूपाने समुज्ज्वल होतील आमच्या चित्तात जे जे काहीं चालेल ते ते तुझ्या मधुर चिंतनात घोळलेले असेल आमच्या जीवात जी जी वासना असेल ती ती तुझ्या प्रेरणेने प्रेरित झालेली असेल अशा भावनेने आमच्या जीवनाचे जेव्हा आम्ही निरीक्षण करतो तेव्हां आम्हाला पावलोपावलीं आणि क्षणोक्षणी आमच्या विपरीत स्थितीचे दर्शन होते. आणि आम्ही तुला सोडून कोठे आणि कां चाललो होतो हेहि आमच्या लक्षात येईनासे होते. खरोखर आम्ही ठिकाणावर नव्हतो आम्ही अगदी अप्रबुद्ध वेड्या-प्रमाणेच होतो. यात आम्हाला शंका वाटत नाहीं. आम्ही लज्जेने अगदीं खिन्न होऊन जातो. अशा स्थितीत झाले ते झाले आता कशाला दुःख करतोस हा तुझा आतला आवाज ऐकून आम्हाला जणु आमचा हात धरून तू सावरीत आहेस असा भास होतो. हे प्रभो। आमच्या हेतू-प्रमाणे तूच आमच्याकडून काय ते करवून घे. याशिवाय आम्ही काय सांगणार।

## ३६६

आमच्या सगळ्याची शक्ति ही आमची शक्ति हा भ्रम घालवून तिचे प्रेमभावनेत परिवर्तन करून तिला तुझ्या सेवेत परिपूत करूनहि जेव्हा तिला साफल्याचे दर्शन होऊ लागते, तेव्हा पुन्हा ती आमची शक्ति हा अहंकार नकळत आमच्यात डोकावू लागतो, आणि एका बाजूला अहंकार आणि दुसऱ्या बाजूला साफल्य या दोघांच्या पकडीत आम्ही लुब्धावलेले जाऊं लागतो. अशा स्थितींत तू धावून येतोस आणि रक्षापुरुषाप्रमाणे अहंकार आणि साफल्य दोहोंवरहि तू प्रहार करतोस. आणि लगेच आम्हाला कळते की सर्वत्र तुझीच सर्व शक्ति आणि तुझेंच सर्व साफल्य भरलेले आहे. त्याचे दर्शन करणे एवढेंच आमचे काम आहे।

३६७

तू तुझ्या दिव्य जीवनवस्त्राची घडी अतिशय सुंदर तऱ्हेने घालून ती अतिशय आकर्षक तऱ्हेने मांडून ग्राहकाना प्रेमपूर्वक अगदी गोड बोलून, त्याचे आगत-स्वागत करून त्याना उत्साहाने ती उलगडून दाखविण्याचे तुझें कसब अगदी पराकोटीला पोचलेले असते त्यामुळे कित्येक ग्राहकाना त्या वस्त्राची गरज नसली तरी तुझ्याशी ग्राहक या नात्याने बोलून ते तुझा सहवास प्राप्त करण्याच्या इच्छेने तुझ्याकडे येतात त्याचा उद्देश तू ओळखतोसच. तरी पण तूं त्याचा समादर करून निदान ते दिव्य जीवनवस्त्र पाहतात तरी एवढयावरच खूष होतोस ! तुझ्या सहवासाचा आणि तुझ्या जीवनवस्त्राचा दोहोचा मी ग्राहक आहे. माझें इतकेच म्हणणे आहे की तुझें जीवनवस्त्र आणि तुझा सहवास हे देवा ! तू माझ्यासाठीं अखडित ठेव. मला तुझ्या दिव्य जीवनाच्या आणि तुझ्या दिव्य सहवासाच्या दिव्यतेबरोबर आणि सुंदरतेबरोबर टिकाऊपणाहि पाहिजे !

३६८

अंतःकरणातल्या अंतःकरणात नितान्त शांत अशा गाढ ध्याननिमग्नतेंत जे गढून गेले आहेत तरीहि ज्याची सेवा कार्यातली तल्लीनताहि उत्तरोत्तर तितकीच प्रगाढ बनत जात आहे आणि परम मंगल भव्य भावनेत जे अंतर्बाह्य मुरून गेलेले आहेत, ते जेव्हा परा-कोटीच्या अनासक्तीच्या व्यापकतेंत प्रविष्ट होतात तेव्हा त्यांची भूमिका मोठमोठ्या विचक्षण विचारवेत्त्यांच्या विचारशक्तीपलीकडे गेलेली असते. तिची स्पर्धा करणे किंवा तिला गाठणे कोणत्याहि साधनेला शक्य नसते. त्यांची ती साधनतरंगिणी तुझ्याच अनंत जीवनाच्या महासागराला मिळा-लेली असते. तरीहि त्यांची साधनतरंगिणी तुझ्या जीवनाला एकसारखी मिळतच राहते. त्या मिळत राहणाऱ्या साधनेचे अंशतः तरी अनुसरण आम्हाला करता यावे यासाठी हे प्रभो ! आम्हाला तुझी शक्ती दे, तुझी युक्ती दे, तुझी भक्ती दे, अशी प्रार्थना करीत आहोत.

३६९

आम्हाला काय हवे ते तू देशील पण आम्हाला काय हवे तेंच आम्हाला कळत नाही. मग आम्ही कधी हें मागतो आणि कधी ते मागतो. आमच्या मागण्यात मेळ नसतो. इतकेंच काय पण त्यात परस्परविरोधहि भरलेला असतो. अशा स्थितीत तू आम्हाला केवळ चंचलताच दिलीस तर त्यात तुला दोष कसा देता येईल ? भिन्न भिन्न वस्तुरूपाने आम्ही चंचल होऊन तुझ्याजवळ चंचलताच मागत असतो आणि तीच आम्हाला तू देतोस. त्यामुळे आम्ही अधिकच चंचल होत जातो. त्यामुळे हे प्रभो ! आम्ही तुझ्याजवळ तुझ्याशिवाय जे काही मागूं ते तू आम्हाला मुळीच देऊं नकोस. आम्हाला आधी तू निश्चल कर आणि मग निश्चित आणि निश्चिंत कर ! हेंच आमचे मागणे आहे.

३७०

एकमेकाना साह्य करणे सोडून एकमेकांचा विरोध करण्यात इतकेच काय पण कोणी एकमेकाना साह्य करीत असेल तर तें साह्य तोडून पाडण्यात आमची सर्व शक्ति जर खर्च होऊं लागली तर आम्ही स्वतःच असहाय बनू यात आश्चर्य नाही. पण परम आश्चर्य हें आहे की आम्ही अशा तऱ्हेने असहाय बनलो आहोत, आम्ही असहाय बनत आहोत, हेंहि आमच्या लक्षात येत नाही. दुसऱ्याचे काहीहि असो, निदान आम्हाला स्वतःला साहाय्य मिळावे म्हणून तरी आम्ही एकमेकाना साहाय्य करण्याची परंपरा स्वीकारली पाहिजे. पण इतकी आपल्यापुरती अल्प दृष्टीहि जेथे आम्हाला नाही तेथे परस्पर साहाय्याने तुझेहि साहाय्य आम्हाला मिळेल ही दूरदृष्टी आमच्यापाशी कोठून येणार ? हे प्रभो ! आम्हाला पूर्ण असहाय करूनच जर ही सत्यदृष्टी प्राप्त होणार असेल तर तसे कर पण कसेहि करून आत्म-परहिताच्या आड आम्ही येऊ अशी विरोधी बुद्धि तू आम्हाला कधीहि देऊ नकोस.

३७१

आज आमची जी स्थिति आहे ती जर बाल्यकालापासून असती तर किती बरे झाले असते. आमचा इतका मोठा काल आणि इतकी मोठी शक्ती व्यर्थ गेली नसती असे आम्हाला मधून मधून वाटत असते कालशक्ति आणि कार्यशक्ति फुकट जाऊं नयेच पण आमच्याविषयीच्या योजनेत जे काही योग्य असेल तेच घडत असते या विश्वासात यत्किंचितहि उणीव येणे हे योग्य ठरणार नाही त्यानेच आम्हाला पुरुषार्थाची प्रेरणा दिली आहे. त्या प्रेरणेने लवकरात लवकर त्याला प्राप्त करण्यासाठी आमची कालशक्ति आणि कार्यशक्ति खर्ची पडावी आणि त्यासाठी हे मना ! तू सतत प्रयत्न करावास हीच खूणगाठ तू सतत लक्षात ठेव.

३७२

सध्याकाळी जिकडे तिकडे दिवे लागले आणि आकाशात तारे चमकू लागले म्हणजे वर आणि खाली अधाराच्या पार्श्वभूमीवर रमणीयतेची आरास निर्माण होते आणि मनाला मोठा आनद होतो. परतु हे मना ! ही गोष्ट खरी असली तरी तो आनंद वरखाली त्या दयामय प्रभूची ही विशाल आरती चाललेली आहे या भावनेत जेव्हा मिसळून जाईल तेव्हाच त्याला सत्यस्वरूप येईल. अन्यथा ती केवळ आनदाची छाया असेल. हे लक्षात घेऊन त्या आरतीच्या प्रकाशात तू स्वतःलाहि समुज्ज्वल कर !

३७३

आम्ही जे काही करीत असतो आणि जे जे चिंतीत असतो ते ते सर्व परस्परापासून अगदी वेगळे पडले नाही परस्परावर त्या परस्पराचा परिणाम असला आणि व्यवहारामुळे त्यात एकसूत्रतेचा काही आभास असला तरी निश्चित गोष्ट आहे की त्यामध्ये खऱ्या अखड एकसूत्रतेचा धागा न सापडल्यामुळे आमच्यात सर्व विस्कळितपणा माजून गेलेला असतो. तो घालविण्यासाठीं अनेक चागल्या ध्येयाचे एकसूत्र जरी आम्ही त्यात गोवण्याचा प्रयत्न केला तरी ती कच्च्या धाग्याची एकसूत्रता कशी टिकणार? म्हणून हे दयामय प्रभो ! तुझ्याच सुवर्णमय सूत्रात तू आमच्या सर्व क्रिया आणि चितन गोवून टाक आणि आम्हाला आपलेसे कर.

## ३७४

सर्वोच्च स्थानी मस्तक त्याखाली दोन हात आणि सर्वात खाली पाय अशा रचनेत तू आम्हाला रचलेस तेव्हांच, तूं सर्वोच्च स्थानी आहेस हे जाणून तुझ्या सर्वोच्च चिंतनाने आम्ही आमचे मस्तक तुला अर्पण करावे, तुझ्या दिव्य सेवाकार्यांत भाग घेऊन दोन्ही हात तुझ्यापुढे जोडावा आणि सर्वात जे खाली असतील अशांचीहि सतत सेवा करणारे जे संतसज्जन त्यांच्याकडे सतत जात राहून त्यांचे पाय धरून तुझ्या प्रदक्षिणा कराव्या हे जरी सहज नसले तरी आम्ही समजू शकलो. परंतु आमच्या अंतर्भागी हृदय निर्माण करून त्यात तूं प्रविष्ट झालास हे आमच्या मुळीच लक्षात आले नाही. त्याची आम्हाला स्पष्ट जाणीव होईल आणि आमच्या हृदयात तुझ्या समावेशनाप्रमाणे आम्हीहि तुझ्या हृदयात समाविष्ट होऊ तीच विद्या हे प्रभो ! आम्हाला तूं शिकव.

## ३७५

अंतर्भागी सर्वांचे केंद्रीकरण करून, सर्वांना आपल्यामध्ये एकत्र करूनहि ते सर्व परस्परविरुद्ध दिशेने फाकले तरी त्यांची पुन्हा आपल्या आत्मीय विशालतेत मिळणी करण्याची तुझी दुहेरी प्रेममय सुदर्शनरीति केवळ तुझीच ! हे प्रभो ! तिचे आंशिक तरी आकलन आम्हाला करवून देशील काय ?

## ३७६

आम्ही त्याचेच बनलेलो असल्यामुळे त्याच्यापलीकडे जाण्याने ते आमचे साधन आणि त्यात राहण्याने ते आमचे बंधन बनते पण आम्ही त्याच्या पलीकडे जाण्याचे किंवा त्यात राहण्याचे कोणतेहि बंधन स्वीकारले नसल्यामुळे खरोखर ते आमच्यासाठी साधनाचेहि साधन बनले आहे. ही त्या प्रभूची आमच्यावरची परम कृपा आहे !

३७७

वारवार काढून टाकून पूर्ण शेष आणि अपूर्ण शेष किती किंवा वारवार जमा करून पूर्ण वाढ किंवा अपूर्ण वाढ किती याची मोजदाद कशाविषयी चाललेली आहे यावर तुझी पारख होणार आहे। याचे तुला भान हवे असेल तर अगणित अशा प्रभूचे तू चिंतन केल्याशिवाय राहूं नकोस त्यानेच तुझें हे गणित सुटेल।

३७८

अथाग शांतिसागराच्या तळाशी अवगाहन केलेल्या अत्यंत निगूढ भूमिकेवर परमानंदाचा फुलोरा चढावा त्याप्रमाणे सौम्यतेच्या शुभ्र वर्णाने चमकणारे सौंदर्य, आणि परममंगलतेचा अंतर्नाद प्रगट होईल अशा अनेक वलयप्रणालिकांनी विभूषिलेला विशिष्ट आकार पाहिल्याबरोबर तूं मूर्तिमंत निर्मळ सरळ प्रेमळ साधुहृदयच हस्तगत केलेस याविषयी शंका राहात आणि तसे आमचेहि हृदय बनावे हाच त्यातलातुझा उद्देश आहे याविषयीहि कोणताच संशय उरत नाही. इतकी आमची दुहेरी निःशंक भूमिका तयार केल्यानंतर आता आम्ही पुढच्या कार्याला लागू. त्यात तुझी मदत मिळेल याविषयीहि आम्हाला संशय नसल्यामुळे हे प्रभो! तुझे तिहेरी निःशंक स्वरूप आमच्या डोळ्यासमोरून ढळणार नाही।

३७९

अकस्मात् चांदीच्या ताराच्या धारांनी विशालतेची सघनत्वाची गुंफण करून मनोहरतेचे मखमली महावस्त्र विणण्याला यत्किंचितहि वेळ लागत नाही या तुझ्या कारागिरीचे अनुकरण तर सोडाच पण तिची अल्पशी कल्पनाहि कोणाला येऊं शकत नाही ही आमच्या डोळ्यावर घातलेली झांपड नव्हे किंवा आम्हांला आणलेली भूल नव्हे ही सर्वसमर्थतेची सर्वहितकारी जादू तुझ्यापाशी केव्हाहि हात जोडून उभीच असते आम्हाला ती प्राप्त होणे शक्यच नाही पण हे प्रभो ! आमची अशी वेडी आशा आहे की आमच्याकडून आत्मपरहिताच्या स्वरूपात तिचे थोडे तरी अनुकरण करविण्यांत तुझी सर्वसमर्थता असमर्थ ठरणार नाही !

३८०

अखिल ब्रह्मांडाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या मनोहर मंडलमय पिंडाकाराला दृढशक्तीने धारण करून, भयंकर उद्ध्वस्ततेने विनाश करणाऱ्या भयंकर आसुरत्वाचा, भयंकर उद्ध्वस्ततेनेच विनाश करून, पुन्हा त्याला लीलेने पेलून धरण्यात जी ऐश्वर्यशोभा तुझ्या ठिकाणी प्रतीतीला येते, तिला कोठेहि तुलना नाही. तिच्यामुळे विश्वाला निर्भयतेचे गंभीर आश्वासन मिळते, आणि प्रत्येकाला त्या आश्वासनाच्या छत्रछायेत नवजीवनाच्या नवरचनेचा उल्हास प्राप्त होतो हे प्रभो ! त्या आनंदोत्सवात आम्हालाहि सामील होता येईल या कल्पनेनेच आम्ही अगदी भारावून गेलो आहोत !

## ३८१

हे माझ्या मना ! सत्कार्याचे सौख्य केवळ सत्कार्यानेच लाभत नाही. अगदी अगाअगात रोमारोमात ते मुरून जाऊन त्याचा उद्रेक जेव्हा ओसडून बाहेर पडू लागतो तेव्हा त्याच्या सौख्याची माधुरी अंतःकरणात प्रतीत होत असते. इतकेच काय पण सरोवरात कमळे फुलली म्हणजे त्याचा सुगध ज्याप्रमाणे दशदिशाना पसरून जातो त्याप्रमाणे सत्कार्याचे सौख्य सर्वत्र पसरून जाते तेव्हाच ते सत्कार्य. अन्यथा ते असत्कार्य नव्हे एवढेंच समज.

## ३८२

हे प्रभो ! तूं आमच्या अपेक्षेची उपेक्षा करीत नाहीस इतकेच काय पण आमच्या अपेक्षेकडे अधिकात अधिक लक्ष देऊन तिच्यापेक्षा अनतपटीने फलनिष्पत्तीचे भाग्य तू आम्हावर उधळीत असतोस ! हे समजण्यात आमच्या दैन्याचा ललाटलेख नेहमी आडवा येत असतो तेव्हा तो पुसून टाकून आधी आमची बुद्धि तू शुद्ध कर. तेव्हाच आमच्यावर तुझ्या देणग्याचा वर्षाव होत आहे हे आम्हाला कळेल आणि आमचे अतरग तुझ्याच प्रेमरंगाने रगेल !

## ३८३

माझ्या महत्त्वाची माहिती देताना मला आनद होत असतो. पण मला मुळीच कळत नाही की महत्त्वाची माहिती ही मुळीच महत्त्वाची नसून माझा आनंदच महत्त्वाचा आहे. त्या आनदाची जेव्हा माझी मलाच मी माहिती देऊ लागेन तेव्हा आनंदालाहि आनद प्राप्त होईल. म्हणून माझ्या मना ! स्वतःच्या महत्त्वाची माहिती तू कोणालाहि देऊ नकोस कारण ती मुळीच महत्त्वाची नाही. आनदच महत्त्वाचा आहे. त्याचीच तूं देवघेव कर !

## ३८४

आमची प्रार्थना सफळ झाल्यानंतर आमची प्रार्थना सपली. त्यामुळे ती पूर्ण निष्फळ ठरली. त्यामुळे हे प्रभो! सफळतेनंतरची सफळ प्रार्थना आमच्या अतःकरणात तू कायमची ठसव!

## ३८५

कायमचे दर्शन होईल तर ते स्थगित होईल कधीच दर्शन होणार नाही तरी तेहि स्थगितच ठरेल. म्हणून कधी कधी होणारे दर्शन हेच तुझ्या दर्शनाचे आमचे साधन आहे.

## ३८६

तू आमच्या अतःकरणात अविरत कार्यरतीची प्रेरणा देऊन आमचे वरवरचे आणि आत भिनलेले दोन्ही दोष निःशेप निवारण करण्याचे आणि सदैव सर्वोच्च ऊर्ध्वगामित्वाचे व्रत-परिपालन करीत असतोस त्यामुळे तुझ्या अदृश्य स्मृतीच्या अवशेपालाहि पवित्रतेने वरले आहे ज्या तुझ्या स्मृतीला एवढे पावित्र्य आले आहे त्या तुला पवित्रतेची पवित्रताच म्हणणे युक्त ठरेल. आमच्या सर्व जीवनावर तिचीच प्रेमळ नजर सतत राहील आणि आमच्या अतःकरणात तिचाच प्रकाश निर्विघ्नपणे तेवत राहील हीच तुला आमची विनति आहे.

## ३८७

आमच्यावरच्या दृश्य आणि अदृश्य परिणामांच्या परंपरेला पार नाहीं ही गोष्ट जरी खरी मानली तरी तिच्या वैपुल्यापेक्षां परिणामरहित अशा तिच्या मूलाधिष्ठानाचें अनंत वैपुल्य पाहतां या परिणाम परंपरेचा आमच्यावर अगदींच अल्प परिणाम आहे ही गोष्ट त्याहूनहि अधिक खरी आहे. ही जाणीव तूं देशील तर आमचें मुख्य लक्ष त्या मूलाधिष्ठानावरच केंद्रित होऊन विकेंद्रित परिणामपरंपरा म्हणजे तुझें एक मनोरंजक लीलाचरित्रच ठरेल कीं ज्यामध्यें आमच्यासाठीं ग्रहण आणि त्यागाचा प्रश्नच उरणार नाहीं !

## ३८८

नितान्त मधुर आणि नितान्त तन्मय अशा भिन्न भिन्न भूमिकांच्या उपासनांच्या परिवर्तनानें सीमिततेची जडता मोडली जाते— आणि अंतश्चिंतनाच्या असंख्य पैलूंनीं शोभायमान झालेला जीवनप्रवाह स्वाधीनतेनें आणि मोकळेपणानें वाहूं लागतो. त्यात पूर्वप्रवाह समाविष्ट होऊन वर्तमान-प्रवाहाला गति येते आणि भविष्याची दिव्य प्रभा अगोदरच फाकूं लागते. तेणेंकरून सर्वांच्या आंत सार भरलेलें आहे कीं तें सर्वांच्या बाहेर आहे अथवा तें सर्वांत भरलेलें आहे या प्रश्नाचें निराकरण होऊन आपणच सारभूत तत्त्व आहोंत हेंच साराचें सार अंतःकरणांत ठसतें. अशा या दिव्य निःशब्द उपासनेची कल्पना शब्दांनीं कशी देतां येईल ? ती कल्पना करून तरी तूं काय करणार ? हे माझ्या जीवा ! तूं प्रत्यक्ष अनुभवच घेऊन पाहा. म्हणजे ती सार्वभौम उपासना आपलें सर्व अंतरंगच तुला समर्पण करील !

## ३८९

अतरग आणि बहिरंग हा स्थानभेद नसून तो महत्त्वभेद आहे. त्यामुळे आमचा नेहमीं घोटाळा होत असतो. शुभ्र मिठाला साखर किंवा शुभ्र साखरेला मीठ अथवा स्फटिकाला बर्फ आणि बर्फाला स्फटिक समजण्याचा जसा भ्रम होतो तसा या दोहोंविषयी आमच्या मनात नेहमी भ्रम निर्माण होतो. आणि आम्ही अंतरंग समजून पुष्कळ वेळां क्षुल्लकतेचेच ग्रहण करतो यासाठी महत्त्वाचे महत्त्व कळणे हीच महत्त्वाची गोष्ट आहे हे महत्त्वाचेहि महत्त्व असणाऱ्या महान् परमेश्वरा ! तूच आम्हाला ते आणि तुझें महत्त्व समजून दे !

## ३९०

माझ्याविषयीच्या अत्यत हळुवार प्रेमाने येऊन आकाश माझ्या हातात पवित्र पात्र बनून त्यांतून माझ्या चिरतृषित सुकलेल्या कठात अमृतपान करविण्यासाठी उत्कंठित झाले. परतु अरेरे ! ते मी ओळखले नाही. त्याला मी एक लहानशी रिकामी वाटी समजून केव्हाच बाजूला भिरकावून दिले तिच्या करुण निनादाने माझ्या लक्षात आले की, मी केवढी मोठी सधी गमावली आहे ! मी केवढा अपराध केला आहे ! साध्या वस्तूच्या साध्या स्वरूपाने फसून मी महानतेचा केवढा मोठा अपमान केला आहे ! तेव्हापासून केवळ वाटीच नव्हे सर्वच पात्रे मी काळजीपूर्वक आणि समानपूर्वक वापरतों आणि त्यामुळे माझी अपात्रता घालवीत असतो !

## ३९१

माझ्या असमर्थ डोळ्यांनी जेव्हा मी समर्थ वैविध्यलीलेकडे पाहतो तेव्हा जे सुख होते ते थोडा वेळ माझी असमर्थता विसरल्यामुळे होत असते हे मी विसरल्यामुळे मला ते सुख आणि ती समर्थता स्वतःमध्ये कायमची मिळवून घेता येत नाही. ती खुबी मला त्या लीलेकडून मिळविण्याची आशाच नाही ती मला प्राप्त करून देणे हे सर्वसमर्थ परमेश्वरा! तुझा तर हातचा मळ आहे तुला तर ती एक सहज लीला आहे! तीच तुझी सर्वसमर्थ लीला मी पाहू इच्छितो जेणेकरून माझ्या असमर्थ डोळ्यांचे पारणे फिटेल! मी ज्या ज्या वस्तूंकडे पाहतो त्या त्या वस्तूत गुतून जातो. त्यामुळे मी एका बाजूने धड वस्तुमयहि बनत नाही आणि दुसऱ्या बाजूने धड माझाहि मी राहात नाही अशा रीतीने मीच मला हरवल्याच्या भकास पोकळीत सापडतो. हे सर्वसमर्थ परमेश्वरा! तू मला या पोकळीतून मोकळा कर आणि सच्चिदानदघन अशा तुझ्या सुदर स्वस्वरूपात मिळवून घे!

## ३९२

तू जुने घर सोडलेस पण मोडले नाही ते ज्याना हवे त्याना ते नवेच ठरेल ही तुझी दृष्टि सृष्टीचे गूढ रहस्य उकलणारी ठरली यात शका नाही. जुने हे जुने नव्हे आणि नवे हे नवे नव्हे. जुन्या–नव्याच्या सापेक्षतेने आम्हाला जुन्यानव्यापलीकडची निरपेक्षता प्राप्त व्हावी हाच तुझा जुने सोडण्यात आणि नवे जोडण्यात हेतू होता! तो आम्हाला कळल्याबरोबर तुझी सनातन आणि नित्यनूतन मनोहर मूर्ति आम्ही अतिशय प्रेमभराने निहाळू लागलो. देवा! आता आमची दृष्टि तेथेच स्थिर कर आणि जुन्या नव्यापलीकडचा निरपेक्ष परमार्थ आमच्या ठिकाणी ठसव.

## ३९३

बालबुद्धीने बाह्य शोभेच्या लोभात पडून आम्ही अन्य वस्तूच्या प्रदर्शनातच गढून जातो आणि तुझी अनन्यता तर सोडाच तुझे महत्त्व नष्ट करून तुला आम्ही गौणत्वात टाकतो आणि यामध्ये आमची अहमहमिका इतकी पराकाष्ठेला जाते की तुझ्यासमोरच आम्ही आमचे महत्त्व प्रस्थापू लागतो. तेव्हा स्वाभाविकच तुला हसू येते. पण आमच्या अहतेमुळे परिणामी आम्ही मात्र रडूं लागतो. पण त्या परिणामानेहि सावध न होता आमच्या अहकारी योजना अतिशय त्वेषाने पुन्हा सुरू होतात. त्या योजनाना कायमच्या नाही तरी निदान काही काळ तरी आळा बसावा म्हणूनच तुझ्या आवाहनाबरोबर तुझे विसर्जन तूंच आम्हाला दाखवून आमच्यावर केवढी कृपा केली आहेस ते आमचे आम्ही जाणूं शकतो. हे प्रभो! ही तुझी व्यवस्था कशीही असो, तुझ्या विसर्जनाबरोबर आमच्या अहकाराच्या विसर्जनाची व्यवस्था तू कधी करशील ?

## ३९४

जागृत काय करावयाचे आणि निद्रित काय करावयाचे यामबधीचा विवेक जेव्हा आम्हाला प्राप्त होईल तेव्हा योग्य वस्तूच्या वैपुल्याची आणि अयोग्य वस्तूच्या क्षीणतेची सहज सृष्टि आमच्या हस्तगत होईल त्यामुळे आम्ही लहानाना अभयप्रद आणि मोठ्याना उत्तरोत्तर सतोषविणारे ठरू. तेव्हा सौजन्याने भरलेली अपूर्वता कधीहि न मावळणारी ठरून स्वतंत्रतेने आमचे भिन्नभिन्न तऱ्हेचे अतर तुटून एकात्मतेच्या भाषेनेच आमचे व्यवहार सर्वांना उपकारक ठरतील. यासाठी आमच्या तीव्र इच्छेने आम्हाला साहाय्य केले पाहिजे त्याप्रमाणे मुख्य म्हणजे सर्वांचे आणि सर्वरूप प्रभूचे साहाय्य आम्ही प्राप्त केले पाहिजे!

## ३९५

एवढया दुरून तुझ्या आशेने आम्ही आलों, एवढया कष्टानें तुझ्यासाठीं आम्ही आलो, एवढया सगळ्याना सोडून तुझ्यापायी आम्ही आलों, एवढयावर जर तुझें समाधान होत नसेल तर आम्ही काय केलें म्हणजे समाधान होईल ? हे तर आम्हाला कळले पाहिजे ? तुला समाधान देणारें जर आमच्यापाशी काहीच नसेल तर निदान आमच्या समाधानासाठी तरी तुझी कृपा आमच्यावर का होऊं नये ? सपन्नाने असपन्नावर कृपा करणे क्रमप्राप्त नाही काय ? या विचाराने आमचे चित्त भ्रमण पावत आहे त्या चित्ताला हे प्रभो ! तुझ्याशिवाय कोण थारा देईल ?

## ३९६

तुझ्या नामरूपगुणाच्या अपारतेने आणि आपल्या अत्यत अपुरेपणाने जो मुळीच भाबावला नाही आणि अत्यत निर्भयतेने सरळ तुझ्याकडेच आला तोच एक तुझ्या खऱ्या कसोटीचे समुज्ज्वल सुवर्ण ठरून तो आकाशाहूनहि विशाल अशा तुझ्या यज्ञाला ललामभूत झाला. त्याचे उदाहरण आम्हाला उपयोगी आहेहि आणि नाहीहि अशी आमची द्विधा स्थिति आहे. त्याच्या उदाहरणाने त्याच्याप्रमाणे बनावे पण तो कोणाचेहि उदाहरण पुढें ठेवून बनला नाही आणि आमची तेवढी शक्तिहि नाही. बरे, ते उदाहरण सोडून द्यावे तर अफाट समुद्रात केवळ एकट्याने गटगळ्या खाण्याचा प्रसंग आमच्यावर येणार ! तथापि या द्विधा अवस्थेत आम्हाला एकच आशा आहे की त्याच्याविषयीच्या तुझ्या नितान्त प्रेमभावनेमुळे त्याचे आम्ही धडपडत का होईना थोडेसे तरी अनुसरण करीत आहोत हें पाहूनच तूं कदाचित् आमच्यावर सतुष्ट होशील !

३९७

"घटा झाली खेळ संपला. आता एक क्षणहि वेळ नाही, चला." दुसरा म्हणतो, "अजून थोडा वेळ आहे खेळ थोडा खेळून घेऊ. थाबा !" मी कोणाचे ऐकू ? थोड्या खेळाच्या लोभाने खेळ पुढें फार वेळ तर चालविता येणार नाही. मग आताच का तो सोडू नये ? तो चालविला तर त्याची थोडा वेळ तरी गोडी घेता येईल ती का गमवावी ? मी कोणती गोष्ट करू ?— "मी ज्या गोडीने खेळ खेळलो आता त्याच गोडीने मी तो सोडावा. कष्टाने नव्हे. म्हणजे मला घरसोडीची द्विधा स्थिति प्रासणार नाही आणि मीच त्या अपार गोडीची गोडी बनेन ! हे लीलामय प्रभो ! तुझें हे मार्गदर्शन कोणाला पटणार नाही ?"

३९८

सुखसोयीच्या पाठीमागें लागून अनेक सुखसोयी प्राप्त केल्या तरी त्यात आम्हांला समाधान वाटत नाही, याचे कारण मिळविलेल्या सुखसोयीत अधिक भर घालण्याचा आमचा लोभ वाढला आहे हें खरे नसून सुखसोयीमध्ये जी स्वगत उणीव आहे तीमुळे सुखसोयीनीं समाधान न होता उलट असमाधानच वाढत आहे. म्हणून कितीहि उणीवा असल्या तरी त्या उणीवाना मागें सारून खरे सुख देण्याचे तुझें अद्वितीय सामर्थ्य आमच्या प्रत्ययाला येऊ दे आमच्या मनाची ही नेहमीची रुखरुख जाऊं दे आणि हे प्रभो ! समाधानाचे समाधान तुझ्याच ठायी आहे हें आम्हाला पटू दे !

३९९

ज्याला अनिष्ट म्हणून आम्ही टाळू पाहतो तो त्या टाळण्यानेच आमच्या समोर येऊन उभा राहील हे आम्हाला निश्चित माहीत असल्या-मुळे त्याला आम्ही न टाळता सरळ पुढें येऊ देऊन तुझ्यासमोर उभा करू, जेणेकरून तू त्याचे अनिष्टत्व घालवून त्याचे आमच्या अत्यंत इष्टमित्रात रूपातर करशील. हे प्रभो ! त्यामुळे आम्हाला तुझे सहजच सख्यत्व लाभेल !

४००

भौतिक शक्तीची पराकष्ठा तिच्या सूक्ष्मतेच्या चरम सीमेला गाठून, नैतिक शक्तीची पराकाष्ठा आत्मौपम्याच्या सूक्ष्मतर चरम सीमेला गाठून आणि आत्मिक शक्तीची पराकाष्ठा ईश्वरशरणतेच्या सर्वात सूक्ष्म चरम सीमेला गाठून प्राप्त होत असल्यामुळे तिन्ही प्रकारच्या स्थूलतेतून मन काढून ते उत्तरोत्तर सूक्ष्मात वळविल्याशिवाय गति नाही. पण उत्तरोत्तर सूक्ष्मात मन कसे वळवावे हा प्रश्न पुढे उभा राहतो. त्याचे निराकरण कोण करणार ? अर्थात् स्थूलाहून स्थूल आणि सूक्ष्माहूनहि सूक्ष्म प्रभूच त्याचे निराकरण करूं शकेल. कारण खरोखर तोच सर्व उत्तराचेहि सर्वोत्तम उत्तर आहे.

## ४०१

अनत अव्यक्ताने व्यक्त होण्यासाठी बहुविधतेच्या अनेक प्रकारांनी वारवार प्रयत्न करूनहि आपले प्रगटीकरण करण्यात जेव्हा ते असफल ठरले तेव्हा तुला अतिशय हसू आले ते हास्य विशाल समुद्राच्या लहरीलहरीवर फेसाळून, फुलाफुलातून फुलून, ताऱ्याताऱ्यातून खुलून, झाडाझाडातून फळून, किरणाकिरणातून रगून प्रगट झालेले जेव्हा आम्ही पाहिले तेव्हा आमच्या आत आणि बाहेरहि त्या हास्याची छटा पसरली. तिने आमचा आमचेपणाच सर्व नष्ट करून आम्हीहि वेड्यासारखे हसतच राहिलो ! तेणेकरून निश्चित ठरले की हे प्रभो ! कारणाचे कारण असलेल्या तुझी आम्ही अकारण लाडकी बालके आहोत !

## ४०२

तुझ्या प्रेमळ आप्तत्वाच्या प्रत्येक वर्तुळाच्या परस्परमर्यादेच्या निर्माण झालेल्या जाळ्या मधमाशाच्या पोळ्याप्रमाणे एकत्रित झालेल्या गुणगायनाच्या सगीतशाळाच ठरतात ! त्यातले विविध गायन ऐकून जेव्हा आम्ही ते शिकू लागतो तेव्हा आमच्या मुखातून असख्य वाद्याच्या मधुर सवेदनाचे तुझे समाधानाचे सूर निघू लागतात. परतु हे प्रभो ! तेवढयाने आमचे समाधान होत नाही. आम्हाला तू तुझ्या मुखातल्या गायनाचा मुक्तस्वर बनवशील तेव्हाच आमचे समाधान होईल !

## ४०३

निश्चित होऊन जेव्हा आम्ही चिंतनाच्या प्रातात प्रवेश केला तेव्हां सगळे चिंतनच सरून गेले. आणि आमचेच चितन सुरू झाले. त्या चिंतनात चित्त इतके मुरून गेले की तेहि चितन सुटले. तेव्हा चित्त तेथून उठले आणि सरळ तुझ्या पायाशी येऊन बसले. तेथे मग ते चित्त स्वतःच सरून केवळ तुझे पायच उरले ! तुझ्या पायाचेहि चिंतन तू आम्हांला करू देत नाहीस, याला आम्ही कोणता उपाय करणार ? एकच उपाय आहे, तो तरी आम्हाला साधूं दे. तो म्हणजे आम्हीच तुझे पाय बनणे !

## ४०४

अत्यंत उत्कट प्रेममय ध्यानामुळे माधुर्य उत्तरोत्तर वाढत जाऊन आम्हाला न कळत साम्यावस्थान सिद्ध झाले. आणि आम्हाला शोधीत शोधीत सहजच ज्ञानप्रभेचे बोलके बोधमय सौख्य अखड आमच्या ठिकाणी निवास करू लागले हे प्रभो ! या अननुभूत अनुभवात तुझी सर्वांगसुदर पावले स्पष्टपणे उमटल्यामुळे आम्हाला मागण्याजोगे तू काहीच ठेवले नाहीस !

## ४०५

देवा ! तुझ्या ठिकाणी मागल्य नुसते ओसडून गेले आहे. आणि तुझ्या भोवतीच्या ज्ञानप्रभेला भावमयतेने उजाळा आणला आहे तुझी सर्वांगें इद्रियातीततेने विभूषित केली असून तुझ्या आत्मसुखाच्या वैपुल्याने विशालतेला घनदाट बनविले आहे हें तुझे वर्णन ऐकून आमचे भावचक्षु ज्ञानचक्षूना मागें सारून तुला न पाहताच त्वद्रूप बनले आहेत. ती त्वद्रूपता लवकरात लवकर तुझ्या सद्रूपात मिसळून टाक !

## ४०६

सर्व वैश्विक निधान आमचेच आहे हें विधान काल्पनिक भासले तरी आतून आम्ही विश्वमय असल्यामुळे ते खरोखर काल्पनातीत सत्य आहे यात शका नाही. त्यामुळेच बाह्यतः आमचाच डागोरा पिटला जाण्याची, आमच्याच मालकीची, आमच्याच भोगैश्वर्याची जी ऊर्मि आमच्या प्रत्येकात कळत न कळत खेळत असते ती एक त्या परम सत्याची उलटी पडलेली लहानशी छाया आहे. अरेरे ! तिच्या मागें लागण्यात आमची कित्येकाची किनी तरी शक्ती आजपर्यंत खर्ची पडलेली आहे तिच्या पायी किती तरी रणकदने माजलेली आहेत. तिच्यामुळे सौजन्याची सहृदयता पोळून निघाली आहे. आणि दैन्याच्या खाईत आम्ही आम्हाला लोटून घेतले आहे ती खाई आम्हाला खात आहे. आतां घाई करून तुझ्यापायी लोटागण घातले तरच धडगत आहे. नाही तर व्यर्थ धडपडीत आमचे धड पडल्याशिवाय राहणार नाही. हे परमदयाळा परमेश्वरा ! आमची ही आर्त हाक ऐकून तू धावून ये आणि आम्हाला उचलून आपल्या हृदयाशीं धर !

## ४०७

त्या माउलीच्या शीतल छत्रछायेमुळे भयानक ससाराची सर्व भीषण तप्तता दूर झाली त्यामुळे कोणत्याहि अवस्थेत आम्ही तिला सोडू शकत नाही अहो ! तिने आमच्यासाठी काय काय केले ते आम्ही कसे सागू शकू ? तिची सर्वपोषणाची ती मूळपीठिका, तिच्या प्रसादाचे ते दिव्य तेजोवलय, तिच्या विशालतेच्या सक्षेपाची ती मोहिनी, तिच्या त्या प्रत्यक्ष हस्तक्षेपाची हळुवार प्रेरणा, तिची ती गगेसारखी पवित्रतेची साठवण ! आम्ही कशाकशाची आठवण करावी ? हे जगन्माते ! दुसऱ्या कोणाचे काही असो, आम्हाला तरी तुझा महिमा सागताच येणार नाही ! तो केवळ शब्दातीत आहे !

## ४०८

आशय एकच असून व्यक्त करण्याच्या अनेक वर्णरीति म्हणजेच भिन्न भिन्न भाषा होत. त्या सर्वातला आशय आणि तोहि शुभाशय हीच परमेश्वराची खरी भाषा आहे ती भाषा मला प्रथम शिकली पाहिजे. हे परमेश्वरा ! ती तूं आम्हाला मातृभाषेंतूनच शिकवूं शकतोस. म्हणूनच आम्ही मातृभाषेला तुझ्या भाषेचा संकेत ठरवून तिच्यावर तुझी भाषा अंकित करण्याचा प्रयत्न करूं. त्या प्रयत्नात तूं आम्हाला यश दे. तुझ्या शुभाशयाची भाषा तर पशुपक्षीहि समजतील आणि तेहि आमचे मित्र बनतील !

## ४०९

ज्याप्रमाणे रात्र आणि दिवसाच्या ताणाबाण्यातून अखंड कालवस्त्र तयार होत असतं त्याप्रमाणे बाहेरच्या सुरचनेसाठी आतले चिंतन वापरणे आणि आतल्या सुचिंतनासाठी बाहेरच्या वस्तु वापरणे या दोहोंच्या मजबूत ताणाबाण्यातून तुझे स्तोत्रवस्त्र विणले जाईल तर आम्हाला केंव्हाहि उघडे पडण्याचे दैन्य ग्रासणार नाही. आम्ही सदैव तुझ्या स्तोत्रानें वेढलेले राहूं, आणि तेच आमचे वज्रकवच ठरेल !

४१०

आमच्या आईची ती आमच्या छोट्याशा घरातली कार्यरीति जरी वरवर पाहणाऱ्याना रोजचीच दिसली तरी ती रोजची नसे. तीत प्रतिक्षणाला अपूर्वतेची भर पडत असे. तीमधल्या दक्षतेची रुचि आणि नाविन्याचे पैलू अद्‌भुत तेजाने तळपत राहात. तिच्या भक्तिभावाची वृद्धि अनेक प्रकारान्तरानी आपल्या दिव्य भावान्तराच्या गूढ खोलीबरोबर रमणीयतेच्या कारागिरीला नेहमी मागे टाकीत असे. तिच्या गोड गळ्यातली नित्य नवीन गोडीने म्हटली जाणारी नित्य नवीन गोड गाणी अतर्बाह्य वातावरणात पसरून इहलोकाचा विसर पाडून आमची मने गहिवरून टाकीत. हे जगन्माते ! तूच तिला हे दिव्य जीवन दिलेस ! का तूच तिच्या रूपाने अवतरलीस ? अथवा तिला पाहून तू आता तिची छाया बनलीस ? आम्हाला यामधले गूढ काहीच कळत नाही. आम्ही केवळ मूढ आहो आम्हाला केवळ आमच्यावरची तिची मायाच तेवढी कळते ! काही हरकत नाही. तीच आमच्या ठिकाणी राहू दे. बाकीचे काही आम्हाला कळले नाही तरी तिच्या मायेने निश्चित आम्हीहि संसाराची माया सहज तरून जाऊ हा दृढविश्वास आम्हाला पुरेसा आहे !

४११

वेषपरिवर्तन, देशपरिवर्तन, व्यवसायपरिवर्तन, परिवर्तनाच्या अनेक प्रकाराची वारंवार परिवर्तने करून वृत्तिपरिवर्तन होईल ही आशा हे माझ्या जीवा ! तू धरली आहेस त्यात तुझा सद्धेतु असला तरी चित्तात जे परिवर्तन व्हावे म्हणून तुझी इच्छा आहे ते आतले असल्यामुळे बाहेरचीं परिवर्तने बाहेर राहतात ती आत येत नाहीत म्हणून वृत्तीचा वेष, वृत्तीचा देश, वृत्तीचा व्यवसाय तोन् तोच चाललेला असतो. क्वचित् बाह्य परिवर्तनाने थोडा विरंगुळा वाटतो पण पुन्हा उलट अधिक वेगाने वृत्ति मूळ पदावर येते यासाठी अगदी अंतःकरणपूर्वक ईश्वराचा ध्यास घेशील तर वृत्तीच्या परिवर्तनाचा प्रश्नच राहणार नाही. वृत्ति अंतरवृत्ति बनेल, वृत्ति ईश्वरमय बनेल आणि तिचा सगळा वेष, सगळा देश, सगळा व्यवसाय ईश्वरमय होईल याचा तूं विचार कर

४१२

कोणापासून केव्हा किती आणि काय घ्यावे आणि कोणाला केव्हा काय आणि किती द्यावे या आदानप्रदानाच्या काहीहि सीमा असल्या तरी असीम परमेश्वरापासून केव्हाहि कितीहि आणि काहीहि घेता येईल त्याला अंतःकरणपूर्वक केव्हाहि कितीहि काहीहि देता येईल ही गोष्ट तुझ्या लक्षात न आल्यामुळें हे जीवा ! तू व्यवहाराच्या देवघेवीच्या बाबतीत नेहमी असमाधानी राहतोस. तेव्हा ही बाहेरची व्यवहारी अपूर्णाकाची देवघेव शक्य तितकी कमी करून तूं ईश्वराच्या बाजारपेठेतली देवघेव भरपूर करीत जा. असमाधान तुझ्या वाऱ्यालाहि फिरकणार नाही !

४१३

तुमचे सर्व उद्योग आणि तुमच्या सर्व हालचाली जरी सद्धेतूने प्रेरित झाल्या असल्या तरी जोपर्यंत त्यामध्ये ईश्वरप्रेरणेचा विश्वमचार नाही तोपर्यंत त्या सर्व निर्बळ हालचाली आणि ते सर्व निष्प्राण उद्योग ठरतील आणि त्याचा परिणामहि निर्बळतेची आणि निष्प्राणतेची वाढ होण्यातच होईल म्हणून तुम्ही तुमचा उद्योग आणि सर्व हालचाली सोडून दिल्यात तर तेहि तुम्हाला शक्य नाही आणि त्यानेहि तुम्ही सबळ किंवा प्राणवान् व्हाल अशी स्थिति नाही. तुम्ही जेव्हा तुमच्या उद्योगाला आणि हालचालींना त्या परात्पर प्रभूला मिळविण्याचे एकमात्र वाहन कराल तेव्हाच त्यात किंचित चेतना येईल आणि त्या प्रभूची कृपा होईल तेव्हा त्यात त्याची संपूर्ण प्रेरणा दाखल होईल! मग तुम्ही कोणताहि उद्योग करा कोणतीहि हालचाल करा अथवा काहीच करू नका. त्या सर्वसमर्थ प्रभूच्या प्रेरणेचा सर्वत्र संचार झालेला असेल त्याला तुम्ही निमित्त झाला अशीहि स्थिति राहणार नाही तो प्रभूच त्या प्रेरणेला निमित्त आणि तो प्रभूच त्या प्रेरणेचा प्राणवान् संचारक ठरेल!

## ४१४

तुम्ही तेथल्या हास्यविनोदाने फसू नका. ते हसणे तुम्हाला केव्हा रडवील ते सांगता येणार नाही. तुम्ही जे व्रत अंगीकारले आहे, जी साधना तुम्ही स्वीकारली आहे ती तीक्ष्ण शस्त्रधारेवर चालण्यापेक्षां कमी कठीण नाही. तेव्हां लीलाविनोदाने तुम्ही तिला हलकी करू पाहाल तर त्यात अस्वाभाविक काही नसले तरी त्यामुळे तुम्ही बेसावध बनता कामा नये गांभीर्याच्या चिलखताने, मौनाच्या ढालीने आणि अनासक्तीच्या तलवारीनेच तुम्हाला व्रताची परिपूर्ति करता येईल. हें जर लक्षात न आले तर तुमची पूर्ण फसगत होईल म्हणून पुन्हःपुन्हा बजावतो, हास्य-विनोदातली गंभीरता ओळखा आणि नेहमी भानावर रहा !

## ४१५

एक घर गेले म्हणून तुम्ही काय समजता माझें सर्वच गेले ? मला दुसरी घरे नाहीत ? मला नवीन घर बांधता येणार नाही ? आणि त्याचीहि जरुरी काय ? सर्वच घरे माझी आहेत माझे एक घर गेल्याने मला जे वैभव प्राप्त झाले आहे ते निश्चित निश्चिंततेचे वैभव आहे इतराच्या ठिकाणी वरवर थोडे वैभव दिसेल त्यात निश्चितपणे चिंतेनें घर केलेले असेल फार उत्तम झाले माझे एक घर गेले ते गेल्याने सर्व चिंता हरपली. आता निश्चितपणे त्या प्रभूच्या चिंतनाच्या भव्य प्रासादात माझें वास्तव्य होईल !

## ४१६

त्या महान् प्रभूने तुझ्या अतःकरणात जी महनीयता भरून दिली आहे तिकडे लक्ष देशील तर तुला आनदाच्या कृपेची धन्यता प्राप्त होईल। त्याने केलेल्या असामान्य पवित्र कार्याने अशुचिता दशदिशाना निघून जात असून दीनदरिद्रक्षुधित हृदयाला त्याने तृप्तीच्या सिहासनावर बसविले आहे।

## ४१७

तुझा परोपकार हा स्वतःवर स्वतःचा उपकार अशी विलक्षण स्थिति जेव्हा निर्माण होईल तेव्हा परोपकार हा इमारतीच्या पायाप्रमाणे तुलाहि भासमान होणार नाही त्यामुळे तुझी उपासनाहि जीवनाचा सफळ पाया ठरेल, ज्याजोगे आवश्यक ते सर्व प्राप्त होऊन तुझे जीवन परमेश्वराच्या परिपूरणाच्या क्षमतेने गुफले जाईल।

## ४१८

परमेश्वर कृपेच्या पावसाच्या वर्षावाने समृद्ध झालेल्या हिरव्या हिरव्या कोवळ्या कोवळ्या गवतात आमच्याच परिवेष्टनीत गाईचा कळप सुखाने चरत होता पण त्यातले एक वासरू परिवेष्टनीच्या थोडे बाहेर राहून गेले त्याला तो कळप अगदी दोन हातावर चरताना दिसत होता पण त्याला त्या तेवढयाशा अलगतेनेहि अगदी घाबरें केले। शेवटी थोड्याच वेळात ते त्या परिवेष्टनीतल्या कळपात सामील झाले केवढा त्याचा त्याला आनद। हे प्रभो। मीहि तुझ्या महान् समूहापासून अलग एकटा पडलो आहे. मला तुझ्या समूहात तू केव्हा घेशील? माझ्या भयभीततेतून तू मला तुझ्या परम आनदात केव्हा नेशील?

## ४१९

परदोष आणि परदेश यांमध्ये जर शिरशील तर निश्चितपणे घोर आपत्तीत पडावे लागेल यासाठी स्वदोष आणि स्वदेश याचीच तूं पाहणी करून तेथेच तुला जे काही करणे शक्य आहे ते करून ईश्वराची करुणा भाक की हे ईश्वरा! मला निर्दोष कर आणि तुझ्यापाशी आसरा दे!

## ४२०

बगीचातल्या तयार असलेल्या ताज्या फुलाना जराहि धक्का न लावता, कोमजूं न देता, त्याना इजा न करता त्यांची अधिकात अधिक सौंदर्य-संगति साधून, त्याना अत्यंत कलापूर्ण रचनेत गुफण्याचे कार्य जरी कोणाला त्याना संकोचात टाकण्याचे वाटले, आणि इतस्ततः पडलेली फुले विशालतेत वावरत आहेत असे जरी वाटले तरी पहिल्याची माळ प्रभूच्या गळ्यात पडेल आणि दुसऱ्याचा पायदळी पडून चुराडा होईल. हे ध्यानी घेऊन हे माझ्या जीवा! तू पहिल्याच्या पंक्तीत जाऊन बस म्हणजे तुला प्रभूचे सान्निध्य साधेल!

## ४२१

या जगात सेवाकार्य इतके पडले आहे की सेवकच मिळत नाहीत. खरोखर योग्य सेवक मिळणे ही तर ईश्वर-देणगीच होय. कारण हिमकात प्रेममय, निर्बुद्धात बुद्धिमान आणि वक्रात सरळ अशी त्याची स्थिति असणे ईश्वरी प्रेरणेशिवाय कोठून शक्य होणार ? शिवाय त्यांच्या ठिकाणी अतिशय प्रखर वाक्प्रकाश अपेक्षित असून सामारिकापासून ते अगदी वेगळे पडणारे आणि एका प्रभूशिवाय सर्व नाती गौण समजणारे आणि आत्मबलिदान करणारे हवेत हे माझ्या जीवा ! अशा दिव्य सेवकाची अल्प तरी सेवा तुझ्या हातून व्हावी यासाठी तू नेहमी तत्पर रहा !

## ४२२

आप्तसमूहातून खरा आप्तपणा मिळवण्याचे दिवस गेले ते थोडे दिवस बरोबर राहून मागे पडले पुढे मित्रसमूहातून खरे मित्र मिळविण्याचे दिवस आले तेहि थोडे दिवस बरोबर राहून मागे पडले पुढें विद्यार्थीसमूहातून खरे विद्यार्थी मिळविण्याचे दिवस आले ते तसेच थोडे दिवस बरोबर राहून मागें पडले पुढे अनुयायीसमूहातून खरे अनुयायी मिळविण्याचे दिवस आले तेहि थोडे दिवस अनुयायी झाले आणि मागे पडले पण तो मात्र कधीच मागे पडला नाही. तो नित्य खरा ठरला इतर थोडे खरे ठरले आणि मागें पडले यापुढे तो नित्य खरा ठरलेला तोच नित्य खरा असलेल्या प्रभू-बरोबर राहील माझ्या मना ! त्याला ओळखलेस काय ? तो तोच जो प्रभूकडून आलेला होता इतर वासनेकडून आले होते म्हणून मागें पडले. तू त्यामागे पडलेल्याच्या मागें जाऊ नकोस. पुढें गेलेल्याच्याकडे लक्ष ठेव !

## ४२३

आत्मशुद्धीच्या पवित्र हेतूने ठिकठिकाणी सत्सगाचा शोध घेत घेत नंतर प्रत्यक्ष श्रीगुरूची गाठ घेऊन त्याच्याशी एकदम कोणत्याहि प्रश्नोत्तगत न पडता सेवा करीत राहून श्रीगुरूंच्याकडे आलेल्या अनेक लोकाच्या अनेक प्रश्नोत्तरांतूनच आपल्याहि प्रश्नाची अनायास मिळालेली उत्तरे निवडून शेवटी उत्तर न मिळालेल्या एखाद्या व्यक्तिगत प्रश्नाचे नम्रपणाने निवेदन करून त्यातून मिळालेल्या निर्णायक सिद्धान्तलाभाच्या प्रसन्नतेचा ठेवा दुसऱ्यानाहि वाटून देण्याची थोर रीती खरोखरच जिज्ञासूचा आदर्शच मानावी लागेल तिचे अनुकरण करणे सोपें नसले तरी तुझ्या जीवनसाधनेला त्याच प्रयत्नाची आवश्यकता आहे हे हे जीवा ! तूं लवकरात लवकर जाणून घे !

## ४२४

माझ्या आड मीच येत आहे हे माझे मलाच समजत नाही. हा माझा अडथळा दुसरा कोणी दूर करू शकत नाही हे खरे आहे पण तो माझा मलाहि दूर करता येत नाही हे त्याहून अधिक खरें आहे तो अडथळा मी किंवा दुसरा कोणीहि दूर करू शकत नसला तरी सर्वसमर्थ परमेश्वर तर तो दूर करू शकेलच यामध्ये कोणतीहि शंका नाही. त्यामुळे माझ्या असमर्थ प्रयत्नाची पूर्ति तरी तू करशीलच या माझ्या आशेचा ततु हे ! प्रभो ! तू तोडू नकोस !

## ४२५

बोलणे आणि त्याप्रमाणे तत्काल करणे ही साधकावस्था केव्हाच ओलांडून ज्या कृतकृत्य महापुरुषावर अपरिहार्यतेने बोलण्याचेच मुख्य कार्य येऊन पडते, त्याने अमुक एक काही करावे ही अपेक्षा मूर्खतेची परिसीमा मानावी लागेल. त्याच्या बोलण्याने हजारो साधक कृतिवीर तयार होऊन सर्व प्रकारच्या व्यर्थ भाषेचा ते तेव्हाच उच्छेद करतील आणि त्या कृतिशक्ति पूर्णपणे मुरलेल्या महापुरुषाच्या भाषेचा जयजयकार होईल आणि त्या विजय-घोषणेच्या भाषेत नम्रतेची परिपूर्णता समावलेली असेल. तीच आपली खरी भाषा, तीच आपली खरी आशा हे जीवा! ही खूणगाठ तू आपल्या मनाशी बांधून घे!

## ४२६

हे माझ्या जीवितेश्वरा! माझ्या जीवाचा जीव होऊन राहिलेली प्रियतेची प्रियता माझ्या हृदयातल्या हृदयात अतिशय सुंदराकृतीने युगयुगापासून तूं भरून ठेवलीस, तीच तूं माझ्या नसानसात खेळवलीस, माझ्या मनात तिच्याच कल्पनातीत कल्पनाची गर्दी करून दिलीस माझ्या प्रत्येक श्वासात तिचाच बहर तूं भरून दिलास, माझ्या हालचालीच्या सूक्ष्मातिसूक्ष्म भागात तिच्याच लाडक्या डौलाचा विहार तू करविलास, त्यामुळे बेभान होऊन तुला मी विसरावे हीच का तुझी मनीषा होती? तसे जर असेल तर ती मनीषा पूर्ण विफल झाली आहे तुला सोडून मी तिचा अंगीकार केलेला नाही. तिला तुझ्या ठिकाणी अर्पून उलट मी तिच्या द्वारे तुझे प्रत्यग व्यापून तुझेंच अभंग अंगअंग बनलो आहे!

तो मोठा सकटाचा प्रसंग टळला म्हणून समाधानाच्या श्वासाने माझें अत करण भरून आले परंतु संकटाचा हा नुसता प्रारभ आहे हें जेव्हा मला कळले तेव्हा माझें समाधान ओसरले एक एक पाऊल मी समाधानाच्या प्रातापासून दूर जात जात जेथे कोणी कधीच गेलेला नाही त्या रुक्षतेच्या रेताडात जाऊन रुतलो वरून खालून चोहीकडून रेतीच रेती पसरूं लागली. गुदमरून गेलो आता काय करूं ? कोण मला या दारुण स्थितीतून काढील ? या करुण भावनेने मी माझे डोळे घट्ट मिटून घेतले. त्या मिटलेल्या डोळ्याना मग दिसून आले की ही खरोखर रुक्ष रेती नसून ही माझ्या सभोवती पसरलेली सकटाची अतिशय सुंदर मोती आहेत ती आभूषणे आहेत मला सर्व बाजूनी नटविण्याच्या उत्साहाने ती माझ्याकडे लोटत येत आहेत मी इतका क्षुद्र किवा लहान नाही की त्याच्यामध्ये मी लुप्त होईन खरोखर माझ्या महान् स्वरूपाचे भान मला त्याच वेळी प्रत्ययाला आले आणि संकटाचे अलकार मिरवीत मिरवीत मी जेव्हा सहजतेच्या स्वरूपावर स्थिर झालो तेव्हा माझ्याकडे सर्वजण चकित होऊन पाहू लागले आणि मी सर्वांना आश्वासनस्वरूप ठरलो. हे प्रभो ! ही तुझीच किमया ! नाही तर माझे काय झाले असते ते माझे मलाच सागता येत नाही !

## ४२८

नियंत्रणाच्या यंत्रणेचा निर्देश भूतकालावर पडदा पाडून सावधान-तेने सर्वत्र कानोसा घेत प्राणमय उत्साहाने जेव्हा अतिशय रोचक बनला तेव्हा सामर्थ्याच्या कर्तृत्वाला हातावर हात फुटून त्याना करण्याला सेवाच कमी पडूं लागली मग त्याने आसनमाडी घातली आणि तुझ्या ध्यानसेवेतच स्वतःच्या कर्तृत्वाची परिसीमा करून दाखविण्याला हाताना विनति केली तेव्हा एकेक हात गळून पडू लागला आणि त्या तुझ्या अतर्ध्यानसेवेला कोणतेहि आणि कोणाचेहि कर्तृत्व अपुरे पडते असा अनुभव घेतला. कारण तेथे हे प्रभो ! अकर्तृत्वात्मभावच खरी सेवा करू शकतो !

## ४२९

खिडकीमधुनी पाहसि का रे समोर येई बाळा
न पाहिला मी तुझ्याएवढा कोठेही जिव्हाळा ।।
तुजला नाही कृत्रिमतेची अजुनी ओळख झाली
अंकित झाली म्हणुनी सरल प्रज्ञा तुझिया भाली ।।
त्याच्यावरती खेळ खेळती कितेक काळे केश
तूंहि जगी या तसा खेळसी जेथे दोष न लेश ।।
वेषाची तुज पर्वा नाही असती केवळ उघडा
उघडपणा तव म्हणे प्रभूला "हृदयद्वारे उघडा ।। "
तुझ्यासवे मग खेळायाची येइल भारी मौज
हासत नाचत चढवित तुजला धूळीचा मी साज ।।
पाठीवरती चढेन तुझिया करुनी तुजला घोडा
अरे बालका ! जगचालका करिसी ऐसा वेडा ।।
मग मी ही का दगड असे रे जातीने तू बोल
समोर ये प्रभुपावित्र्याची तुझी खाण तू खोल ।।

४३०

अनित्यतेच्या भूमीवरुनी नित्यत्वाचा ओघ
नित्यत्वाच्या अंगी खेळे अनित्यतेचा वेग ॥
दोहोमधल्या वैलक्षण्या समावुनीया घेई
चमत्कृतीची चमत्कृति ही सदैव तुझिया ठाई ॥
त्यातच माझी जिज्ञासा ती डोकावुनिया पाहे
सगळे कोडें या जीवाचे तेथे भरुनी राहे ॥
बुद्धि त्यामधे कुंठित होई चचल मन ते स्तब्ध
ते जड व्हावे प्रभो न, व्हावे तुझिया पायी लुब्ध ॥
क्षोभाची मग सगळी सळवळ तेथे होइल लुप्त
जागृत असुनी जगी आपणामाजी होइन सुप्त ॥
तेथे कोणी कोणा काही द्यावे घ्यावे हेहि
नुरेल राहिल कोठुनि देवा ! तुझीच कांति देही ॥
त्या कांतीची कांति होइल नितान्त शांति सारी
प्रवेश तो की अव्यक्ताचा व्यक्तीमधल्या द्वारी ॥
मूर्तिमन्त तू त्या वेळी हे देवा ! होशिल माते
नष्ट करुनियां जन्ममृत्युयुत कर्मांच्या कष्टातें ॥
मग मी आणिक तूहि होऊ सुखसवदा मुक्त
तेणे होइन सदैव देवा अधिकाधिक अनुरक्त ॥
हेच मागणे सदैव देवा माझें तुझियापाशी
हेंच तुझें मज सदैव देणे असो सदा सुखराशी ॥

## ४३१

क्रिया समस्तचि सपवुनी तूं आलासी भेटाया
मन्मित्रा ! ही तुझ्या कृपेची अमोल मजवरि माया ।।
चैन पडेना मला भेटल्यावाचुनि तुजला नित्य
फुरसद नसुनी मत्स्मृतिची तुज फुरसद आहे सत्य ।।
तू ही मी ही अशीच मैत्री असेच नित्यस्मरण
साधुनि देवाचे ते पाहू बोल केधवा चरण ? ।।

## ४३२

हे देवा ! ही सगळी परम आश्चर्यमय सृष्टि म्हणजे ज्याप्रमाणे तुझी महानता आहे त्याप्रमाणे ती तुझी दिव्य दृष्टि आहे पण आम्हा लहान जीवाना तिचे मुळीच आकलन होत नाही आणि आमची लहानता क्षुद्रतेकडे झुकू लागते खरोखर आम्ही लहान राहिलो तरी चालेल, पण आम्ही क्षुद्र बनणार नाही इतकी तरी तुझ्या महानतेची थोडीशी दृष्टि तू आम्हाला दे ! आम्हाला एवढे जरी सृष्टिरहस्य कळले तरी तुझ्या परम आश्चर्यमय महानतेचे आम्हाला कौतुक वाटेल !

## ४३३

जन्मभरचे की जन्मजन्मान्तरीचे ते ऋण मी त्याच्या मरणानतर फेडण्यासाठी निघालो ते माझ्या मरणाने किंवा मरणानतरहि फिटणार नाही हे मला माहीत असताना मी हा वृथा उद्योग का करावा हा प्रश्न माझ्यापुढे उभा राहात नाही कारण त्या उद्योगातच मला माझे जीवनवित साफल्य वाटते आणि माझ्या ऋणमुक्तीच्या असफलतेने माझ्या मनाला कोणताहि क्लेश न होता उलट त्याची महानता माझ्या चित्तात अधिकाधिक ठसत जाते हे प्रभो ! त्या माझ्या गुरूची महानता माझ्या चित्तात ठसावी हाच माझा उद्योग जन्मजन्मान्तरीं तू चालू ठेव हीच माझी तुला प्रार्थना आहे कारण तूं गुरूचाही गुरु जगद्गुरु आहेस !

४३४

समोर सपूर्ण सृष्टीच्या साफल्याची गर्दी, बाजूला सर्वावरणाचे वातावरण, त्यात लहानच पण सुंदरतेने सजवलेल्या उपयुक्ततेच्या वृत्तीच्या चतुर सचलनाची नित्यभूमिका बहुविधतेला अनेक तऱ्हेने सुखवीत सर्व दिनक्रमात आयुष्यक्रमाची गजबज निवान्त शातीचा निर्देश करताना पाहिली, तेव्हा हे प्रभो ! तुझी ही पगुना वरवरची असून तिने तुझ्या अतर्यामीचे गूज मधूनमधून आम्हाला निवेदन करण्यासाठीच ती आहे याबद्दल आमची खात्री झाली !

४३५

एकाच भूमिकेवरच्या एकाच सदेशाने अनेकानेक भूमिकाना आणि अनेकानेक सदेशाना विस्मृतींत टाकून स्वत च्या प्राबल्याने पूर्णपणे भारून टाकलेले दिसून येते तेव्हा नवजीवनाच्या नवयुगाच्या महान् प्रेरणेचे ते अवतरण प्रत्येकाच्या अत:करणात आरोहणाचा उल्लास निर्माण करते तो सगळीकडचा उल्लास ओसरण्याच्या आधींच हे माझ्या मना ! त्याला सर्व प्रकारे स्वत मध्ये समावून घेण्याची तूं खबरदारी घे त्या सुखसचयाचा पूर व्यर्थ जाऊ देऊ नकोस !

## ४३६

हे प्रभो ! तुझी इंद्रियरहितता ही इंद्रियातीतता असल्यामुळे तीमध्ये सेंद्रिय मर्यादित समर्थतेचे कारुण्यकारण दडलेले आहे खरोखर ती अमर्याद समर्थतेची मोहिनी आहे तिच्या योगाने आमच्या मर्यादित समर्थतेने तिलाच अनुसरावे हा अमूल्य मलसकेत जर आमच्या लक्षात आला तर मर्यादेच्या अमर्याद मूलप्रेरणेला अमर्यादाची अपार अमरता प्राप्त होऊन आम्ही दोन्ही बाजूनी आनंदसमुद्रात डुबत राहू ! नाहीं तर अमर्याद आनंदाची मूलप्रेरणा असूनहि आमच्या दुःखाला पार राहणार नाही कारण मर्यादितामागे लागणे हेच दुःख असून अमर्यादाला गाठणे हेच सुखाचे सारसर्वस्व आहे !

## ४३७

सिंधूशी समरसून जाण्याला व्याकुळ झालेल्या बिंदूला जेव्हां आपल्यातहि अनंत लघुबिंदूंचा सिंधु आढळला तेव्हा त्याने आपल्या प्रेमकारुण्याने त्या सर्वांच्यामध्ये आपले सामरस्य पाहून आपले पूर्वी सिंधूशी इच्छिलेले सामरस्य टाळूनहि ते सामरस्य साधले. ती वियोगाची योगगाथा कोण गुंफू शकेल? खरोखर तेथे वाणी अकुंठित होते ! तू स्वतःच्या इच्छेला कुंठित करून इतराच्या इच्छेचे आपल्यामध्ये अकुंठित सामरस्य साधशील तर तुझ्याच ठिकाणीं हे माझ्या मना ! ती गाथा सहजपणे गुंफिली जाईल !

## ४३८

तुझ्याच करुणाचरणी पडलो मजला कोठुनि मरण
मरण बिचारे मरुनी झाले तुझेच केवळ स्मरण ॥
त्या स्मरणाची मधुर मोहिनी जन्मोजन्मी मुरली
तेणे माझ्या ठायीं देवा! त्वद्गीते ती स्फुरलीं ॥
ती ऐकुनिया माझा मीची लुब्ध जाहलो आहे
तेथे तूही ऐकायाला येशी हेहि न पाहे ॥
परतु जेव्हा त्यात मिसळशी हळूच अपुला सूर
माझा माझेपणा तदा तो किंचित् होई दूर ॥
चकित होउनी तुझ्या सुराचा जेव्हा घे मी शोध
तेव्हा वाटे अति दूरचि तो न होय त्याचा बोध ॥
जाउनि त्याच्या पुढे प्रभो! तं ठेका धरिशी जेव्हा
वाटे सन्निध असशी दिसशिल स्पष्ट मला तू केव्हा ? ॥
मग रंगुनिया अधिक गाय मी जेव्हा गीतच माझे
स्वये गाउनी त्या गायाचे जाणविले मज ओझे ॥
मुखात माझ्या स्वये येउनी गाशी नाना गाणी
ती ऐकुनिया धन्य जाहलो आले नयनीं पाणी ॥

## ४३९

आमच्या ठिकाणीं सतत चाललेल्या जडचैतन्याच्या परिणाम-परंपरेचे युद्ध बंद होईल तेव्हा एक तर ती आनंदसौंदर्याची मिरवणूक असेल अथवा खोट्या लढाईचा खेळ असेल. युद्ध संपेल तेव्हा तलवार म्यान करून मिरवली जाईल. किंवा कौतुकाने तिचे हात दाखविले जातील.

४४०

जगात असुनी नसण्याची ही तुझी कला मज देवा
केव्हा देशिल त्वद्हृदयींचा खरा खरा तो ठेवा ! ॥
तो केवळ मी ठेवुनि घ्यावा हीच नसे मज आस
तेणे जगतीं सर्वांचा मी होइन केवळ दास ॥
तेणे दिसतिल तव स्वरूपे स्वभाव नाना गोड
दृष्टिकोण ते वर्तनरीति याचे बघेन कोड ॥
कौतुक बघता बघता ऐसे तव आनदाची पेठ
माझ्याकडुनी मिळेल सर्वां सेवायोगे थेट ॥
त्याच्या आनदाने मीही जाइन आनदूनी
अधिकाधिक ती देवा ! सेवा करावयालागूनी ॥
त्या आधिक्ये सेवेच्या मग झिजेल माझी काया
जायाचा मग केव्हाही ती नाही केवळ वाया ॥
चिंता जाता तिची, काळजी सर्वांची घेईन
हृदयी हृदयी हृद्य बनूनी प्रेम तुझे देईन ॥
तत्प्रेमे मग त्वत्प्रेमहि ते सुवृद्ध होइल माझे
माझे माझे जाइल हे की सर्वांचे ते ओझे ॥
जाता ओझे म सेवेने सगळे व्हावे मुक्त
त्या मुक्ताशी बद्ध करूनी प्रभो ! करी मज भक्त ॥

## ४४१

सूक्ष्म मूलस्वरूपातून विविध स्थूलस्वरूपात ठिकठिकाणी मंडलमय होऊन मघन वैविध्याच्या वाटेने अतापर्यंत वाटचाल केली आणि अतर्बाह्य सर्वत्वाच्या आणि सर्वस्वाच्या घरी येऊन पोचलो तरी आम्हाला आमच्या निजस्थानाची ओळख पटत नाहीं आम्ही गोंधळून जातो या सर्व अव-डंबराची आम्हाला मुळींच जरूर नाहीं हे प्रेममय प्रभो! फक्त तुझ्या साध्या प्रेमरसाच्या स्पर्शाने आम्ही आमच्या निजस्थानी जाऊ शकू!

## ४४२

नैसर्गिक पचविभागात्मक सोईला मदतनीस म्हणून जोड देण्याच्या विचारातला खोल चरितार्थ दूरदृष्टीचा क्षेत्र दाखवून देत असल्यामुळे योग्य ठरू शकेल पण केवळ सोयीचाच विचार असेल तर तो पूर्णपणे बाधक ठरेल आणि ती मूळ सोईची गैरसोयच सिद्ध होईल द्वाररक्षक जर स्वामीलाच अडवणारे ठरले तर ते गृह कारागृह होईल म्हणून हे जीवा! मुख्य स्वामीचा विचार करून मग सोयीचा विचार कर

## ४४३

नितान्त शात असा निगूढतेचा गाभारा सर्वत्र समुज्ज्वल आदर्शानें मढविलेला असल्यामुळे तेथल्या शिवस्वरूपावरच्या मतत ध्यानधारेने त्याला परममगल विश्वरूप दर्शनयोग बनण्याचें भाग्य प्राप्त झाले. तो जर येताजाता हृदयाहृदयात ठसून गेला तर आणखी काय पाहिजे? त्यामुळे बाहेरच्या सर्व हालचालींत त्या परम आश्चर्यमय प्रभूचें लीलामय प्रबुद्ध जीवन ओसडून येईल!

## ४४४

हे प्रभो! माझ्या ध्यानात येत नाहीं कीं माझ्या ध्यानांत तूं एवढे सामर्थ्य कोठून भरून दिले आहेस! अशी एकहि वस्तु नाही कीं जी त्यात सर्व दोष वर्ज्य करून गुणमय बनली नाही! आणि ते गुणहि कसे? ज्याचा एकमेकात समावेश झाला असून ज्याचे स्वातंत्र्य नष्ट झाले नाही आणि जे एकमेकावर पूरकतेने नित्यानंदाचा प्रकाश टाकीत आहेत, आणि ज्याच्यावर माझे सारे ध्यान लुब्ध होऊन गेले आहे! पण हे परम आश्चर्य माझ्याच ध्यानात येत नाहीं तर इतराच्या ध्यानात कोठून येणार? म्हणून मी आता निश्चित केले आहे कीं जे ध्यानात येत नाही तेच खरे ध्यान!

## ४४५

तुम्हाला तुमच्या घरीं, बाहेर, रस्त्यात, जवळ, दूर, सर्वत्र जिकडे तिकडे जे काही दिसत आहे ते अनेक पैलूचे भिन्न भिन्न परतु परस्पर अविरोधी इतकेंच काय पण परस्पर सवादी असे परम कृपाळू परमेश्वराच्या दिव्य शक्तीचे भावविचार आहेत! पण त्यातला एकहि भाव आणि त्यातला एकहि विचार लक्षात न आल्यामुळे ते केवळ भिन्न भिन्न जीव किंवा केवळ भिन्न भिन्न वस्तु असेच तुम्हाला वाटत असतें आणि तुमच्या जीवनात त्याच्या उपयोगाशिवायचा तुमच्या ठिकाणी कोणताहि भाव किंवा विचार निर्माण होत नाही याचे खरें कारण तुम्हाला तुमच्या ठिकाणी सर्व जीवनाचा जो भावविचार कोंडून गेला आहे त्याचाच उलगडा झालेला नाहीं!

## ४४६

प्रेम हे परमेश्वराचे एकमेव प्रमेय आहे! तें गणिताप्रमाणें सोडवावयाचे नसून ते अगणित समजून आपल्या ठिकाणीं जोडावयाचे आहे.

## ४४७

जुन्यांत जुन्या उणीवा सोडून नव्या अपूर्णतेच्या रीति स्वीकारून जरी मी वागत असलों तरी पुढें मी अपंगच राहीन अशी भीति मला नाही. कारण भावी पूर्णतेच्या माझ्या आशेला तुझ्या आदेशाचे पाठबळ मिळाले आहे. तोच आशीर्वाद समजून अशक्य काहीच न मानता दुसऱ्या अनेकानाहि मी माझ्याबरोबर प्रवासात जोडून घेतले आहे हे पाहून माझी पूर्ण खात्री आहे कीं हे पूर्णस्वरूप परमेश्वरा ! माझ्याप्रमाणच तुलाहि पूर्ण सतोष वाटेल !

## ४४८

सर्व कालाचे केंद्रीकरण करून पुन्हा तू जिकडे तिकडे त्याला सतत पसरून देतोस आणि ज्याला त्याला तो आपला वेगळा आणि नवा काळ वाटत राहावा अशी तू काळजी घेतोस त्यामुळे एकच आई अनेक मुलांची त्याना त्यांना अनुरूप अशी वस्त्र-पात्राची, खानपानाची व्यवस्था करते तसे तुझे स्वतत्र आणि विशाळ मातृवात्सल्य प्रत्येकाला झे प्रेम माझ्यावरच आहे अशी भूल पाडून तुझ्या सार्वत्रिक प्रेमाची झूल सर्वांवर सारखीच पडलेली राहते वैशिष्टयाने आणि तरीहि सर्व साम्याने प्रगटणारी ही प्रेमाची रीति हे प्रभो ! आमच्या ठिकाणी केव्हा प्रगटेल ?

## ४४९

आमच्या अज्ञानामुळे आणि स्वामीच्या साधेपणामुळे कधीं कधीं आम्हांला स्वामी कोण आणि सेवक कोण हा भ्रम पडतो. आणि आमची अशा स्थितीत फसगत होऊन अतिशय फजिती होते पण तुझ्या ठिकाणीं स्वामित्व आणि सेवकत्व मुळींच वेगळे नसल्यामुळे आमची नेहमींच फसवणूक आणि फजिती होते. यासाठी हे देवा ! तू आम्हाला सेवकत्व दे आणि तुझ्या स्वामित्वाच्या छत्र-छायेत आमचा विकास कर !

## ४५०

आम्ही प्रकाशात उद्योग करतो आणि अंधारात झोपतो. पण प्रकाशात ईश्वराचा भक्तियोग आणि अंधारात ईश्वराचा ध्यानयोग हें आमच्या उद्योग आणि विश्रांतीचे स्वरूप होईल तेव्हाच प्रकाश आणि अंधाराचा आम्ही खरा उपयोग करून घेतला असे होईल आणि तेव्हाच प्रकाश म्हणजे त्या प्रभूचे ज्ञान आणि अंधार म्हणजे त्या प्रभूची शांति आम्हाला मिळेल !

## ४५१

तुझ्या ऐक्याच्या चैतन्यातून प्रकाशाचे प्रेम पाझरून सर्वत्र कारुण्याच्या भूमिकेच्या विविध पैलूंच्या भूमिकांनी रमणीय आकाराने विलोभनीय होण्याला सुरुवात केली तेव्हा एकतेची भयाणता, शून्यतेची भकासता, आवेगाचा वज्राघात, ओघबाह्यतेची प्राणहानि आणि आकाराची तीच तीच जीर्ण जडता कोठल्या कोठे निघून गेली आणि आमचे चित्त जेथे जेथे गेले तेथे ते विकासाच्या विहाराने विलसू लागले. हे जरी सर्वथैव इष्टच असले तरी हे सर्वोत्तम इष्टस्वरूप देवा ! आमचा हा बहिर्विकास तुझ्या हृदयांत जडलेला आमचा अंतर्विकास होईल तेव्हांच तो वास्तविक आपले सार्थक करील !

४५२

परिश्रमाच्या परमेश्वरकृपेने निर्माण झालेले धान्य हे धन्यतेचे अमोल सहज धन आहे. कृत्रिम धन हे त्याची खरेदी विक्री करू पाहते. तेव्हा आमच्या बालिशतेला पाहून प्रकृतिमाता हसूं लागते! आणि धनाची जेव्हा आम्ही साठवण करू लागतो तेव्हा आमचा जीवनानंदच ती हिरावून घेते! अरेरे! आम्हाला धान्याची साठवणीची आठवणहि होत नाही!

४५३

जीवनाच्या भूमिका किती आणि कशा असतील याचा काहीच नेम नसल्यामुळे त्याच्या रीतीवर नियंत्रण ठेवण्याच्या प्रयत्नात मौज नाही नियंत्रणामुळे जीवनाची स्वाभाविकता नष्ट होण्याची भीति आहे. त्यामुळेच त्याच्या स्वाभाविक सहजप्रवाहाच्या आश्चर्यमय विविध रीतींनी रमणीयतेची प्रीति एकसारखी वर्धमान होत असते आणि त्यात असंख्य जीवाचे सम्मेलन ओतप्रोत होत असते. ते चित्ताच्या अंतस्तलाचा ठाव घेते आणि कधींहि न अनुभवलेल्या सुखसंवेदनेची शांति चित्तावर पसरून देते. तीच प्रभूची प्रेमलीला आहे हे जो जाणतो तोच त्या लीलेचा विनम्र भक्त होतो हे माझ्या जीवा! निदान त्या भक्ताची विनम्रता तरी तुला आपल्या जीवनात मिसळून देता आली पाहिजे

४५४

तूं माझे प्रतिबिंब आणि मी तुझे प्रतिबिंब. दोन्हीहि प्रतिबिंबाचे मूळ बिंब तुझ्या-माझ्यातच आहे हे परम आश्चर्य शोधून काढण्याच्या भानगडींत मी कशाला पडू? कारण हे देवा! तू माझ्या ठिकाणीं प्रतिबिंबित झाला आहेस या आनंदातच मी गर्क आहे. यापलीकडचा सगळा तर्क मी तुझा तुलाच समर्पण करतो!

४५५

आम्हीं निद्रेत जरी एकटेच एक असलो तरी या जगाच्या पलीकडे तू एकच एक एकटा निद्रित आहेस कीं जागृत आहेस, कीं निद्रित असून जागृत आहेस कोणतीच कल्पना करवत नाहीं पण या जगात तू अणूअणूत भरलेला असून पूर्ण जागृत अशी तुझी सर्वत्र रमणीय लीला चालू आहे ही कल्पना आमच्या चित्तातच येण्याला अडचण पडत नाही पण आमच्या चित्तातच तुझ्या कल्पनाचा खेळ चालला असून आमच्या सर्वेंद्रियात आणि त्याच्या सर्व संवेदनातहि तुझीच लीला रमून राहिली आहे हे आमच्या लक्षात येत नाहीं त्यामुळे आम्ही आमच्यापासून तटस्थ राहू शकत नाही आणि हे सर्व व्यापार आम्ही आमच्याशीच चिकटवीत असतो ते सर्व तुझ्याच लीलेचे प्रकार आहेत हे भान आम्हाला व्हावे म्हणून हे प्रभो! तुझ्या ध्यानात आम्हाला केव्हा बेभान करशील?

४५६

तुझे प्रेम हेच जीवनाचे सार असून त्यातच सर्वोत्तम आणि अनंत सुख आहे, याची आम्हाला जाणीव होत नसल्यामुळे आम्ही सदैव अस्वस्थ, अल्पप्राण, असमर्थ आणि अस्थिर बनून जीवनातले माधुर्य, उत्साह आणि स्नेह गमावून बसतो. याला उपाय काय? निरुपाय म्हणून हात जोडून स्वस्थ बसणे योग्य नाहीं म्हणून हे प्रभो! आम्ही हात जोडून तुझीच कृपायाचना करीत आहोत! या आमच्या प्रयत्नाची तू कदर करशील ना?

४५७

सर्व विभिन्न दृष्टिकोण जेथे शून्य झाले, त्यामुळे जेथे कोणालाच कम्लीहि अडचण नाहीं, जेथे स्नेहाचे आवरण सहजपणे दाटून गेले आहे, जेथे हळूहळू स्थूलतेतून सूक्ष्मतेचा उतार चढत जातो, त्या आरोहणासाठीं फक्त साधकाच्या कुशल, लाघवी लालित्याची वेल उमलण्याची आवश्यकता आहे त्या आरोहण भूमिकेला गुरु केल्यास तिचीहि उणीव राहणार नाहीं पण तितकी समज प्रभुकृपेशिवाय आमच्यात कोण निर्माण करील ? खरोखर जगात सर्व सुलभता असून एका ईश्वर साहाय्याशिवाय ती सर्वदुर्लभता ठरू शकते !

४५८

अतर्बाह्य शुचितेमध्ये सर्व आचार ओतप्रोत झाल्यानतर सत्याचा वैश्विक साक्षात्कार जेव्हां अत.करणातल्या अत करणातून स्फूर्तिरूपाने बाहेर ओसडू लागला तेव्हा अंतर्योग बहिर्योग आणि उभययोगातली तुझ्या वियोग-दशेची दिशाच बदलून आम्हाला तुझ्या खऱ्या सहवासाची ओढ लागली. तीच तुझ्याकडे आम्हांला ओढून नेईल हे प्रभो ! आमची नाव तुझ्या किनाऱ्याला लागेल तोपर्यंत तू आम्हाला साभाळ !

४५९

सूक्ष्मता, माधुर्य, मार्दव आणि सौंदर्याचे केंद्रीकरण करून, स्वत.ला गौणत्वात टाकून, जेव्हा त्या अपूर्व रुचीने मुख्य साध्याचे विवर्धन करण्या-साठीं अहतेच्या विनाशाची प्रक्रिया साधली तेव्हा सतत मागेपुढे फिरणाऱ्या आघाताचा केवढा प्रचड मारा तिला सहन करावा लागला त्याची आम्हाला कल्पनाहि करवत नाहीं ! त्या आघातानाहि आत्मीयताच देण्याची तिची वृत्तिही सतत उत्साहाचा तजेला आणण्यासाठी आम्हाला नेहमी उपयोगी पडत आहे ती तुझी सदभिरुचि हे परमेश्वरा ! तू आम्हां-पासून केव्हाहि दूर करू नकोस !

४६०

आपल्या गहनतेच्या खोलीच्या सर्व बाजू अभग राखून मूलतःच स्थूलत्व दोषाच्या भजनाचे आघात स्वतः सहन करून परम मृदुल ज्ञानाजन तयार करणाऱ्या तुला तसे सामान्य लोक कोणी न विचारोत. पण जिज्ञासु तुझा शोध करून करून थकला तरी त्याचे केवळ तुझ्याकडेच ध्यान लागलेले असते म्हणून इतरेजनाच्या उपसर्गाला दूर ठेवण्यासाठी निर्माण झालेली तुझी गूढ गोपनीयता निदान जिज्ञासूला तरी त्रासदायक न ठरो एवढीच माझी हे प्रभो! तुला विनति आहे!

४६१

भोगवादाचा हट्ट किती सहन करणार? त्याची शेवटची सीमा गांठून शेवटीं प्रतिक्रियात्मक भाव तेथे उमटणारच पण तीहि प्रतिक्रिया मूलभूत नसल्यामुळे न टिकतां तिला राजमार्गावर आल्याशिवाय गत्यतर कोठले? पण त्यांतहि एकातिकता असल्यामुळे शेवटी जेव्हां सर्वात्मकतेचे स्वरूप चित्ताला लाभते तेव्हा ते विकसित कमलाप्रमाणे पावित्र्य, सौदर्य, अलिप्तता आणि सुगधाचे सारसर्वस्व ठरते तरीहि त्यात प्रभुभक्तीचा मकरद न उद्भवेल तर सर्व विकास निष्प्राण ठरेल. खरोखर परमेश्वरभक्ति ही विकासाच्या मंदिरातली अधिष्ठात्री देवता आहे हे तू कधींहि विसरू नकोस

## ४६२

आधीं रागावरण, नंतर द्वेषावरण, नतर विनाशावरण या तीन्ही आवरणाच्या पलीकडे तुझे अनावरण आम्हीं पाहिले. तेव्हा अनवश्यक गतावरणाच्या अदर्शनाचा आणि आवश्यक अशा तुझ्या अनावरणाचा स्वाभाविकपणेच आनद व्हावा. तरी अनवश्यक गतावरणे आमच्यावर आलींच का या विचाराने खेद वाटल्याशिवाय राहात नाही या खेदावर आम्ही कोणता उपाय करावा ? तुझ्या भजनसेवेत तल्लीनता हा उपाय होऊ शकेल पण तेहि खेदावरचे आवरण ठरून खेद पुन्हा अनावृत होणारच. यामुळे आम्ही व्याकुळ झालो आहोत हे प्रभो ! तुझ्या अनावरणा-प्रमाणे तूं आमचेहि अनावरण कर !

## ४६३

हे प्रभो ! तुझ्या वैभवशाली वैभवामध्ये आमच्या अनंत वियोग-व्याकुळतेच्या व्यथेची कथा गुफली गेलेली असल्यामुळे आमच्या आनदाश्रू-बरोबर पूर्वविरहाच्या व्यथेचेहि अश्रू त्यात सम्मीलित झाले आहेत याबद्दल आम्हाला तूं क्षमा कर.

## ४६४

तुझी सृष्टीमधली बहुविधता आमचे बहुविध दोष जाऊन तुझे बहुविध गुण आम्ही ग्रहण करावे यासाठींच निर्माण झालेली आहे हे आम्ही पाहिले आणि हे प्रभो ! लगेच तुझ्या-आमच्या ऐक्याचा भव्य प्रासाद आमचे स्वागत करण्यासाठीं आमच्यापुढें उभा राहिला !

## ४६५

मी माझ्याशी सृष्टीला एकरूप करून घेतो आणि सृष्टीशी मी एकरूप होतो ही क्रिया माझ्या श्वासप्रश्वासाने सतत घडविणाऱ्या हे प्रभो ! मला आणि सृष्टीला तूं तुझ्याशी एकरूप करून घेतोस आणि माझ्याशी आणि सृष्टीशी तू एकरूप होतोस ही तुझी उभयविध प्राणक्रिया माझ्या अनुभवात येऊन मी केव्हा प्राणवान बनेन ?

## ४६६

सर्वव्यापकतेने सर्व दोष विवर्जून सर्वगुणग्रहणाची, दोषानाहि गुणस्वरूप देण्याची आणि गुणातीन होण्याची तुझी चतुराश्चर्यमय भूमिका ओळखण्याची संधी हे प्रभो ! तू आम्हाला केव्हा देशील ?

## ४६७

थोराच्या थोरवीपलीकडची थोरवी तुझ्यामध्ये ओतप्रोत भरलेली असताना लहानांतल्या लहान आम्हाला ती का मिळत नाही ? आई दिसली नाही म्हणजे बालक रडून आकान्त करते. ते आईला कोठें हुडकणार ? आईच त्याला हुडकीत येत नाहीं का ? हे प्रभो ! या प्रश्नाने झालेला आमचा गोंधळ तू केव्हा दूर करशील ?

## ४६८

तुझ्या गौरवाच्या महत्त्वात जेव्हा आमच्या लाघवाची गोडी मिसळून आम्ही तुझी स्तुति करतो तेव्हा तुझ्या दिव्य स्मृतीची अनावृतता मधुराहून मधुर बनून आम्हाला कृतकृत्यतेचा अनुभव येतो. पण आम्हाला तेथेच थांबण्याचा मोह होऊ देऊं नकोस हे प्रभो ! आमची अशीच एकसारखी प्रगति होऊं दे.

४६९

कोणाच्याहि वृत्तीचा छेद न करता पवित्र षट्कोणी पात्रांच्या पारदर्शक जाळयात दूरदूरच्या फुलाच्या सुवासाने आणि मोहक रगानें भरलेल्या परिश्रमाच्या गुणाना भरणाऱ्या मधमाशाना पाहिले की तेथें आमचे मस्तक नम्र होते. दिवसानुदिवस उद्योगात गुग होऊन तुझे गुण गुणगुणणाऱ्या त्या मधमाशाच्या मधाची मधुर उपकृति आमच्यात मुरून हे देवा ! तो मधुपर्क आम्ही तुला केव्हा अर्पण करू ?

४७०

अतिशय मोकळ्या आणि अतिशय शोभिवंत आसनावर विराजमान् होण्यासाठी तशाच परमोच्च व्यक्तीच्या आगमनाची अपेक्षा असली तरी आजपर्यंत त्यावर कोणीच विराजमान् झाला नाहीं कारण ती परमोच्चता केवळ अव्यक्तातच भरलेली असल्यामुळें जरी ती सर्वांत समाविष्ट असली तरी तशी प्रतीति येत नसल्यामुळे त्या उच्चासनावर कोण विराजमान होणार ? हे प्रभो ! तू दिसत नसलास तरी निश्चित ते आसन रिकामे नाहीं तेथे तू विराजमान् झालेला आहेसच वास्तविक तुझ्या मूर्तीला शोभेसे ते आसन आहे किंवा नाही याचीच शका येते कसेहि असो निःशकपणे आम्हाला तुझी तेथे स्पष्ट प्रतीति येवो एवढीच आमची इच्छा आहे !

## ४७१

प्रत्येक पदार्थ गुण आणि शब्द यामध्ये तुझाच एकमेव परम अर्थ भरलेला आहे. तरी आमच्या अल्पतेमुळे आम्ही सर्वत्र विशिष्ट वेगवेगळे अर्थ आरोपित करतो, त्यातहि तू मुलाच्या खेळात प्रेमळ आईसारखा सामील होऊन आपला परम अर्थ दाखल करतोस पण आम्हाला कुठे याची कल्पना येते? तुझा अर्थ आणि आमचा अर्थ मिळून वास्तविक केवढी मौज निर्माण व्हावयास पाहिजे पण आमच्या अज्ञानामुळे तसे घडत नाही आणि तूं तुझा अर्थ आम्ही आमचा अर्थ हा वेगळेपणा शेवटी आमच्या अर्थाला व्यर्थता देऊं लागतो हे प्रभो! कसेहि करून ही आपत्ति टाळ. आमच्यात व्यर्थता येऊ देऊ नको

## ४७२

तुझ्या योगातले मैत्रीचे सहवाससुख, तुझ्या समरसतेतले आदान-प्रदानमय ओतप्रोततेचे सुख, तुझ्यामध्ये विलीनीकरणाचे, निरहतेचे सोऽहसुख, या तीन्ही सुखानीं तुझी एकस्वरूपता मला सर्व बाजूनी वेढून टाकील आणि मला पूर्ण वेडा करील तीच माझ्या जीवनाची धन्यता.

## ४७३

जीवनाच्या अनुभवाची अतिम अल्पता एकवटून तिचा मजवर गभीर परिणाम झाला तेव्हा माझ्या निष्फळतेचे कारण ध्यानात आले तें म्हणजे तुला सोडून जो जो अनुभव येईल तो तो निष्फळ ठरून तुला जोडून जो अनुभव असेल तो अल्पहि परतु महान् सफलतेला गाठील

## ४७४

कर्माच्या कुशलतेने सपादनीय वस्तु तुझीच साधना असून ती जोपर्यंत सिद्ध होत नाहीं तोपर्यंत कुशलतेचा केवढाहि आभास होवो तो आभासच. कारण त्यांत कुशलतेचे सार्थक नाहीं

### ४७५

एका बाजूने त्याग आणि एका बाजूने योग अशा अर्धवट स्थितींत सर्वत्याग आणि सर्वयोग साधण्याची माझी अपेक्षा लोकाना वेडसरपणाची भासली तरी तूं हात देशील तर सोडलेला किनारा कायमचा सुटेल आणि मी जोडू पाहणारा किनारा कायमचा लाभेल हे लोक न जाणोत. पण हे सर्वज्ञ प्रभो ! तुला यात न जाणण्याजोगे काहीं आहे काय ?

### ४७६

मूळ वस्तूला त्यावरच्या रूपकाने शोभा येत असते पण आम्ही सर्व तुझ्यावरचीं अनत रूपके असून आमच्यामुळे तुलाच मुळी शोभा आली नमून आम्ही सर्व मात्र तुझ्यामुळे शोभिवत झालो आहोत ! या आमच्यावरच्या तुझ्या लोभाला तुलना नाही !

### ४७७

विरोधाला कंटाळून त्याचा विकल्प किंवा पर्याय शोधण्यात पक्षांतराची भीति वाटली परतु नि:पक्ष परमेश्वराचा अतिम पक्ष डोळ्यापुढे येताच विरोध, भीति इत्यादि सर्वच भाव अभावात लीन होऊन एकच भक्तिभाव पुढें उभा राहिला आणि त्याने विरोधाच्या कटाळ्याचाहि कटाळा केला !

### ४७८

तुझी आज्ञा मस्तकावर धारण करून त्याप्रमाणे चालण्याचा प्रयत्न करतां करता माझे मस्तकच तुझी आज्ञा बनल्यामुळे तुझ्या आज्ञे-शिवाय चालणे शक्यच होणार नाहीं अशी माझी स्थिती देवा ! केव्हां होईल ?

४७९

तुझ्यापाशी विपुलतेची विपुलता असली तरी तुझे भांडार सर्वच्या सर्व एकदम खुले होत नसल्यामुळे त्याच्याविषयींच आमचे औत्सुक्य सतत टिकून राहते. आणि तुझ्या वैपुल्याचे खरे बीज होते. नाही तर हे देवा! आमच्या क्षुद्र दृष्टीने तुझी विपुलताहि आम्ही अल्प करून टाकली असती आणि आमच्या अल्पतेच्या वैपुल्याने आम्ही गुदमरून गेलो असतो!

४८०

त्या त्या काळीं त्या त्या ठिकाणी त्या त्या प्रसंगात तसतसे कसे वागावे याच्या नियमाच्या असंख्य जंत्र्यांनीं जे काम झाले नाही ते तुझ्या एकाच आत्मशुद्धीच्या मंत्राने सहज घडून त्या त्या भूमिकेवरून पाणी जसे सहज शोभिवंतपणे वळणे घेत घेत जाते तसे आमच्या सहजयोग्य वागण्यात शोभिवंतपणाचे वळण तू दिलेस नियम योग्य असला तरी तो जगात सहज आणि शोभिवंतपणे प्रगट होण्याला जर तुझा मंत्र नसेल तर ते योग्य वागणे निर्जीव यंत्रासारखे होऊन तीच एक मोठी अयोग्यता ठरेल!

४८१

हे जीवा! तुझा विजय निश्चित आहे—
जर तू अत्यंत क्षुल्लक वस्तूमधली अमूल्यता प्रकट करशील
जर तूं तिला सार्वत्रिक रूप देशील
जर तू तिच्या द्वारें स्नेह वाढवून नम्रतेचा महोत्सव निर्माण करशील
जर तू लहान-थोर सर्वांना तीत समान स्थान देशील
जर तूं तींत संकुचिततेच्या पलीकडची व्यापकता दाखल करशील
जर तू तीमधल्या सर्जकतेचा आनंद हृदयात भरून घेशील
— आणि अशा रीतीने जर तू अनंतता हस्तगत करशील.

## ४८२

जवळ असून भेट झाली नाहीं म्हणून तू माझ्या वियोगाने इतका भरून गेलास कीं तुझ्या चित्तात मीच भरून राहिलो आणि मीहि तू जवळ असून भेट झाली नाहीं म्हणू तुझ्या वियोगाने इतका भरून गेलों कीं मला तुझ्याशिवाय दुसरे काहीं सुचेच ना ! हे प्रभो ! या आपल्या परस्पर वियोगात प्रत्यक्ष परस्पर योगापेक्षांहि अधिक परस्पर योग आहे हे जेव्हां योगायोगाने माझ्या लक्षांत आले तेव्हा मला तुझी अखड जवळीक लाभली

## ४८३

स्वामीची दूरता, सेवकाचा विरोध, आत्मीयाची आत्मीयता राहोच उलट त्याच्यात सहानुभूतीचा लेशहि नाहीं, समृद्धि असून दारिद्र्य अशी विषम स्थिति तुला उगीच प्राप्त झाली नाही तिचा एक महान् हेतु आहे जेथे दूरता, विरोध, असहानुभूति, दारिद्र्य किंचित् डोकावूनहि पाहू शकत नाहीं अशा त्या प्रभूच्या परम साम्याकडे नेण्याला तिचा उपयोग आहे ! तो उपयुक्त हेतु तूं लक्षात ठेव.

४८४

जुनी भव्यता आणि नवीन विविधता सत्याच्या दोन्ही बाजूंना परस्पर स्पर्धा करीत असली तरी त्याचा त्याला मुळींच उपसर्ग नाहीं कारण ते केवळ तटस्थ असून वास्तविक त्याच्या आधारानेच सर्वांचा चरितार्थ चालू असतो परंतु त्याकडे दुर्लक्ष करून प्रत्येकाची अहंवृत्ति भ्रम निर्माण करते की हा माझाच पराक्रम आहे. त्यासाठी परावलंबनाच्या परप्रत्ययनेयतेच्या आणि चिंतेच्या आहारीं जाऊन निर्घोर शांति मिळविण्यात ते सदोदित अपयशी होतात तरी त्याच्या यशापयशांची कल्पनाच अतिशय अल्प असल्यामुळे क्षणात हर्ष आणि क्षणात शोक अशा द्विविधतेने ते आपलीं अंतःकरणे अत्यंत निःशक्त करून टाकतात दोन्ही बाजूच्या मध्यस्थ भूमिकेतले ते परम सत्य त्यांना नेहमीं बलवत्तेचा बोध देत असूनहि त्यांना तो घेता येत नाहीं ते त्याकडे नेहमीं कानाडोळा करतात अरेरे ! त्यांना त्या साम्यरूप सत्याचा बोध केव्हा कळतो ? जेव्हा त्यांची अंतिम घटका येते. हे प्रभो ! निदान ज्यांची ती घटका आली नाही त्यांना तरी तो बोध प्राप्त होवो !

४८५

" हे परमेश्वरा ! मी माझे समग्र जीवन तुला समर्पित करीन म्हणतो, तशी मला शक्ति दे " साधकाची ही प्रार्थना ऐकल्याबरोबर आतून आवाज आला, " अरे ! तुझे समग्र जीवन समग्र जीवनरूप मला परमेश्वराला नेहमीच अर्पित झालेले आहे ते अर्पित झालेले एवढेच तू ओळख. यापलीकडे तुला कांहीहि करण्याची आवश्यकता नाहीं."

## ४८६

तुझ्या येण्याच्या प्रतीक्षेमध्ये शेवटीं तूं येणार नाहींस ही निराशेची खात्री झाली. पण इतक्यात तुझे परमोच्च भूमिकेतून अवतरण होताना पाहिले तेव्हां कळले कीं प्रतीक्षा, निराशा, आशा यापलीकडची जी एक दिव्य भूमिका सर्वांच्याच ठिकाणी विराजमान झालेली असते आणि जिचे भान बहुतेक कोणालाच नसतें, त्याच भूमिकेकडे किंचित् जरी लक्ष गेले तरी तूं आमच्या अगदीं जवळच आहेस आणि आमच्यापेक्षा किती तरी पण तूच आमची प्रतीक्षा करीत आहेस कीं केव्हा आमचे थोडे तरी लक्ष तुझ्याकडे जाते !

## ४८७

सत्यप्रेम आणि सत्संग, भक्ति आणि तपस्या, स्वावलंबन आणि अनासक्ति, अन्यायपरिमार्जन आणि सर्वसेवा एकामागून एक या जोड्या ज्याने जोडल्या त्याला जगात तोड कोठून असणार? तो अतुलनीय बनून सर्वांच्या हृदयाचे हृदय बनेल यात आश्चर्य कसले?

## ४८८

मला स्वतःला निर्गमनाची घाई नाहीं कारण हेहि तुझेच स्थान आहे. पण तुझे बोलावणे आल्यावर एक क्षणहि थांबण्याची शक्यता नाही या दृष्टीनेच माझे येथे थांबणे मी सावधानतेनेच विभूषित केले पाहिजे ही सावधानता तुझे स्मरण करून देणारी असल्याकारणाने खरोखर भूषणाचेहि भूषण आहे आणि तुझ्या त्या दिव्य परम धामाकडे जावयाचे निश्चित असल्यामुळे तिच्यामध्ये माझे हे स्थान सोडण्याची हुरहुर असण्याचे कारण नाहीं. पण ती हुरहुरहि तू तत्क्षणीं दूर करशील आणि मला जेथून पुन्हा कोठेंहि निर्गमनाची जरुरी नाहीं अशा येण्याजाण्याच्या पलीकडच्या स्थानीं नेशील याविषयीं मी निःशंक आहे.

## ४८९

दररोज नवीन नाटक रचले जात आहे. पण पात्रे मात्र वेषांतर करून तींच तींच येत आहेत. त्याच्या वेषांतराने आणि प्रसंगान्तराने त्याचे मूळ रूप झाकले तरी त्याच्या मूळ रूपाची झाक त्याच्या प्रत्येक हावभावावर पडल्याशिवाय राहात नाहीं. ती दडविण्याचा त्याचा प्रयत्न किती यशस्वी झाला यावर नाटकाची यशस्विता ठरवली जाते. हे माझ्या जीवा ! या नाटकी कृत्रिम यशस्वितेपेक्षा अकृत्रिम यशस्विताच तुझी खरी यशस्विता आहे. कारण तूंहि या जगताच्या रंगभूमीवर एक पात्र बनून आला आहेस !

## ४९०

आकाशाच्या भव्यतेने तेथे कोणालाहि दूरता अथवा भय वाटण्याचे कारण नाही कारण तेथे आत्मीय सुंदरतेची दीक्षा लाभलेली आहे, तेथे रमणीय ध्येयस्मरणाचे सातत्य सदोदित रंगलेले आहे सत्कार्याच्या सन्मान्य मागणीला तेथे अहमहमिकेने उचलून धरले आहे त्याचप्रमाणे तेथे मननचिंतनाची वृत्ति ध्यानाच्या परमोच्च भूमिकेवर आरूढ झालेली आहे. या अपूर्व पुण्याइचे मूळ कोठे आहे ? हे माझ्या जीवा ! लक्षात ठेव ते केवळ पराकाष्ठेच्या एकनिष्ठ प्रभु-दास्यात दडलेले आहे.

## ४९१

मातृवात्सल्याच्या उत्कटतेने वैश्विक सख्याची विशाल भूमिका मनोभूमिकेत खोल रुजल्यावर ती महावाक्याच्या मोहक स्वरूपात प्रगट होत असता तिला मोहाचे आवरण केव्हाहि अडवूं शकत नाहीं. परम विशुद्ध जीवनाच्या दिव्य प्रवाहात महाबोधाच्या तेजोवलयाने तप पूत होऊन पूर्वपुण्याईची पूर्ण साठवण करून एकाच दृष्टिक्षेपात सर्वात्मतेचे सार ग्रहण करून ती विश्वकल्याणाच्या सत्कार्याची ठिकठिकाणी आयोजना करूनच अंतर्धान पावते. म्हणून हे माझ्या जीवा ! तूं तिचीच कास धर. आत्मकल्याणासाठीं विनाकारण इकडे तिकडे धावाधाव करू नकोस.

## ४९२

आम्हाला सुख देऊन इहलोकातलें आमचे वास्तव्य तू सुसह्य करतोस आणि आम्हाला दु:ख देऊन इहलोकातले वास्तव्य दुःसह आहे हे तू दर्शवितोस. यात दुःखासुखाच्या पलीकडचे, दुःखासुखाला न जुमानणारे परम सौख्य आम्ही मिळवावे हाच तुझा हेतु असतो. पण त्या परमसौख्याची ओळखच नाहीं तर ते मिळविण्याचा प्रयत्न आम्ही कसा करणार ? यासाठी हे प्रभो! आमची त्या परमसौख्याशी ओळख करून दे. पण तुला भीति वाटते का कीं तशी ओळख करून दिली कीं तुझीहि ओळख पटून आम्ही त्या परमसौख्यालाहि मोडून तुझ्याच पाठीमागें लागू ?

## ४९३

विश्रामाची सर्व साधने सर्व प्रकारांनी सेवेसाठी हात जोडून पुढें उभी असून परकीयता आणि बाह्यता जोपर्यंत भासत राहते तोपर्यंत विश्राम कोठला ? खरोखर आत्मीयतेतच विश्राम भरला आहे! हे विश्वाच्या विश्रामा! आम्हाला तुझ्या कृपेमध्ये घोळलेली आत्मीयता सर्वत्र दिसू दे त्या आनंदाच्या निजधामामध्येच जीवनाची साधना रंगून जाऊन आम्हाला तुझ्या भजनीं लागू दे!

## ४९४

मातृकृपेच्या पवित्र मंदिरामध्ये संतसज्जनांचा वेदमय आशीर्वाद प्राप्त केल्यावर पुढच्या दासविश्राम धामाच्या सर्वोच्च स्वागत समारंभाची आपोआपच तयारी होऊन तेथे विपुल दैवी संपत्तीच्या साम्राज्याचे महाद्वार उघडले जावे हे क्रमप्राप्त असले तरी तेथे मोह पडून तुझे जराहि विस्मरण होऊ देऊ नकोस आमच्या सर्व अवस्था वरवरच्या असून तुझ्या अंत:स्मरणाच्या मूळपीठिकेवरच हे देवा! त्याची उभारणी कर.

## ४९५

घोर निद्रेत पडलेल्याना जागृतीची द्वारे उघडून देऊन आप्तत्वाच्या मायेची मोहिनी पसरवून उल्लसित करणारे ते दोघे माता आणि गुरूची बरोबरी करतीलच असे कोणी सांगू शकत नाही. पण माता आणि गुरूच्या कृपाछत्राची योग्यता निःसंशय त्याच्यापाशी होती. त्यामुळेंच क्षणभराची भेट घेऊन ते पुन्हा येऊ म्हणाले तेव्हा निद्रेतून उठलेल्याच्या डोळ्यात उपकृतीची जाणीव चमकली आणि ते प्रतीक्षेच्या सावधानतेमध्ये प्रविष्ट झाले ठरलेली वेळ आली. आणि जीवनाला उजाळा देणारी त्याची ती जोडी पाहून आकाशातल्या गुरुशुक्राच्या रमणीय युतीची आठवण झाली. खरोखर देवा! हीच ज्ञानप्रेमाची युति आमच्या हृदयाकाशात तीच गोड स्मृति सतत उमटवीत राहील असे कर!

## ४९६

जसजशी साधनेची उंची वाढत गेली तसतशी जबाबदारीची जाणीव सावधानतेच्या बरोबरीने अग्रेसर होत चालली समोवतालचा सर्व दृष्टिक्षेप जरी विशाल कर्मशून्यतेने भरलेला होता तरी महान् यत्नानंतरची ती सिद्धावस्था होती तेथे जीवाच्या कोणत्याच हालचालीचे दर्शन नसले तरी ज्यात अनंत प्रचंड क्रिया समावेशल्या जातील असे ते गंभीर सर्ववेष्टण होते. त्याचे एका क्षणात अनावरण झाले आणि तेथे तुझी हास्यमय आनंदमूर्ति जेव्हा आम्ही पाहिली तेव्हा आम्हाला आमच्या साधनेची मिथ्या माया कोठल्या कोठे पार विरून गेलेली दिसली. हे प्रभो! या साधनेच्या मायेतून तूं आम्हाला आधीच का सोडवत नाहीस? आम्हाला विनाकारण यातायात का करावी लागते?

४९७

आमच्या साधनेच्या ध्यानावस्थेमुळे एकत्वाचे भान करून देणारा अधार जिकडे तिकडे पसरलेला होता. त्यामुळे साधनेची प्रगति अतिशय वेगाने आणि कोणत्याहि अडथळ्याशिवाय चाललेली होती. स्मरणात असलेल्या साधक मित्राच्या किंवा ओळखीच्या आप्तइष्टाच्या भेटी घेत पुढे जावयाचे पण ती अप्रत्यक्ष गोष्टहि साधनेच्या वेगभरात मागे पडली तरी पण आम्ही कोणाचीहि भेट न घेताच सर्वसमावेशकपणाने सर्वांना भेटत भेटत पुढे जात होतो या आमच्या एकताततेने चाललेल्या ऐक्याच्या प्रगतीवर प्रसन्न होऊन त्या जगन्मातेने एकदम आपल्या दर्शनाची पूर्वप्रभा आम्हाला दाखवली. त्या प्रभेचे तेजोवलय फाकून आमच्या मार्गावर सौंदर्याच्या रेशमी पायघड्या घातल्या गेल्या. आणि आम्ही न चालताच तिच्या अर्थात् आमच्याहि निजधामाकडे आपोआप ओढले जाऊं लागलो ते निजधाम जवळ जवळ येत असताना आमच्या प्रगतीचे सार्थकच जणू आमच्याकडे धावून येत आहे असे भासले त्याने दिव्य तारकाहारासारखा हार आम्हाला देण्यासाठी पुढे केला पण त्याचा स्वीकार न करता आम्ही शेवटी ते निजधाम गाठले आणि साधनेच्या वेगाने अतिशय थकून आल्यामुळे आमच्या साधनेचे कौतुक करून त्या जगन्मातेने आपल्या मांडीवरच आम्हाला निजविले. हे जगन्माते ! आम्ही धन्य झालो ! तू आमच्यावर तुझ्या मायेची पाखर घातलेली आहेस आता आम्हाला कसलीहि आकांक्षा नाही !

## ४९८

तेथे आम्ही काय पाहिले ? एकच नव्हे अनेक उपासनांचे भिन्न भिन्न आकारप्रकार रंगरीतीने निःस्तब्ध सामूहिक एकीकरण आणि त्यातून चाललेले आत्मबोधाचे तितकेच भावपूर्ण सामूहिक आवर्तन आणि तेहि समोरच्या ध्येयमूर्तीवर सतत लक्ष ठेवून हे प्रभो ! आमच्या सर्व वृत्ति तेथल्या उपासना प्रकारात रूपांतरित कर, जेणेकरून आम्हाला इतरत्र वृत्ति नारूण्याचा कोणताहि उपसर्ग पोचणार नाही !

## ४९९

त्या उत्तुंग भयाणतेने आणि प्रचंड अस्ताव्यस्ततेने आम्ही अडथळा समजून भीत होतो. पण जेव्हा आम्ही जवळ गेलो तेव्हा चित्तातल्या सर्व अडथळ्याचे दर्शन करवणारी आणि त्यातून पार करवणारी ती रमणीय नागमोडी सोपानपरंपरा आहे असे आम्हाला आढळले. आमच्या वक्रतेला नागमोडीने ती सरळ करून वर नेत असता आमच्या पूर्व-भूमिकेतली आत्मनिरीक्षणाची दृश्ये तिने आमच्यापुढे ठेवली. आणि प्राणाच्या पेल्याने नवजीवनाचे अमृतपान तिने करविले तेव्हा आम्हाला पूर्णपणे समजले की जगात आम्हाला जो जो अडथळा वाटतो तो तो आम्हाला ईश्वराकडे नेणाऱ्या साधनेचे आवाहन आहे !

५००

कोणा एकावरच भार न टाकता आलटून पालटून एकमेकाच्या सोईने, एकमेकाच्या सहकार्याने, हसत खेळत एकमेकाना एकमेकाच्या उणीवा दाखवत आणि एकमेकाचे गुणग्रहण करीत, सावधानतेसाठी गतजीवनातली क्षुल्लक वाटणारी पण अतिशय बोधप्रद स्मरणे प्रभु-स्मरणाची प्रतीके मानून त्याच्या आठवणीच्या मधुर रसात तुमचे जीवन-कार्य चालू द्या. तुमच्याकडून अशक्य वाटणारी कार्येहि पार पडतील ती झाल्यावर ती आम्हीच का केली असा मभ्रम पडेल. तरीहि तुमची अतःशक्ति नम्रतेच्या परमोच्चतेला गाठून अधिकाधिक महत्कार्यासाठी तयार राहील हा अतरात्म्याचा मदेश ऐकल्यावर आमचे अनैक्य कोठल्या कोठे पार पळून गेले आणि आम्ही सर्व महत्कार्याच्या एकमूत्रात बाधले गेलो

५०१

( १ ) एकान्तवासी परमश्रेष्ठाचा शुभ वारसा
( २ ) पराकाष्ठेच्या व्यवस्थेची वत्सलता
( ३ ) रात्रदिवस सर्वत्र दिव्य मदेशवाहकाची वृत्ति
( ४ ) परम नम्र जिज्ञासूच्या ज्ञानाच्या निश्चिततेसाठी अक्षर-मुद्रेचा उपदेश
( ५ ) प्राणसजीवनाच्या प्राप्तीसाठी तपःपूनता

—देवा ! तू काय काय दिलेस त्याची मी गणना कशी करू ? तिचे स्मरण करताना शब्द निःशब्द होतात !

५०२

माझ्या मित्रा! तुला याची कल्पनाहि नसेल की तुझ्या लीला-विनोदाने भरलेल्या भाषणानी व्यवहाराची जडता घालविणारा खेळकरपणा– नुसत्या त्याच्या स्मरणानेहि अंतःकरणाला आश्वासन देत असतो! तू किती तरी दूर, कालाने आणि स्थलाने, वृत्तीने आणि विचाराने. पण किती तरी जवळ अंतःकरणातल्या अंतःकरणात! हे देवा! खरोखर आमचे सर्वांचे खरे वास्तव्य तू अंतःकरणात राहून अंतःकरणातच एकत्र केलेस ही केवढी समाधानाची गोष्ट आहे!

५०३

त्याची भेट झाली नाही. तो जेथे जेथे जातो तेथेहि तो कोणाला दिसला नाही. तेव्हा त्याची स्वस्थता तर बिघडली नसेल ना? म्हणून आम्ही अस्वस्थ झालो आणि सचिंत होऊन त्याच्याकडे धाव घेतली. तो तो केव्हाच निश्चिंतपणे परस्परसमन्वयाच्या कार्यासाठी दूर गेला म्हणून कळले तेव्हा लक्षात आले की चितेच्या पलीकडचे समन्वय-कार्य हे परमेश्वरा! तू कसकसे आणि किती प्रकारानीं– कळो की न कळो– सतत करवीत असतोस. खरोखर तुला सीमिततेने पाहणे बरोबर नाही तरी आम्ही म्हणतो की, ज्या अर्थी तू समन्वयाची मूर्ति आहेस त्या अर्थी तूं आम्हाला आपणात समन्वित करून घे!

५०४

आम्ही जे ध्यान, जी उपासना, जे कर्म, जी सेवा, जे काही करतो ते सर्व केवळ कसरतीसारखें आहे. कसरतीने स्नायु मजबूत बनतील. पण या सर्व कसरतीलाच स्नायु समजणे ही केवढी भ्राति आहे ! त्या भ्रातीप्रमाणेच आमच्या जीवनाचे अस्तित्व ही तुझ्या दिव्य जीवनाच्या अस्तित्वाच्या प्राप्तीची एक कसरत आहे तिला तुझे सर्वास्तित्व समजण्याची मूढता आमच्या ठिकाणी न राहावी एवढयापुरते तरी ज्ञान हे परमेश्वरा ! तूं आम्हाला दे !

५०५

त्याने काही फळे पुढे ठेवली आणि लवून नमस्कार केला त्या फळाच्या निमित्ताने मूर्तिमंत नम्रताच फलीभूत झाली खरोखर त्याच्या भक्तिनम्रतेच्या साफल्याचे अतर्दर्शन कितीहि बाह्य प्रकटीकरण करूं म्हटले तरी होणे शक्यच नाही ते प्रगटीकरण न होण्यात, त्याचे किंचित्मात्र दर्शन होण्यात अव्यक्ताच्या व्यक्ततेच्या लीलेचे जे सौदर्य भरलेले आहे ते काही औरच यात शंका नाही ते झरोक्यातून घेतलेले क्षणिक किंचित् दर्शन. पण अनंताच्या दर्शनाचे महाद्वारच हे देवा ! आज या निमित्ताने तू ते महाद्वार उघडें केलेस. त्याबद्दल कधी तरी मी तुझा उतराई होईन काय ?

५०६

तुला धर्मग्रथात ग्रथित करण्याचा ज्यानी प्रयत्न केला त्याच्या परमोच्च विशुद्ध हेतूबद्दल आम्हाला मुळीच शका नाही त्याच्या त्या सग्रथनामुळे आमच्यासारख्या असख्य लोकावर खरोखर मोठे उपकार झाले आहेत परतु प्रत्यक्ष अनुभवाच्या अभावी त्या ग्रथनात आम्हीहि ग्रथित होऊन जातो आणि आम्हाला तुझ्या अनुभूतीचा खोटा आभास होऊ लागतो. आणि खऱ्या अनुभवापासून आम्ही उत्तरोत्तर दूर होऊ लागतो तेव्हा त्याच्यापासून दूर राहून तुझ्या अनुभवाच्या पायावर उभे राहण्याची तपश्चर्या करण्याची प्रेरणा तुझ्यावाचून कोण देणार? कारण आम्ही त्याच्यापासून दूर झालो म्हणजे तुझ्यापासूनच दूर होत आहोत असेच सर्वत्र मानले जाईल. आणि ज्यात सर्वांचे बहुमत असेल

५०७

आमची इद्रिये, आमचे मन, आमची बुद्धि, आमचा जीव, आमचा प्राण या सर्वांनी फार मोठा प्रयत्न केला आणि त्याला जगातल्या दृश्यानेहि मोठा हातभार लावला पण त्यातून निष्पन्न काय झाले तर क्षणिक माहितीवजा ज्ञान, काही व्यवहारोपयोग, आणि काही उपभोग आम्हाला तर तुझें नित्य-ज्ञान, तुझा नित्य-योग, आणि तुझे अखड सुख हवे आहे ते या सर्वांना बाजूला सारून तुझ्यामुळेच मिळेल. अथवा या सर्वांना तुझ्याकडे लावून ते मिळेल दोन्ही तऱ्हेचा प्रयत्न आम्ही करीत आहोत पण तो साधत नाही. त्या प्रयत्नाला हे प्रभो! तू हातभार लावणार नाहीस का?

५०८

स्वतःसकट सर्वांचे वास्तव्य आमच्यात केंद्रित करून आणि स्वतःसकट आमचे आणि सर्वांचे वास्तव्य विकसित करून तू जो खेळ उभारलास त्यात केंद्रीकरणाची आणि विकेंद्रीकरणरूप विकासाची प्रक्रिया हा तू आभासच निर्माण केलास ना ? या आभासाचा खेळासाठी कितीहि उपयोग असला तरी खेळ संपल्यानंतर तो निरुपयोगी ठरून केवळ आमचे आम्हीच उरतो आणि त्यामुळे तुझा तूच सर्वांचे सर्व अशीहि स्थिति निर्माण होते आम्ही विचारतो की केंद्रीकरण, विकास किंवा तिघांचे एकटेपण– हे सर्व सोडून दिले तर काय एक नाहीपणच उरेल ना ? जर तसे असेल तर त्या नाहीपणातले आहेपण हेच शेवटचे सार ठरते. तेच हे प्रभो ! तू आमच्याकडून ग्रहण करीव.

५०९

हे परमेश्वरा ! तुझी सर्वोत्तमता सर्वव्यापक असली तरी शेवटीं अधोभागी कर्मप्रवृत्तीहून तू मध्यभागच्या ज्ञानग्रहणाने उत्तम आहेस, मध्यभागच्या ज्ञानग्रहणाहून तूं वरच्या अतश्चिंतनाने उत्तम आहेस, आणि अतश्चिंतनाच्या वर तू एकटाच सर्वोत्तम आहेस हे तुझे सर्वोत्तमत्व खरे असले तरी आम्ही तर म्हणतो की तू अधोभागच्या कर्मप्रवृत्तीहूनहि अकर्मरूपाने सर्वोत्तम आहेस त्यामुळे आम्हाला कोठूनहि सर्वोत्तमता ग्रहण करण्याची शक्यता आहे. पण ती आमच्या ध्यानात कशी येईल हा प्रश्न तुझ्या कृपेनेच सुटू शकेल

५१०

क्षणात घनीभवन, क्षणात वैरल्य, क्षणात स्वच्छता ! आम्ही समजावे तरी काय ? आम्ही काही तरी समजून व्यवस्थेच्या मागे लागतों. पण ती व्यवस्था तुझ्या क्षणिकत्वाच्या खेळामुळे नेहमीच टिकत नाही. मग झालेल्या अव्यवस्थेत आम्ही पुन्हां व्यवस्था निर्माण करण्याचा प्रयत्न करतो पण तुझी व्यवस्था काय ते आमच्या कधीच ध्यानात येत नाही. ते ध्यानात न आले तरी तुझी काही तरी सर्वव्यापक व्यवस्था आहे एवढें तरी आमच्या ध्यानात येऊ दे !

५११

तुझ्यासमोर रात्रंदिवस अगदी सहजतेने चाललेले चैतन्यकार्य दुर्लक्षून तू व्यर्थ इकडे तिकडे फिरत असतोस या चैतन्यकार्याशी समरस होशील तर तुझी ही जडतेकडे जाण्याची प्रवृत्ति नाहीशी होईल आणि तुझ्यासमोर चाललेल्या चैतन्यकार्याहूनहि तुझ्या ठिकाणी स्वाभाविक असलेले चैतन्याचे भांडार तुला प्राप्त होईल. सूर्याच्या हजारो किरणाप्रमाणे ते चित्सूर्यकेंद्र मग सगळीकडे ज्ञानप्रकाश टाकून जडतेचा अंधार घालवील हे माझ्या मना ! यासाठी आत्मनिरीक्षणपूर्वक प्रयत्न कर. तो अल्पहि साधला तरी मोठी सिद्धि लाभेल याविषयी मुळीच संशय नको

## ५१२

तुम्ही उभयता येऊन अत्यत नम्रभावाने पलीकडून अलीकडे येणाऱ्या तत्त्वाच्या मेळाव्याचे अलभ्य दर्शन होईल हा शुभसंदेश ऐकविला इतकेच नाही तर त्या तत्त्वाचे स्वागत करण्यासाठी आपल्यामध्ये आम्हाला सामील करून घेण्याचेहि पुनःपुन्हा नमस्कारून विनविले ही केवढी कृपा ! त्या कृपेच्याहि पलीकडे आम्हाला त्याच्या आगमनप्रसंगी स्वतः येऊन घेऊन जाण्याची व्यवस्थाहि करण्याचे तुम्ही सांगितले ! आमच्यासारख्या प्राकृताना ही जडाजड प्रकृतीची व्यवस्था कोठून कळणार ?

## ५१३

जेव्हा आढळून आले की आम्ही मागे पडलो आहोत, तेव्हा पुढे जाण्याची ओढ अनावर होऊन आमचा वेग इतका वाढला की पुढच्यानाहि आम्ही मागे टाकले खरोखर पतिताच्या उत्थानाला सीमाच नाही. ही गोष्ट अपतिताना कोठून कळणार ? त्याच्या हिशोबात ती गोष्ट बसवण्याजोगी नसतेच त्याना वेग येण्यासाठी पतित्वाची जरूर आहे असे आम्ही कधीच म्हणणार नाही पण आपले अपतितत्व हें सापेक्षतेने पतितत्वच आहे एवढे त्याना कळलेच पाहिजे ते कळेल तर आमच्या वेगाचे रहस्य उलगडेल

## ५१४

उपवासाने भूक वाढली. पण तिचे शमन जेवण्याने होणार नाही. हे देवा ! हा उपवास अन्नाचा नाही. दीर्घकालपर्यंत तुझ्या आत्मिक पोषणाच्या अभावी झालेली ही या अगतिक जीवाची उपासमार आहे. ही घालविण्यासाठी मी तुझ्या दारी भिकारी होऊन आलो आहे. तुझ्या मिष्टान्नाची मला आशा नसली तरी एखाद्या तुकड्याचीहि मी आशा करू नये का की जेणेकरून माझी क्षुधा तेवढ्यापुरती तरी शांत होईल ?

## ५१५

केवळ वरवरच्या रूपांतराने माझें समाधान होणार नाही. मला आता पूर्ण परिवर्तनाचीच तहान लागली आहे सद्यःस्थितीत जगणे हे मरणाहून मरण वाटत आहे. अशा निकरावर येऊन ठेपल्यावर हे जीवा ! तुझा उत्कर्ष दूर नाही तुझा उत्कर्ष दुसऱ्या कोणाच्याहि हाती नाही. तो तुझ्याच तळमळीमधून उदय पावेल.

## ५१६

देवासाठी अहमहमिकेने फुलें तोडण्यासाठी येणाऱ्या मुला ! तुला हें माहीत नाही की तूहि एक देवान निर्माण केलेले मधुर फूल आहेस. आणि तुला स्वतःलाच देवाला अर्पित होण्याची बुद्धि व्हावी यासाठीच हें फुलें तोडण्याचे काम ओघानेच तुझ्याकडे आलेले आहे.

५१७

स्वतःच्या किंवा दुसऱ्या कोणाच्याहि चरित्राची आवड ते प्रसंग माझ्याशी किंवा माझ्या आवडीशी जुळलेले आहेत म्हणूनच निर्माण झालेले असल्याकारणाने बोधापेक्षाहि ममत्वाचाच त्यात मोठा भाग समुद्भूत होत असतो. म्हणूनच हे माझ्या जीवा ! सर्व चरित्र फेंकून केवळ आत्मबोधच का ग्रहण करीत नाहीस ? तुला सगुण आधार हवा असेल तर सर्वत्र सर्व काळी चालू असलेली परमेश्वरलीलाच का पाहात नाहीस ?

५१८

दोन्ही तरंग चित्तात तरंगत राहतात. माझें साधन माझा अडथळा. त्याची चिंता सोडून तू त्या प्रभूच्या दिव्य जीवनावर कमलाप्रमाणे नुसता तरंगत राहा. त्याचा तुला स्पर्शहि होणार नाही

५१९

मधून मधून तू मजकडे यावयास आणि मी तुजकडे यावे या क्रमामुळे तुझ्या माझ्यामध्ये आणि माझा तुझ्यामध्ये प्रेमरूप समावेश होत राहून जीवनाचे रिकामें पात्र भरून जाते आणि आनंदाला भरते येते. देवा ! ही गोष्ट खरी पण या क्रमाची सांगता तुझ्याम'झ्यामधल्या पूर्ण ऐक्यामध्ये केव्हा होईल ही हुरहुर लागल्यामुळे आता जीव अधीर झाला आहे ही गोष्ट तू लक्षात घे आणि मला आपणात मिळवून घे

५२०

तुम्हाला परस्परात खरेपणा जोपर्यंत दिसत नाही तोपर्यंत तुमचे स्वतःचे खरेपण तुमच्यातच अवरुद्ध होऊन ते गुदमरून मरत आहे. याकडे तुमचे लक्ष केव्हा जाणार ?

## ५२१

त्याने निरपेक्षतेने लावणी केली पण अपेक्षेने लावणी करणाऱ्यापेक्षा त्याची मेहनत किती तरी जास्त होती. मेहनत करतेवेळीच त्या मेहनतीला समाधानाचे अमृतफळ लागलेले दिसत होते. पण येणाऱ्याजाणाऱ्याना ते कोठून दिसणार? ते फळ केव्हां लागणार हाच प्रश्न विचारीत लागलेले फळ हे फळ नव्हे आणि न लागलेले फळ हेच खरे फळ आहे हें त्या बापड्याना कळणे शक्यच नसल्यामुळे त्याच्यापाशी फलविषयक विफल चर्चा करण्यात त्याने काळ मुळीच घालवला नाही आणि तो आपल्या मेहनतीत पुन्हा निमग्न झाला! लोकाचे काहीहि असो, आम्ही तुझी प्रार्थना करतो की देवा! आम्हाला त्याच्यासारखी अवस्था केव्हा प्राप्त करून देशील?

## ५२२

जे जे गेले, जे जे आहेत आणि जे जे असतील ते सर्व तू माझ्यातच दडवून ठेवलेस आणि मधून मधून ते मला दाखवून मला विस्मयचकित करतोस माझ्यातलेच ते तू काढून मला तू भासवितोस की ते तुझ्यात आहेत आणि तू त्याना माझ्यापुढे प्रकट करतोस पण हे प्रभो! हा तुझा लपडाव आहे तू हि माझ्यातच असल्यामुळे हा लपडाव मला लवकर उमगला आणि त्यात तू मला सापडलास हे माझें परम समाधान आहे!

## ५२३

मी मोठा या नात्याने तो आशीर्वाद दिला. मी ते हितमंगलाच्या तीव्र शुभेच्छेने पत्र लिहिले पण हे लहानानो ! मी खरोखर मोठा आहे का हा माझा मलाच प्रश्न पडतो आणि मला इच्छा होते की, हा मोठेपणा आणि त्यामुळे करावे लागणारे खऱ्या तळमळीचे का होईना— सर्व उपचार सोडून मी तुमच्यामध्ये तुमच्याप्रमाणेच खेळण्याला केव्हा येईन ? केव्हा मी तुम्हाला लहान होऊन भेटेन ? आणि माझें सर्व मोठेपण विसरले जाईल ?

## ५२४

प्रमाणशून्य स्थितीत सर्व मीच मी पाहिले तेव्हा बाहेरून कमी-अधिक प्रमाणात माझ्या एकवटलेपणाच्या भोगाचा मला उलगडा झाला आणि मीच मला जवळून दूर करीत करीत प्रमाणाच्या स्थितीला आणीत आहे याची प्रतीति आली. खरोखर हे जग असंख्य मीच्या उभ्या-आडव्या ताण्याबाण्यानीं विणलेले वस्त्र असून ते देवावर घातलेले पांघरूण आहे.

## ५२५

नित्यपरिचयामुळे आम्हाला कधी कधी घडलेल्या घटनामुळेच आश्चर्याची प्रतीति येते आणि नित्य सावधानतेऐवजी आम्ही तात्कालिक सावधानतेला अंगीकारतो पण ती हळूहळू ओसरून जाते, हे प्रभो तूं आश्चर्याचेहि आश्चर्य आहेस हे आमच्या चित्तात ठसून तुझ्या नित्य-स्मरणाची सावधानता आम्हाला केव्हा प्राप्त होईल ?

## ५२६

तिच्या प्रगटीकरणात ते व्यर्थच जात नसले तरी तिच्या अप्रकटीकरणात तिचे सामर्थ्य साठून ते वाढत जाईल. अपरिहार्यतेची अप्रकटता दुःखाला कारण होते त्याऐवजी ही स्वेच्छेची आत्मिक अप्रकटता परमसुखाचा आधार बनेल. आणि मग सर्वत्र परमसुखाचे प्रकटीकरण करील.

## ५२७

आमच्यावरच्या सर्व तऱ्हेच्या आघातापासून आम्ही सुरक्षित रहावे म्हणून तुझी जी अगदी सर्व बाजूंनी बांधलेली व्यवस्था आहे ती खरोखर अनुपम असून तिचे रहस्य आम्हाला मुळींच कळत नाही. तिच्याप्रमाणे आम्ही आमच्या चित्ताला सर्व बाजूंनी सुरक्षित करावयाचे आहे, हे आम्ही विसरतो आणि तिच्या द्वारेच चित्ताला स्वैरतेच्या भयानक दरीत लोटून देतो. पहारेकऱ्याकरवी चोरी करविण्याच्याप्रमाणे त्यामुळे आमचा देह निरुपयोगी आणि अपवित्र होतो यासाठी हे प्रभो ! तू आमचे चित्त आमच्यावर सोडू नकोस. ते तुझ्याच ताब्यात घे आणि तुझ्याच सुसंरक्षणाच्या व्यवस्थेत त्याला व्यवस्थित कर

## ५२८

शब्दात अडकलेला अर्थ सापळ्यातल्या सिंहाप्रमाणे प्रेक्षणीय वाटला तरी अरण्यातल्या मुक्त वनराजाची रुबाबदार ऐट त्याला कोठून येणार ? त्यासाठी अर्थाला शब्द बद्ध करण्यापेक्षा आमच्या जीवनात त्याला मुक्त विहार करू देण्याची वृत्ति हे परमेश्वरा ! आमच्या अंतःकरणात तू तुझ्या स्मरणाच्या योगाने अखंड ठसवून दे.

## ५२९

आम्ही ज्याचा शोध घेत आहोत तो कशाचा याचा आधी आम्हाला शोध घेतला पाहिजे. कारण आम्हालाच आमच्या शोधाची ओळख नाही. ती ओळख खरोखर जर पटेल तर तो शोधच आम्हाला शोधीत येईल

## ५३०

आम्ही आमच्या मनात तुझ्यावर परस्परविरोधी सग्रहाचा आरोप करतो, कारण आमच्यातच परस्परविरोध भरलेला असतो परस्परविरोधीच्या सग्रहाची तुझी सर्वसग्राहक वैश्विक दृष्टि आम्हाला जरी विषम वाटत असली तरी संताना तुझ्या परमसाम्याची परमरमणीयता त्यांत विकसित झालेली दिसते हे प्रभो ते सतांचे अनर्दर्शन आम्हाला केव्हा लाभेल ?

## ५३१

जायचे नसले तरी जाणे, करायचे नसले तरी करणे, गायचे नसले तरी गाणे प्रगत कोठून होणार ? त्यात मदना न येईल तरच नवल पण आम्ही तेच सतत करीत उत्तरोत्तर मद होत जात आहोत हे पाहून हे प्रभो ! तुला खरोखर हंसू येत असेल. ही खरोखर हसण्याजोगीच गोष्ट आहे. पण केवळ हंसण्याची ही वस्तु नाही हीमध्यें तुला पडावेच लागले नाही तर परिणामी आमच्या रडण्याला सीमा राहणार नाही इकडे तुझें ध्यान असू दे.

## ५३२

काही तरी करण्यापेक्षा मुळीच काही न करणे आणि मुळीच काहीं न करण्यापेक्षा काही तरी करणे या दोन्ही गोष्टी आलटून पालटून आमच्या समजुतीप्रमाणे आम्ही आचरीत असतो परंतु त्यामुळे समाधान लाभत नाहीं जेव्हा करणे आणि न करणे सर्व तुझ्यातर्फे होईल तेव्हाच समाधान लाभेल. तेव्हा हे प्रभो ! ते तू सर्व आपल्या हातात घे एवढेंच आमचे म्हणणे आहे

## ५३३

त्या तिघानी सतत सर्व काहीं तोडण्याचा उद्योग चालविला असला तरी तो कधींहि संपणार नाहीं हो खात्री असल्यामुळे त्यात सामील न होता मन अतुलनीय असा उद्योग शोधू पाहात आहे पण त्यालाहि ते तिघे आपल्या कक्षेत ओढीत असतात. त्यामुळे त्याची सतत ओढाताण होत असते ती ओढाताण, तूच आम्हाला आपणाकडे ओढून घेशील तेव्हा थांबेल हे प्रभो त्यासाठी आम्हालाहि तुझीच सतत ओढ लागू दे !

## ५३४

तो एकाएकी आला आणि त्याने अकल्पितपणे आपले सर्व आत्मनिवेदन केले त्याचीं तीं तीं दर्शने, तन्निमित्त घडलेले ते ते प्रसंग, त्याच मार्गे त्यासाठीं करावा लागलेला प्रयास हे सर्व ज्या शब्दात त्याने मांडले ते आंतरिक प्रेमाचे शब्द असल्यामुळे त्याच्याबरोबर घरबसल्या त्याने केलेली यात्रा आम्हाला अनायासे घडली त्यामुळे अंतः-करणात जो पवित्र जिव्हाळा निर्माण झाला त्याने त्याच्याप्रमाणे आम्हीहि तुझ्यापुढे आत्मनिवेदन करण्यासाठीं येऊ त्या वेळीं हे प्रभो ! तूंहि आम्हाला आमच्या निवेदनासह आपल्या हृदयात जागा दे.

५३५

येणारे येवोत जाणारे जावोत, तुझे स्थान अस्थिर होता कामा नये. कारण ते जर अस्थिर झाले तर हे माझ्या मना ! तुझ्याकडे येणार कोण आणि जाणार कोण ? तुझ्या स्थिरतेची बैठक जराहि ढळलेली मला खपत नाही याचे कारण हेच मला तुझ्यापेक्षा समागत सज्जन प्रियजनांचीच अधिक चिंता आहे. तूं मतमज्जनाच्यासाठी अधीर होऊन त्याच्याच सेवेत स्थिर हो म्हणजे माझी तुझ्यासंबंधी काहीएक तक्रार राहणार नाही

५३६

हे प्रभो ! तुझ्या श्रीमुखदर्शनाचा लाभ झाला नाही याबद्दल मुळीच विषाद वाटत नाही. कारण तुझ्या पदकमलाचे दर्शन हेच माझें परम भाग्य आणि त्याची सेवा हीच माझ्या भाग्याची परम सीमा ! त्या परमभाग्याच्या सीमेवर तूं मला केव्हा नेशील ? केव्हा माझे मनोरथ पूर्ण होतील ?

५३७

भोगाचा त्याग आम्ही योगाचा भोग करण्यासाठी केलेला नसून तुझ्या वियोगातल्या अपूर्व सेवेसाठी केलेला असला तरी हे प्रभो ! तुझ्या योगातल्या सेवेपासून आम्हाला वंचित ठेवू नकोस.

## ५३८

माझ्या लगडत्या पायानेच मी तुझ्याकडे लवकर येईन, माझ्या जखमी हातानीच मी तुझी अधिक सेवा करीन. माझ्या अर्धवट पाहणाऱ्या डोळ्यानीच मी तुला स्पष्ट पाहीन माझ्या बहिऱ्या कानानीच मला तुझे शब्द स्पष्ट ऐकू येतील. हाच मला अपग करण्यात तुझा हेतु असला तरी हे परमेश्वरा! अपग न होताच सर्वांना तुजकडे येता यावे, सर्वांनी तुझी सेवा करावी, सर्वांना तुझें दर्शन व्हावे, सर्वांना तुझे शब्द ऐकूं यावेत हीच माझी प्रार्थना आहे!

## ५३९

आमच्या स्वामीनीं स्वामी आणि सेवक हा भेद नष्ट केला तेव्हापासून स्वामी आणि सेवकातला विरोध तर नष्ट झालाच पण स्वामित्व आणि सेवकत्व याच्या विकासाला अगदीं बहर येऊन गेला! त्यापासून हे प्रभो आमच्या हृदयात तुझ्या स्वामित्वाला आणि आमच्या सेवकत्वाला बहर येईल हीच आशा आम्ही ठेवली आहे!

## ५४०

आत कोदटपणा आणि बाहेर भकामपणा या दोहोना कटाळून मी तुझ्या मदिराच्या आश्रयाला आलो आहे. केवढे तुझे ऐश्वर्य, आणि केवढी माझी दीनता! पण मजबद्दलची तुझी कृपा आणि तुझ्याबद्दलची प्राणप्रिय श्रद्धा या दुहेरी सूत्रात तुझ्या अनंत गुणाच्या मण्याची माळा जपत मी येथे राहीन म्हणतो हे दीनदयाळा देवा! मला तू राहू देशील ना?

५४१

संध्याकाळ झाली, सूर्य मावळला, पाखरे आपापल्या घरट्यात गेली गुरे रानातून परत गोठ्यात आली. जो तो आपापल्या परीं परत आला मला घर नाहीं मी कोठे जाणार ? हे प्रभो ! तुझ्या चिंतन-प्रेमाच्या दुपाखी खोपटात मी बेघर होऊन जरी पडलो तरी हरकत नाही, पण एवढे माझे खोपट तरी वाऱ्याने उडवून लावू नकोस !

५४२

हे मित्रा ! पुढच्या लोकाना स्पष्ट कल्पना यावी म्हणून महत्त्वाच्या वस्तूवर लेख कोरून मागच्या लोकानीं व्यवस्था करावी या तुझ्या सूचनेबद्दल तुला कोणी दोष देणार नाहींच. पण ते कोरलेले लेखनहि काळाचे दूत कोरून टाकणार नाहींत हे कोण सांगू शकेल ? तेव्हा आम्ही एकच निश्चय केला कीं सर्वच वस्तु महत्त्वाच्या आहेत आणि त्यावर त्या दयामय प्रभूच्या नाममंत्राची मुद्रा कोरलेलीच आहे तेव्हा आम्हाला या खटाटोपात पडण्याचे काहींच कारण नाही

५४३

थोरपणाची सुरुवात आपणापासून करा आपणाला हीन समजू नका थोरपणा सर्वत्र पाहा. थोरपणा सर्वत्र पसरून द्या. हीनपणाचे नावहि काढू नका हे प्रभो ! हे थोराचे बोल आम्हाला पटले पण आमची अशुद्धता आणि असमर्थता दूर झाली नसल्यामुळे आम्ही आमच्यावर थोरपणाचे आरोपण करताना कचरत आहोत. तुझी शुद्धता आणि समर्थता थोडी तरी दे म्हणजे आम्हाला थोराचे सांगणे आचरिता येईल.

## ५४४

देवाजवळ आम्ही नेहमी याचनाच करीत असतो त्यामुळे आतां आम्हाला अतिशय लाज वाटूं लागली आहे. पण मित्र म्हणतात तो दयामय प्रभु आपला सर्वांचा मातापिता आहे. त्याच्याजवळ याचनाच करण्यात लाज कसली ? ही गोष्ट खरी. म्हणून ज्या हीनतेमुळे आम्हाला नेहमी याचना करावी लागते ती हीनता जावी आणि यापुढे याचना करावी लागूं नये एवढे हे प्रभो ! आम्हांला दे. अशी शेवटची याचना आम्ही केली तर बोला त्यात आमचे काही चुकेल का ?

## ५४५

औत्सुक्याची परमावधी झाली आणि तयारीहि पूर्ण झाली. परंतु अपेक्षेप्रमाणे तू आला नाहीस. म्हणून आम्हाला मुळीच निराशा वाटत नाही आमची तयारी व्यर्थ गेली असेहि नाही ती तयारी खरोखर आमच्या व्यवस्थाबुद्धीला आणि शुद्धीकरणाला प्रेरणा देणारी असल्य मुळे तू न येऊनहि आम्हाला उपकृत केले आहेस परंतु तुझ्या न येण्यात काही विघ्न उपस्थित झाले असेल का ? मध्येच कोण्या सत्कार्याची भर पडली म्हणून तर तुझे येणे झाले नसेल ? अनुकूल-प्रतिकूल विचाराची ही संशयरत्नमाला भक्त नेहमीच जपत असतात. पण आम्ही निःसंशय होऊन म्हणतो की हे प्रभो ! आज जरी तुझ्या येण्याचा योग नसला तरी तो योग लवकरच पुढे येईल याची ही नादी आहे.

## ५४६

परकीय वातावरणात उत्साहपूर्ण पदार्पण, मनाविरुद्ध माघार घेण्याचा प्रसंग, खालवणाऱ्या स्थितीत स्थैर्याचा प्रयत्न, आक्रमणाला तोंड देण्याच्या असमर्थतेमुळे मूलाधारात परिवर्तन, परंपरेला सांभाळण्याची जबाबदारी, पुढील आशेची अधुकता, अशा चक्रव्यूहात स्वतःला निभावून नित्यव्यथेशी तोंड देण्याचा ज्याच्यावर प्रसंग आला तो वास्तविक असामान्य असून लोकांना अगदीच क्षुल्लक वाटत असतो. तरी तुझ्या नेमलेल्या कामगिरीवरचा त्याला स्वतःलाहि माहीत नसलेला तो शिपाई आहे. मला तू तशी शिपाईगिरी दिली नसलीस तरी हे प्रभो! तूं मला आपल्या पायाचा कायमचा पाईक कर एवढीच माझी विनंती आहे

## ५४७

वारंवार भयंकर अपराध करून, त्या अपराधांना निरपराधी परोपकाराचा मुलामा चढवून, आक्रमणाच्या धुंदीत ज्यांनी राक्षसी छळ केला त्यांना कोणीहि हटकत नाही त्यांच्यापुढे सर्व दबून राहताहेत हे का? याचे कारण त्यांना सनातन सत्याचा प्रताप माहीत नाहीं त्यांच्या पापाचा घडा भरत आहे तो पूर्ण भरलेला नाही. तो लव-करच पुरा भरेल आणि त्यांच्या दीनतेला पारावार राहणार नाही हे प्रभो! तूं अन्यायाचे निराकरण केल्याशिवाय राहणार नाहीस हा विश्वास असल्यामुळे आम्ही तुझ्या पायी लीन होऊन म्हणतों की, आम्हाला कितीहि विषम परिस्थितीत ठेवलेस तरी हरकत नाही पण आम्हांला कधीहि असद्बुद्धि देऊं नकोस!

५४८

माझी नुसती विचारपूसहि कोणी करीत नाही, एकाला वाटते. कितीहि सेवाशुश्रूषा केली तरी तुम्हाला त्याची लेशमात्रहि जाणीव होत नाही, दुसऱ्याला वाटते

जर तुम्ही एवढी सेवा करता तर मला त्याची जराहि जाणीव होत नाहीं यात माझ्याकडून अकृतज्ञता असेल, पण तुमच्या सेवेत काहीच उणीव नसेल का ? माझी कोणी विचारपूसहि करीत नाही असे मला वाटते यात दुसऱ्याचा काहीहि दोष असो माझाहि काही दोष नसेल का ?

या तऱ्हेची कधी न उलगडणारी कोडीच कोडी सगळीकडे दिसताहेत. याला उपाय ?

तू जो काही प्रत्यय आणून देतोस तो मला जरी वरून वरून तसा भासला नाही तरी तो तुझ्या कृपेने घोळलेला आहे. हे प्रभो ! हीच दृढ निष्ठा मी ठेवावी. मग लोकाचे काहीहि असो. हाच उपाय आहे

५४९

मुख्य तो मुख्यच आणि गौण ते गौणच परंतु एकाने केवळ माधुर्यावर, एकाने केवळ वैशिष्ट्यावर आणि एकाने दोहोंच्या सार्थ समन्वयावर आपली कृति साकारताना तीहींच्या समन्वयाची कला विकसित होऊन नाचू लागली पण मग मुख्यालाहि गौणता येऊन त्या तीहींच्या पलीकडचा अव्यक्त मुख्य ठरला. तो कोणी ओळखला नाहीं तरी तो तूच यात शंका नाही. त्याला ओळखण्यासाठी या तीहींच्या, या गौण-मुख्याच्या, या समन्वयाच्या अवडंबराची जरूरच नाही. पण या अवडं-बरानेच कलेच्या लीलेचे रहस्योद्घाटन होत असते. म्हणून तू स्वतः नेहमी मागें राहून त्या लीलेचे कौतुक होऊं देतोस यात तुझी बाहुला-बाहुलीच्या खेळाचे कौतुक करणारी मातृवत्सलताच दडलेली आहे. हे प्रभो ! तीच आम्हाला लाभू दे. तीच आम्हांला सतत लाभू दे !

५५०

प्रथम लखलखीत प्रकाशात प्रभुमूर्ति आम्हाला पुढे दिसली. पण तो भ्रमच. आमच्या कल्पनेच्या प्रकाशाने प्रकाशित झालेली ती प्रभुमूर्ति आणि तो प्रकाश किती वेळ टिकणार ? लगेच तेथे गाढ अंधःकार पसरला तेव्हा कळले की आमची स्थिति वास्तविक कोणत्या भूमिकेवर उभी आहे. मग आम्ही कळवळून प्रभुमूर्तींची प्रार्थना करू लागलो तेव्हा प्रभुमूर्तींच्याच महस्रपट लखलखीत प्रकाशात प्रभुमूर्ति विराजमान झालेली दिसली आणि लगेच तो प्रकाश, ती मूर्ति आणि आम्ही तिघांचेहि भान हरपले त्या पहिल्या अंध.कारासारखाच हा अंधार का ? नाही नाही. हा प्रकाशापलीकडचा प्रकाश हे जीवा ! तू अनुभवीत आहेस !

५५१

मुळचीच स्वत.ची परमोच्च श्रेष्ठता श्रेष्ठ भूमिकेवर आरूढ करून तेथल्या साफल्याचे वितरण आम्हा बालकासाठी तू करीत असतोस त्यामुळे तुझ्याकडे आम्ही किती श्रद्धेने आणि कशा समादराने पाहात असतो त्याची तुला कल्पनाहि नसेल. कारण तू आपल्याच कार्यात दंग आहेस. हे परमेश्वरा ! आमच्याजवळ तुझी श्रेष्ठता आणि परमश्रेष्ठतेचे साफल्यहि नाही. परंतु आमच्याजवळ जे काही आहे ते सतत वितरण करण्याची बुद्धि तू आम्हाला दे.

५५२

ऐक्याच्या परममंगल उत्साहाने आलेल्या समागताच्या अवलोकनाचे भावपूर्ण स्वागत करूनहि त्याची वृत्ति केवळ चाचल्याने भरलेली आणि स्वागताचा अनादर करणारी जेव्हा आढळून आली आणि त्यानी केवळ ऐक्याच्या अवलोकनाचे सोंगच रचून एकनिष्ठेचा भंग केला तेव्हा विरोधभावनेला आपली सत्ता चालविण्याला मोकळे रान सापडले. परंतु तरीहि अविरोधानेच आपले ऐक्यकार्य चालवू या, या धीरगंभीर वृत्तीचा अंतर्नाद जेव्हा कानी आला तेव्हा अशांतीनेहि शांतीचा अंतिम जय घोषित केल्याचे अपूर्व दृश्य हे प्रभो! तुझ्या कृपेनेंच आम्हाला पाहावयास सापडले.

५५३

कसेहि करा आणि कितीहि श्रम करा, पण त्या प्रभुमय जीवनाला आपल्या हृदयोद्यानात आणाच आणा मग बघा तुमचे श्रम, तुमच्या सर्व युक्त्या कशा परिवर्तित होऊन तुमच्याकडे कृतार्थतेने पाहात आहेत त्याच्याकडे पाहून तुम्ही विस्मयचकित व्हाल खरोखर तुम्ही दिपून जाल तुमच्या श्रमाच्या सार्थकतेच्या समाधानाच्या पलीकडची कोणती तरी अपूर्व दिव्य वस्तु तुम्हाला लाभलेली असेल. ती म्हणजे त्या हृदयस्थ प्रभूच्या मायेची पाखर!

५५४

भरतीमुळे भरते येणे आणि ओहोटीमुळे ओहोटी लागणे अस्वाभाविक नाही, पण ओहोटीमध्ये भरते येण्याची साधना ज्यानी सिद्ध केली त्यानीच खरोखर भरती हस्तगत केली आणि ओहोटीला कायमची ओहोटी लावली!

५५५

चुकून बाहेर ठेवलेली वस्तु मौल्यवान् की सामान्य हा प्रश्नच तू उभा करूं नकोस. तुझी बहुमूल्य अतर्वृत्ति वस्तुरूपाने तूं बहिर्वृत्ति करून टाकलीस आणि हरवून बसलास हे हे जीवा ! तू ध्यानात घे

५५६

समुद्भवाच्या परमोच्च प्रेरणेने, आधाराच्या घनिष्टतेने, शक्तीच्या अपरपारतेने, सर्व अवस्थाच्या मधुर समन्वयाने, उपासनेच्या परमोत्कर्षानें, हे प्रभो ! व्यापकतेच्या, प्राणाच्या, ज्ञानाच्या, स्नेहाच्या आणि क्षमतेच्या महानद्यांनी माझा जीवनसमुद्र सतत भरलेला राहूं दे त्या अमृतसमुद्रात मग आम्हाला कोणाचेहि आणि कशाचेहि भय नाही.

५५७

निर्भयतेने मृत्यूसमोर झालेला मृत्यूचाच भेद करतो. म्हणून खरोखर मृत्यूच त्याला भितो. मग उत्पत्ति स्थिति लय या तीन्हींपलीकडचे स्थान त्याला प्राप्त होते तेथे तो मृत्यूला मारून अवतीर्ण होतो. आणि सर्वत्र शांतीचे साम्राज्य पसरून देतो. तो तेथे दिव्य उपासनेचा वर्षाव करतो तेथे त्याला त्याच्या दिव्य उपासनेच्या अन्वेषणात सगळेच ठेंगणे वाटू लागते. त्याला परम गुरूच्या दर्शनाची तहान लागते सर्वत्याग आणि परमेश्वराच्या स्तुतीने तो भारला जातो. त्याला दिव्य मंत्राची प्राप्ति होते. आणि त्यातूनच अव्यक्ताचे गूढ उकलत जाते. मग तो विश्वव्यापक होतो यामध्ये त्याची किती तरी तीव्र तपस्या कारण झालेली असते मग त्याला व्यापक आणि विशिष्ट याचा दोघांचा एक मार्ग दिसू लागतो तो बुद्धीच्या पलीकडे आविर्भूत होतो सर्वव्यक्तापलीकडे तो जातो. आणि सूक्ष्म अनुभूतीने सर्वमय बनतो तेथे सर्व अवस्था एकवटतात तेथे अनंतता आविर्भूत होते. तेच पूर्ण ऐक्य होय तेच सर्वहृदय ते सर्वांच्यासाठी जणू आथरले जाते. ते सर्वाधार बनून सर्वसुखमय होते. त्याची दृढता अमर अशा विरागातून फलीभूत होते

५५८

हे प्रियोत्तमा ! हे परमेश्वरा ! तुझें दैदीप्यमान वैभवयुक्त वैभव म्हणजे माझ्या हृदयातल्या अनादि समुत्सुकतेच्या अनंत शुभाशयाचा परममंगल अवकाश आहे. त्यातच तू विहार करीत रहा म्हणजे तुजबरोबर माझें सर्व जीवनहि तुझाच एक ब्रह्म-विहार होईल.

५५९

मी त्या दोघांना कधींपासून रात्रदिवस अगदी लगोलग समान भूमिकेवर विहरताना पाहात आहे त्याचा कधी वियोगच होणार नाहीं का ? ते किती काळ असेच राहतील ? हा माझ्या मनापुढे प्रश्न उभा राहतो. या प्रश्नाचे उत्तर भविष्यकाळच देऊं शकेल. परंतु खरे म्हटलें म्हणजे त्याच्या त्या भौतिक वियोगानेहि ते युक्त होणार नाहीत. त्या वियोगातहि ते सयुक्तच राहतील आणि यासाठीच त्याची ही समान भूमिकेवरची साधना सतत चालली आहे माझ्या जीवा ! ही गोष्ट तू लक्षांत ठेव आणि तूहि शिवस्वरूपाशी रात्रदिवस समान भूमिकेवर विहरण्याची साधना कर.

५६०

हे माझ्या चित्ता ! तूं अगदी आत आहेस हें खरे पण तुझ्याहि अगदी आत चित्ताचेहि चित्त आहे. त्याचे नुसते चित्रहि तू पाहिले नाहीस मग त्याचे प्रत्यक्ष दर्शन कोठले ? पण हेहि काय ! तू तुझें स्वतःचेहि चित्र अजून पाहिले नाहीस त्यामुळे तू स्वतःलाहि पाहिले नाहीस तेव्हा मी म्हणतो हे चित्ता ! तुझी सगळी नाना गोष्टी आपल्या ठिकाणी चितारण्याची विचित्र-चित्र-कला स्वतःचेच चित्रण करण्यात का लावीत नाहीस ? तुझें स्वतःचेच स्वतःवर चित्र उमटावयाचें म्हणजे तुला स्वतःला स्वतःच्यावरची सर्व चित्रें पुसूनच टाकावीं लागतील ना ? त्या सर्व विचित्र चित्राचा तू मोह ठेवू नकोस. त्या सर्वांपेक्षाहि तुझें स्वतःवर स्वतः उमटवलेले चित्र आश्चर्यकारक आणि अतिशय सुंदर असेल याची तूं खात्री बाळग !

५६१

एके ठिकाणीं राहून सर्वत्र भ्रमण्याची तुझी दिव्य शक्ति आम्हाला प्राप्त झाली नाहीच पण आम्ही एकेक स्थान सोडून सर्वत्र जाण्याचा प्रयत्न करून आमच्यात भकासपणा, क्षीणता,.आणि चांगल्य मात्र एक-सारखे वाढत गेले ही आमची दुर्दशा पाहून तुला एका बाजूने हसू येत असेल आणि दुसऱ्या बाजूने दया येत असेल तरी तूं आम्हाला कोणतीहि मदत करीत नाहीस असे आम्हाला वाटते पण ते वाटणे एक वाटणेच आहे. कारण तुझी स्वतःची नित्य-स्थिति ही जर आम्ही नित्य-स्मृति करूं, ती सतत आमच्या डोळ्यापुढे आणू तर तिच्याहून मोठे साहाय्य कोणते असेल ? तू सतत साहायासाठी उभाच आहेस सर्वत्र पोचलेलाच आहेस तुझा प्रकाश सर्वत्र फाकलेलाच आहे पण आम्ही आमचे डोळे मिटून घेतले आहेत त्याला तू काय करणार ? तरी तूं आमच्या मिटलेल्या डोळ्यावरहि तुझे प्रकाशाचे हात घट्ट बसवून आम्हाला म्हणतोस की अरे ! ओळख मी कोण तो ? ओळखलेस म्हणजे तुझे डोळे मी उघडीन ! केवढी ही तुझी खेळकर वृत्ति ! आणि आमच्या-संबंधीची केवढी ही तुझी मित्रभावना ! तू नित्य मित्र असून आम्ही तू साहाय्य करीत नाहीस असे मनात आणतो हा महदपराध तो तू म्हणू-नच क्षम्य होईल. खरोखर तुझ्या साहाय्याला, मित्रतेला, क्षमेला सीमाच नाही !

५६२

सर्व प्रकारच्या विरोधाला पूर्णपणे शमवून जेव्हा चित्तात अनिरुद्ध प्रेमप्रवाह वाहूं लागतो तेव्हा तेहि त्यात वाहून जाते, आणि वाहून जाता जाता स्वतःच्या चैतन्याच्या परम सुदरतेचा रग त्यात मिसळून देते. त्या रंगावर भाळलेली अनासक्ति तेथे दास्यभावाने जी अपूर्व सेवा करते ती होता होता तीतून शेवटी सेवेची अमूर्त अशी अद्‌भुत भावमूर्ति घडली जाते. हे माझ्या जीवा ! त्या अमूर्त मूर्तीची आपल्या प्राणाच्या ठिकाणी प्राणप्रतिष्ठा करण्याची हीच वेळ आहे हे ओळख आणि कृतार्थ हो.

## ५६३

आम्ही उत्साहाच्या भराने चाचल्याच्या गतीकडे जात असता घोर विनाशाच्या गर्तेकडे आम्ही चाललो आहोत हे तू लक्षात आणून दिल्याबरोबर आम्ही त्या गतीच्या मोहाचा तत्क्षणी त्याग केला आणि परम आश्चर्याचे दिव्य सगीत तेथे सुरू झाले त्या आमच्या सगीताची आपोआपच असख्य प्रार्थनामय स्तोत्रे बनू लागली त्याच्यात तीन प्रकारच्या प्रत्यावर्तनाचीं आदोलने होत होतीं· आणि त्यानी सहजच तीन्ही लोकाना व्यापून त्याच्यावर विजय मिळविला लगेच अतःकरणात अनाहत नादाचा जयघोप सुरू झाला त्या नादात आम्ही स्वतःला विसरत चाललो तेव्हा जीवात्म्याने या विजयाचा खरा लाभ जे अमृतत्व त्याची आम्हाला आठवण करून दिली· तेव्हा लगेच आम्ही तिकडे गेलो. आता ते अमृत कधी आम्हाला आपल्यात विलीन करते तर कधी आम्ही त्याला आपल्यात विलीन करतो· हे देवा! आनदामृताच्या विलीनीकरणाची ही उभयविध लीला म्हणजे खरोखर तुझी मूर्तिमत कृपाच आहे तिचे आम्हाला कधीहि विस्मरण होऊ देऊं नकोस!

## ५६४

हे प्रभो! तुझे पूर्ण आणि पवित्र तत्त्व-चिंतन त्यानाच लाभत असते जे पूर्ण आणि पवित्र अशा तुझ्या चरणकमलामृतांत वारंवार निमज्जन करतात· पण अशा निमज्जनानतर तुझें तत्त्व-चिंतन शिल्लक राहते का? होय ते राहते, ते स्फुरत राहते, तें गळत राहतें, तें विरघळत राहते, तें वाहत राहतें, तें अतरात्म्यात लहरून लहरून बहरत राहतें!

५६५

निद्रेनें आम्हाला निजविण्याचा जरी महान प्रयत्न केला तरी आम्ही पूर्णपणे निजूनहि पूर्णपणे जागृत राहिलो. आणि तेणेकरून दोन नव्हे तर तीन्ही गोष्टी आम्ही साधल्या. त्या तीहींच्या द्वारे एकाच वस्तूच्या दोन बाजू सापेक्षतेने कशा मनोहर दिसत असतात ते आमच्या लक्षात आले आणि निरपेक्षतेची परपराच एकसारखी आमच्यापासून अनतापर्यंत पसरत चालली हे अनतरूपा ! परमेश्वरा ! तुझ्याच परम-धामाकडे नेणारी ही तुझी सोपानपरपरा चढत असताना आम्ही पडू नये म्हणून तूच आमचा हात धर आणि आम्हाला सांभाळून ने !

५६६

आमच्या उपासनाच्या सुदर आणि मधुर फळानी आधीच बांधले गेलेले आम्ही अधिकच बांधले जात आहोत हे न कळून आम्ही विनाशाला आमत्रण देऊं लागलो तेव्हा स्वतःच्या बलिदानाच्या उदाहर-णाने तूं आम्हाला जागृत करून अज्ञान प्रदेशातला अखेरचा वैश्विक प्रकाश दाखविलास त्यामुळे आमची अतर्वर्तिता बहिरावरणात खुलून गेली. आणि आम्ही आत्माधाराच्या महान् कल्पवृक्षाखाली विश्राम घेऊं लागलो. हे प्रभो ! त्या कल्पवृक्षाचे गूढ काहीहि असो तू तेथे आमच्या कल्पनेतच सतत रमत राहावेस हीच आमची इच्छा उरली आहे बाकीच्या सर्व इच्छा आम्ही त्या कल्पवृक्षाला समर्पण करून दिल्या आहेत !

५६७

हे परमेश्वरा ! मी तुला परिपूर्ण पाहूंच शकत नाही. खरोखर मी कोणालाच परिपूर्ण पाहू शकत नाहीं कारण मी स्वतः अपूर्ण असून शरीर आणि जगावर अवलबित अशी माझी अपग अवस्था आहे. तथापि तुझ्या आभासाने माझ्या अतरगात वारवार दिव्य भावात्मकतेचे प्रकाशवलय झळकत राहते आणि त्या प्रातिभ दर्शनानें माझी दीनता काहीशी दूर होते. कधी कधी गाढ आनंदाच्या अवस्थेचाहि मी अनुभव घेतो. पण विकारदुःखविनाशाला पार कसे करता येईल ? या प्रश्नाचे उत्तर त्या गाढ आनदानेंहि मिळू शकत नाही तर त्याचा मला काय उपयोग ? असा निराशेचा सूर हृदयात उमटू लागला तोच तुझ्या उदार साहाय्याची नुसती सुरुवातच होतेशी वाटली. आणि मृत्यूचा पार विनाश झाला. मला वैश्विक रूपाची प्रतिष्ठा प्राप्त झाली. तुझ्या कृपेचे आश्वासन देणारी शातीची अनत परपरा माझ्या डोळ्यासमोर हंसत उभी राहिली. त्या मातृमूर्तीला पाहून माझ्या अनावर भावनेचा वेग डोळ्याबाहेर पडू लागला हे देवा ! त्यानेच मी तुझे चरणप्रक्षालन करीन.

५६८

तूं जरी आमच्यापुढें प्रत्यक्ष उभा राहिलास तरी आमच्याप्रमाणेच आम्ही तुला परस्परविरुद्ध, परस्परभिन्न, आणि परस्परानुकूलहि पाहतो. त्यामुळे आम्हाला वाटते की हे तुझें प्रत्यक्ष रूप फसवे आहे म्हणून आम्हाला तुझ्या अतरंगाचेच दर्शन हवे ते दर्शन आमचे अतरग व्यापक, वैश्विक प्रकाशमय, वात्सल्यमय, तेजस्वी आणि नित्य प्रगतिशील झाल्याशिवाय कोठून होणार ? आमचे जीवन हे जेव्हा सर्वस्वी स्वाधीन, सयमाच्या वैपुल्याने भरलेले आणि तुझ्या गूढ प्रार्थनेत विलीन झालेले असेल तेव्हाच तशा अतरगाची आणि तद्वारा अतरगदर्शनाची आम्हाला आशा करता येईल. केवढी ही दूरची आशा ! ही का दुराशा म्हणावी ? एवढया या आशेने निराशाच पदरात पडेल काय ? पडो पण आम्ही लहानात लहान असलो तरी तुझी महानातली महान् आशाच आमच्या हृदयात ठेवू ती विफल झाली तरी तिच्यातहि साफल्यतेचे दूरदर्शन करू. आमची खात्री आहे की याबद्दल तरी तू आमचे कौतुक करशील.

५६९

षट्कोणी मधाच्या सग्रहालयातल्या मधाने मधुर बनलेला माझा प्राण आत्ममूर्तीच्या ठिकाणी केंद्रित झाल्यामुळे माझ्या मनाच्या महदाशेची पूर्ति होईल आणि सर्वत्र सृजनशीलतेची परंपरा वाढत जाईल तीव्र निराशेतहि ज्याची अशी श्रद्धा दृढावत जाते तेच धन्य होत ! त्यानाच प्रभूची सेवा करण्याचे सामर्थ्य प्राप्त होईल.

५७०

परम साम्याचा मधुर स्वर प्राणाशी समरसतो त्यामुळे त्यातून अनेक मूर्तस्वरूपाचे आवाहन होते. आणि तेथेच सर्वश्रेष्ठ जीवन म्हणजे काय त्याचा उलगडा होतो त्या स्पष्टीकरणातली ज्ञानप्रभा विश्वात्म्याशी आणि अतरात्म्याशी स्पर्धा करू लागते आणि ती त्याना मागे टाकून परम सूक्ष्मतेच्या चरम स्थानात नेऊन पोचवते. तेथे आपली आपल्याला ओळख पटेनाशी होते. त्या आपल्या अनोळखीच्या स्थितीतच परमेश्वराच्या ओळखीच्या दोन खुणा हृदयात उमटतात तीच त्याची दिव्य पाउले. ती पाहिल्यावर हे परमेश्वरा ! आता मला सर्व काही पावले हाच समाधानाचा उद्गार तेथे तेथे परमसाम्याच्या स्तुतिस्तोत्रात गुफला जातो !

५७१

हे प्रभो ! तुझ्या अव्यक्त अनत शुभाशयाला कोणतेच स्वरूप नाही असे जरी म्हटले जाते तरी त्याची अनेक मनोहर सप्तस्वराच्या सगीता-सारखी चित्स्वरूपे आमच्या जीवनाला सतत प्रेरणा देत असतात. त्याच्या योगाने तुझ्या परम पवित्र परम धामाचे द्वार उघडले जावो आणि त्यातून आम्हाला तुझ्या सार्वभौम वैभवशाली पादपद्माचे दर्शन होवो !

५७२

हे प्रभो ! तुझा एकच कृपाकटाक्ष आमच्यावर पडला तरी तुझ्या परम पवित्र ज्ञानाचे सार, मधुराहून मधुर असे ते अमृत, पूर्व-पश्चिम उत्तर-दक्षिण सर्व दिशाना सहस्र सूर्याच्या उदयाच्या शोभेचा लोभ दाखवीत म्हणते की, “ या ! या परम सत्याला परम प्रेमभावाने ग्रहण करा. तुमच्याजवळचे मानीव सर्वस्व त्याला अर्पण करून त्याचे वर्चस्व तुमच्या हृदयसिंहासनावर विराजमान होऊं द्या तुमच्या आत्म्यात ते अनत रूपाने केद्रित होईल आणि त्या विश्वभाडाराचे तुम्ही स्वामी व्हाल ! ”

५७३

तुझ्या अश्वाची चारी बाजूनी चौफेर उधळलेली स्थिति असली तरी हे महान् सारथ्या! तुझ्या आनेच्या बाहेर एक क्षणभरहि आणि एक टीचभरहि ते जाऊ शकत नाहीत कारण तुझ्या दिव्य अस्तित्वाच्या बाहेर ते जातील तरी कसे? त्याचे ते उधळण्याचे केवळ एक लीलादर्शन आहे. त्याने तुझ्याकडे किंचित् लक्ष वेधले तरी जीवनातले गूढ रात्रीच्या चंद्रोदयाप्रमाणे सुंदर स्वरूपात उलगडले जावे हाच त्याचा उद्देश आहे.

५७४

व्यापकतेची खोली आणि खोलीची व्यापकता बनवलेली खोली असेल असे घर असेल तर मी चारी बाजूंनी बंद असलो तरी माझा कोंडमारा न होता मला केव्हाहि तुझ्याकडे येण्याला आणि तुला माझ्याकडे येण्याला कोणतीच अडचण येणार नसल्यामुळे हे प्रभो, मी अशा घराचा शोध करीत आहे पण ते मिळेलच अशी खात्री नाही म्हणून तोपर्यंत वाट न पाहता तू कृपा करून माझ्या या गरीबाच्या संकुचित झोपडीत येशील असे आश्वासन मला हवे आहे ते मला केव्हा मिळेल? आणि ते तू दिलेस हे मी कसे समजूं?

५७५

हे प्रभो! माझ्या विकाराचे विचार, विचाराची उपासना, उपासनेची सेवा, सेवेचे सख्य, सख्याचे सौख्य, सौख्याची शांति बनवून माझे अस्तित्व तुझ्या अस्तित्वात विलीन होऊं दे. त्या विलीनीकरणात 'मी' उरलो तरी तुझ्यात मुरून जाईन आणि तुझ्या स्फूर्तीची गोडीच सर्वत्र जोडली जाईल.

५७६

तुमच्या एकाएकी आगमनाने तुमच्यावरच्या जबाबदारीला आधार मिळावा हीच सदिच्छा व्यक्त झाली तेव्हा ती अगदी थेट अंतःकरणात जाऊन तेथून उद्गार निघाला की ही परमेश्वराच्या कारुण्य कार्याची आतरिक जबाबदारी आहे. हिच्यासाठी त्याच्याच सतत मानाची आणि परम धैर्याची आवश्यकता आहे. हा दूरचा पल्ला आहे राजमार्ग जरी म्हटला तरी जेव्हा तो अति दूरचा होतो तेव्हा जवळचा कटकमार्गहि सोपा ठरतो म्हणून दूर जाताना जवळच्याच्या जवळिकेची व्यवस्था सोबत असल्याशिवाय ती जबाबदारी पार पडणार नाही माझ्या मित्रानो, जा ! नि:शंक मनाने जा ! परमेश्वरकृपेनेच जबाबदारी येते आणि परमेश्वरकृपेनेच ती पार पडते !

५७७

तू कोठे ! आणि मी कोठे ! एके काळीं बालभावाने योगायोगाने एके ठिकाणी राहिलो. नाना खेळ खेळलो परतु आता तुझी माझी वर्षानुवर्षे गाठ नाही मी तुला आठवीत असतो तसा तू मला आठवीत असशील का ? हेहि सागता येत नाही तुझी माझी गाठ पडली तरी तुझी माझी ओळख तरी पटणार कशी ? समोरासमोर येऊनहि विचारपूस करण्याचा प्रश्नच कसा उद्भवेल ? माझे रूप पालटलेले तुझे रूप पालटलेले. तेव्हा आता पालटलेल्या रूपात आणि परिवर्तनात तू मला भेटून आणि मी तुला भेटून उपयोग तरी काय ? तो त्या काळचा खेळाचा, समानतेचा आनद आता पुन्हां कसा येणार ? तो पुन्हा न येवो पण हे प्रभो ! तुझ्या अविनाशी रूपामुळे तो माझ्या मनात पूर्ण भरून गेलेला असल्यामुळे मी आता तुझ्या अरूपांतच तो दिव्यलीलारूप योग पाहात राहीन !

५७८

जं जे मनात आले ते ते निरभिलाष सहजतेने आणि परमप्रेमानें नटलेले होते तेव्हा अकल्पनीय रीतीने त्याने साक्षात्काराची दिशाच निश्चित केली. त्यात मुख्य सूत्रधार, त्याचा साहायक आणि त्याची सर्व शक्ती दाखल झाली नतर समुज्ज्वल प्रकाशात विश्वव्यापक वृत्त हस्तगत होऊन जीव परतून निजस्थानीं आला. आता त्याला चुकल्या चुकल्यासारखे वाटण्याचे कारण नाही त्याला जरी प्रत्यक्ष साक्षात्कार झाला नाही तरी त्याची शिदोरी त्याने बांधून घेतल्यामुळे हे प्रभो! तो निश्चिंततेने विसावलेला आहे

५७९

हे परमेश्वरा! अकर्मण्यता सुटली तरी तेवढ्यानं तुझे कार्य पूर्ण होत नाही. त्यामुळे थोडासा तमोगुण झडतो पण थोड्याशा न्याहारीने पचपक्वान्नाच्या जेवणाची तृप्ती कोठून होणार? अकर्मण्यता गेली तरी समर्थकार्य त्याने कसे होणार? त्यासाठी तुझे सामर्थ्य माझ्या कार्यापाठीमागे उभे ठेव! मला निमित्तमात्र बनव परतु असमर्थ पगू बनवू नकोस!

५८०

त्या सर्वशक्तिमान् प्रभूच्या अल्प सेवेमुळे अनेक लोकाच्या चित्तात समादर भावनेने केवढे मोठे नयनमनोहर कल्पनाचे त्याहूनहि नयनमनोहर उद्यान बनविले आहे हीच वेळ आहे काळ अगदी जवळ आला आहे. हे जीवा! तूहि त्या समादराच्या उद्यानात समादराने परिपूर्ण होऊन जा. आणि आपली अल्प सेवा महान् बनविण्याची कला साधून घे

५८१

मित्राच्या मिषाने सतत शत्रुत्वाचाच जेथे अनुभव आला तेथे एका बाजूने मोठेपणा दुसऱ्या बाजूने लहानपणा. दोहोनाहि तोडून तोडून कसेबसे जीवनकार्य चालत गेले. आज येईल उद्या येईल. सगळे दिवस सारखे नसतात. अस्ताप्रमाणे उदय होईल अस्तच उदयाला येईल अशा कल्पनाकल्लोळात दीर्घकालानंतर दोहोचाहि अस्त झाला. याचा अर्थ हे जीवा ! तूं तुझ्या कल्पनांच्याच उदयास्ताचा अस्त करून घे असाच नाही का होत ? त्या कल्पनांच्यामुळे चित्ताचा किती कोंडमारा झाला आहे. शत्रुराहित्याची पोकळीहि मित्रराहित्याच्या पोकळीहून अधिक दुःखदायी वाटते ना ? तेव्हा तुला आता शत्रुमित्रकल्पनेपलीकडची मैत्री शोधली पाहिजे. हाच निष्कर्ष निघत नाही काय ? आणि अशी मैत्री शोधावयाची तर ती प्रभूच्या चरणकमलावाचून तुला कोठे मिळेल ? याचा तूं विचार कर.

५८२

पधरा साधने आणि एक साध्य त्यामुळे साध्याला घेरून ते सहजच हस्तगत होईल अशी कल्पना करण्यात केवढी विपरीतता आहे याचा प्रत्यय येऊनहि त्याचे भान होत नसल्यामुळे पुनःपुन्हा होणाऱ्या पतंगाच्या दिव्यावरच्या झडपाच्याप्रमाणे सर्वांची दयनीय स्थिति होत आहे तर हा विपरीत प्रकार सोडून या पधरावर त्या सोळाव्याची प्रभा आणि प्रभाव कसा पडेल हाच तू विचार कर आणि त्याच विवेककार्याला तूं लवकरात लवकर स्वतःला वाहून घे

## ५८३

समोर खळ्यांत धान्याची रास मोजली जात आहे आणि ती धन्याच्या धान्याच्या कोठारात जाऊन सुरक्षित ठेवली जाईल माझ्या प्रत्येक कर्मांत धन्यतेची राशी जोडली जात आहे का ? आणि त्याची मी समाधानाच्या मापानें कधीं मोजणी करतो का ? आणि ते हृदयातल्या अन्तर्भागात सुरक्षित राहील याची माझी काही योजना आहे का ?

## ५८४

स्नेहाच्या दोन्ही बाजूच्या अनेक पैलूनीं चोहीकडे अतिशय मधुर असा दृष्टिक्षेप केला आणि तो स्नेह लगेच असीम सीमेत विरघळून गेला. तेथे मग स्वाभाविकच महानतेचे केंद्रीकरण होणे अपरिहार्यच होतें त्यातूनच मध्यवर्ती गुरुता आपल्या दीक्षेची संस्कृती सर्वत्र फैलावूं लागली. तिने दिग्दिगन्तरीं आपल्या कीर्तीचे झेंडे फडकवल्यामुळे आपोआपच सर्व विश्व चकित होऊन गेले त्याला तर ते आपल्या मायेचे माहेर वाटले. तें खरोखर तुझेच स्वरूप पण ते कोणालाहि कळले नाही हे प्रभो ! मी एक लहान मूल म्हणून मलाहि अशी भूल पाडूं नकोस एवढी माझी सलगीची विनवणी तू ऐकशील ना ?

## ५८५

माहीत नसलेल्या प्रत्येकाच्या वेगवेगळया मानलेल्या सत्याचा माझ्या विशिष्ट सत्यमान्यतेमुळे अधिक्षेप न होवो एवढी काळजी माझ्या ठिकाणीं हे प्रभो ! तू निर्माण कर म्हणजे त्यामुळे माझ्या विशिष्ट सत्याची मजकडून उपेक्षा होणार नाही

५८६

राहून राहून निरनिराळ्या आरशात पाहून पाहून स्वतःचे रूप स्वतःला प्रतीतीला येईल ही दुराशा धरल्यामुळे वारवार निराशा पदरात पडत असली तरी हा नाद तुला सोडवत नाहीं कालस्थलप्रसंगाच्या भिन्न भिन्न, लहानमोठ्या, सामान्य-विशेष, सदोष-निर्दोष सर्व त-हेच्या वेलबुट्टीच्या चौकटीत बसविलेले ते आरसे कितीहि मोहक असोत आणि त्याचीं भिंगे कितीहि स्वच्छ दिसोत त्याचे खरे बिंग तुला माहीत नाहीं म्हणूनच तुला हा नाद लागला आहे अरे ! ते कितीहि स्वच्छ आणि सुंदर दिसले, आणि त्याच्या चौकटी कितीहि सुशोभित दिसत असल्या तरी त्यात केवळ अभावच अभाव आहे तेथे तुझा भावात्मक भाव उमटेल कसा ? आणि उमटला असे वाटले तरी तो भ्रमच नव्हे का ? मी म्हणतो हे जीवा ! हा नाद तू सोडून दे आणि केवळ आत्मस्वरूपातच स्वस्वरूप पाहा.

५८७

वेगाचा बेहोषपणा या प्रगतीच्या कल्पनेमुळे आम्ही भ्रमाच्या भ्रमात आमचे सामर्थ्य व्यर्थ घालवितो हे आमच्या लक्षात येत नाहीं. बेहोषपणामुळे जेव्हा आम्ही धडपडतो तेव्हाच त्या वेदनेमुळे आमचा काहींसा भ्रमनिरास होतो परंतु जोपर्यंत आम्ही त्या परात्पर प्रभूच्या सतत स्मरणाची सावधानता राखीत नाही, जोपर्यंत त्या प्रभूच्या परमधामाकडे जाणे हीच प्रगति समजत नाही आणि जोपर्यंत आपल्या ठिकाणी परम नम्रता बाणवून घेत नाही तोपर्यंत आमची प्रगति ही काल्पनिक, भ्रमात्मक आणि दुःखाला कारणीभूत होणार. हे जीवा ! तुला हे नीट ध्यानात घेतले पाहिजे.

## ५८८

माझ्या चित्तांत अनेक वस्तु शिरत राहतात एकेका वस्तूचे क्षणभर स्वागत करून चित्त तेथून दुसऱ्या वस्तूच्या स्वागताला निघून जाते. अशा रीतीने ते अनेकांच्या स्वागताचे केंद्र बनले आहे त्याला प्रभूच्या स्वागताची तयारी करण्याला बसविले पण त्यातूनहि तें निसटून दुसरीकडे जाते ही त्याची सवय केव्हां मोडेल ? एकेक निर्दोष वस्तूचे स्वागत करून त्याने दुसऱ्या वस्तूकडे जाण्यात दोष नसला तरी प्रभूच्या स्वागताच्या तयारींतून दुसरीकडे जाण्यात महादोष आहे त्याने इतरांचे स्वागत करणे प्रभूच्या स्वागताच्या तयारीचा अभ्यास मानला तरच ती ग्राह्य गोष्ट ठरेल हे जीवा ! हे तू सतत लक्षात ठेव

## ५८९

परमेश्वराने माझ्यापुढे देहरूपानें उभे रहावें तो परम साक्षात्कार घडावा या तीव्र इच्छेने जेव्हा तसा अनुभव आला नाही, तेव्हा आतून आवाज आला कीं, तू स्वत विदेह झाल्याशिवाय परमेश्वर तुझ्यापुढे देहरूपाने येईल कसा ? आणि हे जीवा ! तुला आणखी एक गुपित सागून ठेवतो— तू जेव्हा विदेहरूप होशील तेव्हा तो दयामय प्रभु तुझ्याच देहरूपाने तुला साक्षात्कार करवून देईल

५९०

फुलबागेची फळबागेची शोभा बहरुनि आली
त्यावर पडली उष:कालच्या उल्लासाची लाली ॥
प्रसाद प्रभुचा मानुनि पक्षी फळे खावया आले
त्याना उडवुनि लावायाला कठोर मन हे केलें ॥
उडताना ते दिसले तेही पुष्पफळाचे झेले
विरोध अमुचा प्रभुला कथिण्या दूर दिशेला गेले ॥
मग ओरडलो या रे या रे या रे येथे आता
आम्हाला ही न्या रे न्या रे प्रभुधामाच्या पथा ॥
ते कोठुनिया येतिल आता कठोरतेच्या पाशी
शोधायाला ते गेले कीं प्रभुमाधुर्याची राशी ॥
तेथे मिळतिल त्याना प्रभुच्या बागेमधली थोर
पुष्पाचींहि पुष्प तैसी फळे फळाची मधुर ॥
अमुच्या ममत्वयोगे आम्ही वंचित त्याना झालो
खिन्न मनाने मग बागेमधिं परतुनि येउनि बसलो ॥
हे जीवा ! तूं टाकुनि देई कठोरता हा खेद
प्रभातकालीं घोक पक्षिगण-दत्त मधुर हा वेद ॥

५९१

त्या प्रभूच्या आगमनाची चाहूल लागली अशा निव्वळ आभासाने हृदय व्याकुळ झाले चित्त येथे नाही तेथे नाही. कोठेहि नाही स्वतःच्याहि ठिकाणी नाही अशी बावरलेली स्थिति त्याला प्राप्त झाली हा आभास खरा ठरेल का खोटा? खोट्याने निराशा होईल. खऱ्याने आशेचे सार्थक होईल हे माझ्या जीवा! हे तत्त्व जर खरे तर तू व्याकुळता टाकून दे आणि नेहमीच खऱ्याचा आश्रय घेऊन खोट्याला सोड म्हणजे खरोखरच तुझ्या ठिकाणीं त्या प्रभूचे आगमन होईल आगमन होईल हे तरी कशाला? तो प्रभूच– तो प्रभूच तू खात्री बाळग— तो प्रभूच तू होशील!

५९२

हे प्रभो! मला मुलासमान सत्यभाव दे
हे प्रभो! पवित्र शांतियुक्त ठाव दे
हे प्रभो! समस्त वासनाविकार भगवी
हे प्रभो! तुझाच संग अंगअंगि रंगवी
हे प्रभो! तुझा गुणप्रभाप्रभाव ज्यात शोभला
हे प्रभो! तुझा प्रसाद नित्य तो हवा मला
हे प्रभो! मदंतरीं सुमाधुरी तुझीच वाहुं दे
हे प्रभो! तुझेच गीतगान या जगात राहु दे

# शुद्धि-पत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११ | १ | आपल्या आपल्या | आपल्या |
| १२ | १ | दृष्टि पण | दृष्टि आहे पण |
| १३ | १० | वागविले | वाढविले |
| १९ | ८ | ठेवले | ठेवले |
| २० | २ | राजेश्वर ! | राजराजेश्वर ! |
| २२ | ६ | करता | करतो तोच |
| २३ | ५ | नाहि नाही (यापुढे पुढील मजकूर वाचावा) | |

असा कोणता अपूर्व माली कोणते अपूर्व पाणी देतो की येथे निष्कटक–

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २५ | १९ | मिशाने | मिशानें तुला |
| २६ | ७ | दुसरीकडे किती | किती |
| २७ | ३ | पाहता | पाहतो तेव्हा |
| २७ | ४ | प्रकट | प्रकट करून |
| ३१ | ११ | तो तोच | तोच तोच |
| ३२ | १५ | अपरिचयामुळे | अतिपरिचयामुळे |
| ३२ | १६ | तू | तूच |
| ३३ | १२ | उडाली | उडावी |
| ३३ | १५ | पूज्य-पूजक | पूज्य-पूजक भाव |
| ३४ | ५ | कोणताहि | कोणताहि प्रकार |
| ३४ | ५ | तुजजवळ अशा | तुजजवळ |
| ३४ | ७ | करणारी | करवणारी |
| ३६ | ७ | शक्ति | भक्ति |
| ४५ | ११ | घातलेला | घालवलेला |
| ४५ | १३ | पूजा | महापूजा |
| ४८ | ५ | तुम्हापुढे | तुझ्यापुढे |
| ५३ | १५ | सपन्नता | सपन्नता तुझ्याजवळ |
| ५५ | १० | सर्वांची प्रत्येक | सर्वांची प्रेमळ |
| ६३ | १५ | तुझें | तुझेंच |

| | | | |
|---|---|---|---|
| ६३ | १८ | मुक्तीच्या | युक्तीच्या |
| ६९ | ११ | त्याप्रमाणे | त्याप्रमाणे कोठल्या कोटे |
| ७३ | १३ | आणि | आणि लोकाच्या |
| ८९ | ८ | स्मरण | कारण |
| ९५ | १७ | परदेश | परदेश मानला नसता |
| ९७ | १३ | आहे ! | आहे ! ती |
| १०३ | १६ | भाव | भास |
| ११९ | १९ | तरी | तरी ती |
| १३९ | १६ | झाला | आला |
| १५२ | १७ | आणि | आणि ती |
| १७४ | १० | घेणार | होणार |
| १८८ | १२ | आणि | आणि आम्ही |
| २१७ | ९ | प्रेमाने | प्रेमाने खाली |
| २३८ | ९ | सळबळ | खळबळ |
| २९० | ५ | युक्त | वियुक्त |